आदिमहाराष्ट्रकवि व महासाधु श्रीमुकुंदरायकृत

# सार्थ विवेकसिंधु.

हा ग्रंथ

## रा. रा. विष्णु कृष्ण आठल्ये

यांनीं तयार केला

---

तो

त्यांजपासून सर्व हक्कांसह विकत घेऊन

## गजानन चिंतामण शास्त्री देव

यांनीं छापवून पुणें येथें प्रसिद्ध केला.

शके १८३३.

---

**किंमत १॥ रुपया.**

1859

# अनुक्रमणिका.

## पूर्वार्ध.

### सृष्टिक्रम.



---

## उत्तरार्ध.

### संहारक्रम.

# सार्थ विवेकसिंधु.

## पूर्वार्ध.

### प्रकरण पहिलें सृष्टिक्रम.

विषय — ब्रह्मस्वरूप समावेश.

श्रीगणेशाय नमः ॥ ओंहरं जगदाधारमरविंदाक्षमक्षरं ॥ अभिवंद्यात्मविज्ञानोपदेशविधिरुच्यते ॥ जयजयाजी चंद्र- मौळी ॥ मातें कृपादृष्टीं न्याहाळीं ॥ मग पावेन नव्हाळी ॥ ब्रह्मसुखाची ॥ १ ॥ तूं निर्गुण निर्विकार ॥ निःसंगु निरा-

---

श्रीगणेशायनमः जगताला आधारभूत, कमलनयन, त्रैकालाबाध्य व षड्गुणैश्वर्यसंपन्न असा हर जो त्यातें वंदन करून आतमज्ञानोपदे- शाचा विधि सांगिजेतो. हे चंद्रमौले ! शंकरा ! आपला जयजयकार असो. प्रभो ! आपण मजकडे कृपादृष्टीनें अवलोकन करा. ह्मणजे मला ब्रह्मसुखाच्या अपूर्वाईचा लाभ होईल. १ महाराज ! आपण निर्गुण ह्मणजे गुणरहित व निर्विकार ह्मणजे षड्विकारांवेगळे आहांत.

कार ॥ तुझिया स्वरूपाचा पार ॥ नेणती ब्रह्मादिक ॥ २ ॥
तूं ब्रह्मरसाचा पुतळा ॥ कीं विश्वाचा जिव्हाळा ॥ जी सु-
खाच्या सुकाळा ॥ परमपुरुषा ॥ ३ ॥ तूं सच्चिदानंदतनू ॥
षड्भावविकारविहीनू ॥ स्वप्रकाशें प्रकाशमानू ॥ स्वसंवेद्यु
॥ ४ ॥ तुझा अनुग्रहो घडे ॥ तरीच मातें ज्ञान होय रोकडें ॥
स्वस्वरूप अनुभविजे फुडें ॥ स्वानुभवें ॥ ५ ॥ तरी माझें हृ-
दयीं वसावें ॥ प्रत्यक्ष वाचेतें चेतवावें ॥ जी स्वरूप बोल-
वावें ॥ मजकरवीं ॥ ६ ॥ तूं चतुर्विध वाचेतें ॥ प्रसवलासी

---

आपणांस कोणताच संग आकार नाहीं; आणि आपल्या स्वरूपाचा तर ब्रह्मादिकांना सुद्धां अंत नाहीं. २ हे परमपुरुषा ! तूं ब्रह्मरसाचा पुतळा, व विश्वाचा जिव्हाळा होस. महाराज ! आपण सुखाची लयलूट आहां. ३ सत्, चित्, आनंद हेंच आपलें शरीर; व तें षड्भाव ( ह्मणजे जायते, अस्ति, वर्धते, विपरिणमते, अपक्षीयते व नश्यति, ) हे सहा भाव आणि षड्विकार ( काम क्रोध मदमत्सरादि सहा मनोविकार ) रहित आहे. आपण स्वयंतेजानेंच ( आत्मानुभवानेंच ) प्रकाशमान होणारे व आपणच आपणांस जाणणारे आहां ४ आपला कृपाप्रसाद झाला तरच मला रोखठोक ज्ञान प्राप्त होईल; खरें खरें स्वस्वरूप समजेल; व आत्मानुभव घडेल. ५ तर महाराज ! ( आतां ) माझ्या हृदयांत वास करावा; प्रत्यक्ष वाणीला प्रेरणा द्यावी; आणि प्रभो ! मजकडून स्वस्वरूपाचें वर्णन करवावें. ६ खरोखरी परा, पश्यंति, मध्यमा, व वैखरी ह्या चारी वाणींना आपण प्रस-

निरुतें ॥ ऐसें जाणोनि जी तुमतें ॥ प्रार्थित असें ॥ ७ ॥ तुझेनि स्वरूपानुभवें ॥ म्यां कां निवांत बसावें ॥ परोपकारार्थ बोलावें ॥ हे तुझी इच्छा ॥ ८ ॥ धालेपणाचे ढेंकर ॥ जेवीं देती जेवणार ॥ तैसे तुझिया स्वरूपाचे उद्गार ॥ बोलविसी मजकरवीं ॥ ९ ॥ या बोबडिया बोला ॥ श्रीचंद्रचूड संतोषला ॥ मग सौरसु पैं दिधला ॥ ग्रंथनिर्माणीं ॥ १० ॥ वेदशास्त्राचा मथितार्थू ॥ मराठिया होय फलितार्थू ॥ तरी चतुरीं परमार्थू ॥ कां न घ्यावा ॥ ११ ॥ चाड चातुर्यातें जिणें ॥ ऐसें बोलती शाहाणे ॥ तरी येर्थींचिये परमार्थखुणे ॥ ग्राहिक कां न व्हावें ॥ १२ ॥ जरी रुईचे झाडीं ॥ भरती मधाचिया

---

वलां आहां, आणि ह्मणूनच मी आपल्यास ही प्रार्थना करीत आहें. ७ प्रभो! आपल्या स्वरूपाचा अनुभव घडल्यावर मग मीं तरी काय ह्मणून स्वस्थ बसावें? तर मीं परोपकारासाठीं बोलावें, ही आपलीच इच्छा होय. ८ तृप्तीचें चिन्ह ह्मणून जेवणारे ढेंकर देतात, त्याचप्रमाणें हें आपल्या स्वरूपाचें बोलणें आपण मजकडून बोलवीत आहां. ९ हें बोबडें भाषण ऐकून चंद्रचूड ( श्रीशंकर ) प्रसन्न झाले व त्यांनीं ग्रंथ तयार करण्यासाठीं प्रसाद दिला. १० वेदशास्त्राचा मथितार्थ जर मराठींत फलद्रूप होऊं लागला तर सुज्ञांनीं त्या परमार्थाचा लाभ कां बरें न घ्यावा? ११ शाहणे लोक 'अंगीं पुष्कळसें चातुर्य असलें तरच तें जिणें' असें ह्मणतात. तर मग येथल्या परमार्थाच्या खुणेला गिऱ्हाईक कां बरें मिळूं नये? १२ अहो! रुईच्या झाडालाच जर मधाच्या कावडीच्या कावडी भरतां येऊं ला-

कावडी ॥ तरी हिंडावयाची आवडी ॥ कां पडों द्यावी ॥१३॥
जरी हे अरुष बोल ॥ तरी रोकडें ब्रह्मज्ञान हें नवल ॥ तरी
अवज्ञा कोण करील ॥ येथविषयीं ॥ १४ ॥ ऊंस कीर दिसे
काळा ॥ परी घे पैं रसाचा गळाळा ॥ तैसे अरुष बोल परी
झळाळा ॥ दिसे विवेकाचा ॥ १५ ॥ नवरसांची उपलवण ॥
ते उघड वाचेसी नागवण ॥ ह्मणोनि न प्रवर्तती शाहाणे ॥
तेथींच्याविषयीं ॥ १६ ॥ होय वक्ता नव रसांचा ॥ जरी च-
तुर अपाडाचा ॥ तथापि लाभ परमार्थाचा ॥ तया दुर्लभ
कीं ॥ १७ ॥ तैसी मायीक रसवृत्ती ॥ बोलतां अंगासी न
ये महंती ॥ आणि परमार्थ संविती ॥ ते दूरि दुरावे ॥ १८॥

---

गल्या तर मग ( उगाच ) हिंडावयाची हौस तरी कशाला पाहिजे?
१३ तसेंच, हें जरी आर्षपणाचें बोलणें आहे, तरी आश्चर्य हें कीं,
हें प्रत्यक्ष ब्रह्मज्ञान आहे. मग ह्याचा अनादर कोण बरें करील?
१४ ऊंस दिसण्यांत खरोखरी काळा दिसतो, पण त्यांत रस जसा
डबडबलेला असतो, त्याचप्रमाणें माझें हें भाषण जरी आर्षपणाचें
आहे तरी त्यांत विवेकाची झळाळ आहे. १५ नवरसांचा विस्तार
ही वाणीची उघड उघड फसवणूकच होय. ह्मणून जे ज्ञाते आहेत
ते त्यास प्रवृत्त होत नाहींत. १६ नऊ रस ज्याच्या वाणींत घोळ-
त आहेत, असा जरी अप्रतिम चतुर वक्ता असला तरी त्यास दे-
खील परमार्थाचा लाभ ह्मणून जो आहे तो दूरच.! १७ मायिक
रस आणून बोलूं लागल्यानें कांहीं अंगांत साधुत्व बाणत नाहीं.
आणि परमार्थज्ञान ह्मणून जें आहे तेंही पण त्यास दुरावतें. १८

श्वपचाचिया घरींचा पाकु ॥ झाला आपाडें रसिकु ॥ तथापि सदाचार लोकू ॥ तया नातळती कीं ॥ १९॥ तैसें संसारिक बोलणें ॥ जें न स्वीकारती शाहाणे ॥ तया अखंड अनुभवणें ॥ परमतत्त्व ॥ २० ॥ जेथें ब्रह्मरसाची गोडी ॥ अखंड अनुभविजे फुडी ॥ त्या बोलाची आवडी ॥ साधुजनासी ॥ २१ ॥ ह्मणोनि विवेकसिंधुनांवें ॥ ग्रंथु कीजेल शुद्धभावें ॥ तया अवधान करावें ॥ ह्मणे मुकुंदराजु ॥ २२॥ गुरुशिष्याचेनि संवादें ॥ जें बोलिजेल विनोदें ॥ तें आइक आनंदें ॥ महानुभाव ॥ २३ ॥ कल्पतरूचेनि पाडें ॥ जरी फळती घरचीं झाडें ॥ तरी तियें आवडीचेनि कोडें ॥ न लावावीं कां २४ ॥

---

शूद्राच्या घरचा स्वयंपाक कितीही जरी उत्कृष्ट आणि स्वादिष्ट झाला तरी शिष्टसंभावित जे आहेत ते त्यास स्पर्श सुद्धां करीत नाहींत. १९ त्याप्रमाणें संसारिक बोलणें शहाणे लोक मनास आणीत नाहींत ह्मणून त्यांस अखंड परमतत्त्वाचाच अनुभव पाहिजे असतो. २० जेथें खरोखरी ब्रह्मरसाचीच गोडी अखंड चाखावयास मिळते, अशा भाषणाचीच साधुजनांना आवड असते. २१ ह्मणून विवेकसिंधु ह्या नांवाचा ग्रंथ अत्यंत शुद्धभावानें करण्यांत येईल. मुकुंदराज ह्मणतात, तिकडे अवधान असावें. २२ गुरुशिष्यांचीं संवादरूपानें जेव्हां विनोदपर भाषणें होतील तेव्हां हे महानुभाव! ( जयत्पाळ राजाचें विशेषण ) तीं तूं मोठ्या आनंदानें श्रवण कर. २३ कल्पतरूच्या बरोबरीनें जर घरचीं झाडें फलद्रूप होऊं लागलीं तर तीं अगदीं जिवाच्या हौसेनें लावूं नयेत काय? २४ ( तसेंच ) देशी असो कीं म-

देशी हो का मराठी ॥ परी उपनिषदाचीच राहटी ॥ तरी हा अर्थू जिवाचिया गांठीं ॥ कां न बांधावा ॥ २५ ॥ आइते शिष्याचे आक्षेप ॥ सिद्धचि गुरुवाक्यदीप ॥ जेणें संशयतमाचे विक्षेप ॥ फिटती श्रोतियांचे ॥ २६ ॥ हा ग्रंथू विचारितां ॥ नाहीं ज्ञानाची दुर्लभता ॥ आणि मुक्तिसायुज्यता ॥ बोधेंचि ओळंघे ॥ २७ ॥ याच देहीं आपुले डोळां ॥ जंव न भोगिजे मुक्तीचा सोहळा ॥ तरी वैराग्याच्या तातवेळा ॥ कां शिणावें ॥ २८ ॥ देहपातानंतरें ॥ मुक्ती पाविजेल ये उत्तरें ॥ साच मानावीं चतुरें ॥ काय ह्मणोनी ॥ २९ ॥ मरणानंतर मुक्ती ॥ येथविषयीं कवण उपपत्ती ॥ ऐशा आक्षेपीं

---

राठी असो, परंतु त्यांत जर उपनिषदांचाच क्रम आहे, तर हा अर्थ जिवाच्या गांठीस कां बरें बांधू नये? २५ सहजच शिष्यांच्या शंका आणि त्यावर गुरुवाक्याचा दीप सिद्धच आहे. तेणेंकरून श्रोत्यांस जे संशयरूप निबिड अंधकाराचे मध्येंच खो येतात, ते नाश पावतील. २६ ह्या ग्रंथाचें मनन केलें तर ज्ञान अगदीं सहज मिळतें; आणि नुसत्या बोधानेंच सायुज्यमुक्ति चालत येते. २७ ह्याच देहामध्यें (जन्मामध्यें) आपल्या डोळ्यांनीं जर मुक्तीचा सोहळा पाहिला नाहीं तर वैराग्याच्या कडकडीतपणानें रिकामा शीण तरी कां करून घ्यावा? २८ देह पडल्यानंतर ह्मणे मुक्ति मिळेल. शहाणे जे आहेत, त्यांनीं हें उत्तर काय ह्मणून खरें मानावें? २९ मेल्यामागें मुक्ति मिळेल, ह्याला पुरावा काय? अशी शंका काढून श्रीगुरूंच्या

पाय सेविती ॥ निजगुरूचे ॥ ३० ॥ स्थूळदेह निमेल ॥ मागुतीं मनुष्यदेह पाविजेल ॥ या वाक्या विश्वासेल ॥ ऐसा कवण असे ॥ ॥ ३१ ॥ खंडज्ञान उपदेशिती ॥ मोक्ष उधारें बोलती ॥ त्याच्या युक्ती झकविती ॥ ते हीन विवेकी ॥ ३२ ॥ ऐशियांचेनि उपदेशें ॥ कैसेनि संसार निरसे ॥ ह्मणोनि वायांचि वायवसे ॥ नाना मतें ॥ ३३ ॥ आपुलिया ज्ञानदृष्टी ॥ अपरोक्ष वस्तूसी नाहीं भेटी ॥ त्या वेडियाच्या गोठी ॥ काय काज ॥ ३४ ॥ ह्मणोनि सद्गुरूचीं पाउलें ॥ जिहीं साचारपणें धरिलें ॥ तेचि पैलपार पावले ॥ भवसागराच्या ॥ ३५ ॥ सद्गुरूचीं लक्षणें ॥ बोलती वेद शास्त्रं पुराणें ॥ तीं

---

पायांची सेवा करूं लागतात. ३० हा जडदेह पडेल व फिरून मनुष्यदेह प्राप्त होईल, ह्या बोलण्यावर भरंवसा ठेवील, असा कोण बरें मिळेल ? ३१ नाशिवंत ज्ञानाचा उपदेश करितात, मोक्षाचें तर उधारीनें वर्णन करितात. अशांच्या कल्पनांनीं चकून जातात ते हीन व अविवेकी होत. ३२ अशांच्या उपदेशानें संसारनिरास तो काय होणार ? ह्मणून निरनिराळया प्रकारचीं मतें हे निव्वळ वायचाळे होत. ३३ ज्याच्या स्वतःच्याच ज्ञानदृष्टीला अपरोक्ष वस्तूची (ब्रह्माची) भेट झाली नाहीं, त्या खुळ्याच्या गोष्टी काय बरें कामाच्या ? ३४ ह्मणून ज्यांनीं अगदीं मनोभावानें सद्गुरूचीं पाउलें धरिलीं, तेच ह्या संसारसमुद्राच्या पैलथडीला जाऊन पोचले. ३५ वेदांत, शास्त्रांत, व पुराणांत सद्गुरूचीं लक्षणें सांगितलेलीं आहेत, तीं समजून घेऊन शहाणे लोक

जाणोनियां शाहाणे ॥ अनुसरती ॥ ३६ ॥ जे संसारासी वेगळे ॥ ज्ञानवैराग्यें आगळे ॥ ब्रह्मरसस्वादा आनंदले ॥ ते सद्‌गुरु जाणावे ॥३७॥ कामक्रोधाचेनि विटाळें ॥ जयांचें चित्त नामळे ॥ त्या निरंतर सोहळे ॥ ब्रह्मसुखाचे॥३८॥ विषयसुखाचे डोहळे॥मनीं नुपजती कवणे वेळे ॥ जयांचें चित्त नुचंबळे ॥ हर्षविषादीं ॥ ३९ ॥ ब्रह्मादि पिपीलिकांतीं ॥ सकळ भूतजातीं ॥ जयांची चित्तवृत्ती ॥ न धरी विषम भावातें ॥ ४० ॥ आपपरू हे कडसणी ॥ आणीक नाहीं खोडी कवणी ॥ प्रपंचाचिया विणावणी ॥ नांदे परमार्थुचि ॥ ४१ ॥ जे ब्रह्मानंदें डुल्लती ॥ करून कांहींच न करिती ॥

---

त्यांसच अनुसरतात. ३६ जे संसारापासून अलिप्त, ज्ञान व वैराग्य यांनीं अलंकृत, आणि ब्रह्मरसाच्या गोडींतच जे रंगून गेलेले, ते सद्गुरु होत. ३७ कामक्रोधांच्या विटाळानें ज्यांच्या मनास विटाळ झालेला नाहीं; ज्यांस सदान्‌कदा ब्रह्मसुखाचेच सोहळे पहावयास मिळतात. ३८ ज्यांच्या मनास विषयसुखाचे डोहाळे ह्मणून कदाकाळींही शिवत नाहींत; आनंदाचा प्रसंग येतो, कीं दुःखाचा प्रसंग येतो, तरी ज्यांच्या चित्तावर एकही लहर उठत नाहीं. ३९ मुंगीपासून तों ब्रह्मादिकांपर्यंत सर्व भूतजातांच्या ठिकाणीं ज्यांची चित्तवृत्ति अगदीं सारखी; ४० हा आपला व हा दुसरा हा जेथें भेदभाव नाहीं; किंवा ज्यांच्या मनाला दुसरी कसलीही खोडी नाहीं; जेथें प्रपंचाच्या यातायातींत सुद्धां परमार्थच नांदत आहे, ४१ जे ब्रह्मानंदांतच डुलत राहिलेले. सर्व कांहीं करून जे कांहींच करीत नाहींत.

जे दुराग्रही नव्हती ॥ कवणेविषयीं ॥ ४२ ॥ करिती सत्कर्में कोडें ॥ परी स्वस्वरूपस्थिति न मोडे ॥ जया स्वानंद ओसंडे ॥ सर्व इंद्रियद्वारें ॥ ४३ ॥ विधिनिषेधांतें करिती ॥ परी विधिनिषेधें न लिंपती ॥ असुळविसुळ न होती ॥ ब्रह्मसंविती स्फुरे ह्मणोनी ॥ ४४ ॥ त्यजित असतां नाहीं त्यागू ॥ भोगित असतां नाहीं भोगू ॥ नवल हा ज्ञानयोगू ॥ जेथें नांदतसे ॥ ४५ ॥ निपजती इंद्रियांचे व्यापारु ॥ परी अकर्तृत्वीं चतुरू ॥ ब्रह्मविद्या देतां उदारू ॥ जे अतिपाडाचे ॥ ४६ ॥ जे अवस्थात्रयीं अगाध ॥ जयासी अखंड स्वरूपबोध ॥ ते अमूर्त परमानंद ॥ येणें

---

ज्यांस कसलाही दुराग्रह नाहीं. ४२ सत्कर्में तर हौसेनें आचरण कारितात, परंतु ज्यांची स्वस्वरूपस्थिति कायमची कायमच; स्वानंद हा ज्यांच्या सर्व इंद्रियांतून ओतप्रोत भरून चाललेला असतो. ४३ विधिनिषेधाचें आचरण करितात, पण त्यांनीं लिप्त मात्र होत नाहींत; अंतरांत ब्रह्मज्ञानाचें स्फुरण असतें, ह्मणून जे अस्ताव्यस्त नसतात. ४४ त्याग करीत असतां अत्याग व भोग भोगीत असतां अभोग होतो. हा ज्ञानयोग जेथें नांदत असतो, तेथें हें एक आश्चर्य आहे. ४५ इंद्रियांचे व्यापार अर्थात् कर्तृत्व सुरू असतात पण इतकें असूनही जे अकर्तृत्वांत चतुर; आणि ब्रह्मविद्या देऊं लागले ह्मणजे तर उदार एवढे कीं त्यांस अगदीं सीमा नाहीं. ४६ जे तिन्हीं अवस्थांमध्यें अगाध; ज्यांस सदोदित स्वरूपाचा वेध लागलेला; ते ह्या आकारानें अर्थात् मनुष्य देहानें अमूर्त अर्थात् निराकार परमानंदच होत.

आकारें ॥ ४७ ॥ निमिषोन्मेषाचा व्यापारू ॥ ज्यांसी करितां शिण थोरू ॥ ते योगींद्र जाणावे सद्‌गुरू ॥ कैवल्यदानी ॥ ४८ ॥ जे अंतरींच निवाले ॥ आठवितांही भागले ॥ विसराही विसरले ॥ स्वस्वरूप जे ॥ ४९ ॥ इहीं लक्षणीं अलंकृत ॥ जे देखिजेती महंत ॥ तेचि सद्गुरू जाणावे निश्चित ॥ ईश्वरी अवतार ॥ ५० ॥ सांगितले विशेषगुण॥हें सद्‌गुरूचें लक्षण॥ आतां शिष्याचें परीक्षण ॥ निपजेल ॥५१॥नव्हावा आळसी निष्ठुर ॥ आणि स्वकार्यतत्पर ॥ गुरुदास्याविषयीं कातर ॥ तो शिष्य न करावा ॥ ५२ ॥जारणमारणविध्वंसन ॥ स्तंभन मोहन वशीकरण ॥ उच्चाटण हे स-

---

४७ निमिषउन्मेषाचे व्यापार अर्थात् कर्में करितांना ज्यांना अत्यंत शीण वाटतो, तेच मोक्षदाते योगिराज सद्‌गुरु होत. ४८ जे अंतःकरणांतच समाधान पावलेले, आठवणीचाही ज्यांस शीण होतो; जे विसरालाही विसरलेले, जे मूर्तिमंत स्वस्वरूपच; ४९ अशा अशा लक्षणांनीं भूषणभूत झालेले जे कोणी महंत आढळून येतील तेच निश्चयेंकरून सद्‌गुरू ईश्वरी अवतार समजावे. ५० वर सांगितलेले विशेष गुण हेंच सद्‌गुरूचें लक्षण होय. आतां, शिष्याची परीक्षा कशी होईल तें सांगण्यांत येईल. ५१ तो आळशी व निष्ठुर नसावा. तसेंच स्वार्थपरायण, गुरुसेवेला अंग चोरणारा असा शिष्य करूं नये. ५२ जारण, मारण, विध्वंसन, स्तंभन, मोहन, वशीकरण, व उच्चाटण हीं सात लक्षणें ज्यांच्या

प्रविध लक्षण ॥ करिती ते शिष्य त्यजावे ॥ ५३ ॥ जे विष-
यरसीं आसक्त॥ अथवा अहंकारें गर्वित॥ ज्यांसी पाषांडाची
संगत ॥ ते शिष्य न करावे ॥ ५४ ॥ जो निंदकू नास्तिकू॥
ज्ञानचोर चुंबकू ॥ विना काजेंवीण वादकू ॥ तोही शिष्य व-
र्जिजे ॥ ५५ ॥ प्रगटावया आपुली महंती ॥ सभेमाजी गुरू-
तें आक्षेपिती ॥ युक्ती खुंटलीया बळासि येती ॥ तेही शि-
ष्य त्यजावे ॥ ५६ ॥ जे देखती प्राकृतदृष्टी ॥ गुरूसी करि-
ती तोंडपिटी ॥ ब्रह्मविद्येची गोष्टी ॥ त्यांसी कायसी ॥५७॥
न होतां अंतःकरणशुद्धी ॥ जरी प्रयोजिजे आत्मबुद्धी ॥
तरी तयासी नाहीं ज्ञानसिद्धी ॥ अपरोक्ष जे ॥ ५८ ॥ जें

---

कडून होतात, ते शिष्य सोडून द्यावे. ५३ जे विषयरसाला आ-
सक्त, मीपणानें फुगलेले व ज्यांस पाखांडाची संगत लागलेली आहे,
असे शिष्य करूं नयेत. ५४ जो निंदक, नास्तिक, ज्ञान चोरणारा
व कृपण, विनाकारण वाद घालणारा, असा शिष्यही वर्ज्य करावा.
५५ आपला मोटेपणा लोकांस दिसावा म्हणून भरसभेंत गुरूच्या
भाषणावर आक्षेप काढावयाचे, आणि कांहीं सुचेनासें झालें क्षणजे
मग हमरीतुमरीवर यावयाचें. असल्या शिष्यांचाही त्याग करावा.
५६ जे गुरूला प्राकृतदृष्टीनें पाहतात—अर्थात् साधारण लेखितात,
व त्यांशीं तोंडपिटी करीत बसतात, त्यांस ब्रह्मविद्येच्या गोष्टी काय
होत! ५७ चित्त शुद्ध झालें नसतांना जर आत्मबुद्धीचा योग करूं
लागलें तर अपरोक्ष ज्ञान क्षणून जें आहे, त्याची सिद्धी होणार नाहीं. ५८

संसाराचे निराळे ॥ ज्ञानवैराग्याचेनि बळें ॥ सर्वदोषांसी वेगळे ॥ ते सच्छिष्य जाणावे ॥ ५९ ॥ जे शुद्ध अंतःकरणीं विरक्त ॥ सत्यवादी दृढव्रत॥ निस्सीम गुरुभक्त॥ अनन्यभावीं ॥ ६० ॥ जे वित्तशाठ्य न करिती ॥ आपणातेंही न वंचिती ॥ आणीक परदैवत नेणती ॥ श्रीगुरुवांचुनी ॥ ६१ ॥ जे उदार मनाचे ॥ साचार भावाचे ॥ वांटेकर मुक्तीचे ॥ ते सच्छिष्य जाणावे ॥ ६२ ॥ या सानुरागा शिष्यातें ॥ स्वीकारावें श्रीगुरुनाथें ॥ ज्ञान उपदेशावें निरुतें ॥ पात्रभूता ॥ ६३ ॥ ते ब्रह्मरसाची मूस ॥ ज्ञानरत्नाची मांदुस ॥ गुरूसी उपजे भडस ॥ उपदेशाविषयीं ॥ ६४ ॥ परिसाचे सन्निधानें ॥ अष्टधातू होय सोनें ॥

---

जे संसारास न चिकटलेले आणि ज्ञान व वैराग्य ह्यांच्या योगानें सकल दोषांपासून मुक्त झालेले, तेच सच्छिष्य ह्मणून समजावे.५९ जे शुद्ध अंतःकरणाचे, विरक्त, सत्यवादी, दृढनिश्चयी, अनन्यभावेंकरून निस्सीम गुरुभक्त झालेले; ६० जे द्रव्याचा अपहार करीत नाहींत, व आत्मघातही करून घेत नाहींत, व ज्यांना सद्गुरुवांचून श्रेष्ठ दैवतच माहीत नाहीं; ६१ जे मनाचे उदार; खऱ्याखुऱ्या भक्तीचे; व मुक्तीचे वांटेकरी,—अर्थात् मुमुक्षु असतील तेच सच्छिष्य होत ६२ अशा शिष्याला श्रीगुरुनाथांनीं मोठ्या प्रेमानें पदरीं घ्यावें. आणि अशा सत्पात्रास खरें खरें ज्ञान सांगावें.६३ असा शिष्य ह्मणजे ब्रह्मरसाची मूस किंवा ज्ञानरूप रत्नांची पेटीच होय. त्यास पाहतांच गुरूच्या पोटांत उपदेशाचा उमाळाच येऊं लागतो. ६४ परिसाच्या सान्नि-

तैसें शिष्यासी ब्रह्म होणें ॥ तत्क्षणीं ॥ ६५ ॥ तेथें गुरूसी नलगे सायासु ॥ करितां ज्ञानउपदेशू ॥ आत्मा स्वयंप्रकाशु ॥ तया तत्क्षणेंची ॥ ६६ ॥ असंत शिष्य बोलिले ॥ तेही जरी मुमुक्षु झाले ॥ तरी तेही ह्मणावे आपुले ॥ श्रीगुरुनाथें ॥६७॥ मंत्रादि साधनें उपदेशें ॥ अष्टांगयोगयोगाभ्यासें ॥ चित्त निर्मळ होय आपैसें ॥ तयांचेंही ॥ ६८ ॥ नातरी गुरुदास्य करितां ॥ जळती चित्तमैल सर्वथा ॥ होय ज्ञानप्राप्ति त्वरिता ॥ श्रीगुरूचेनि प्रसादें ॥ ६९ ॥ अष्टधातू परिसीं लागले ॥ ते तत्क्षणीं कनक झाले ॥ अवधातु ह्मणोनि सांडिले ॥ पाषाणजात ॥ ७० ॥ तेही जरी चूर्ण कीजे ॥ अग्निसंगें लोह नि-

---

ध्यानें ज्याप्रमाणें अष्टधातूंचें सोनें होतें, त्याप्रमाणें शिष्य तात्काळ ब्रह्मस्वरूप होतो. ६५ तेथें ज्ञानोपदेश करितांना गुरूला कांहींच श्रम पडत नाहीं. तेथें तात्काळ आत्मा स्वयंप्रकाशमान होतो. ६६ असंत शिष्य ह्मटले तरी ते जर मुमुक्षु झाले तर त्यांस देखील श्रीगुरुनाथांनीं आपलेंसें ह्मटलें पाहिजे. ६७ मंत्रादि साधनांनीं, उपदेशानें, अष्टांगयोगाच्या अभ्यासानें, तशांचेंही मन आपोआप पवित्र होतें. ६८ किंवा गुरुसेवा करितां करितां मनाचे खळमळ निःशेष जळून जातात. आणि श्रीगुरूंच्या कृपाप्रसादानें तावडतोब ज्ञानप्राप्ति होते. ६९ अष्टधातु परिसास लागले तर त्यांचें तात्काळ सोनें होतें. पाषाणजात व अवधातु ह्मणून टाकून दिले तरी देखील त्यांचें चूर्ण करावें. ह्मणजे विस्तवाच्या योगानें त्यांतुन लोह उत्पन्न होतें.

पजे ॥ तेणेंही सुवर्ण होइजे ॥ परिससन्निधीं ॥ ७१ ॥ तैसे वैराग्यवन्ही तापले ॥ ज्ञानाधिकारा पातले ॥ अवधातुही ब्रह्म जाहले ॥ गुरुचरणप्रसादें ॥ ७२ ॥ गुरूचें पहातां महिमान ॥ परिस दिसे ठेंगण ॥ तो लोहातें करी सुवर्ण ॥ परी तो परिस नव्हे ॥ ७३ ॥ परिसासन्निध वेधलें ॥ लोह सुवर्ण होवोनि राहिलें ॥ तेथें अन्य लोह लागलें ॥ तें कनक नव्हे ॥ ७४ ॥ तैसा नव्हे गुरुकृपेचा बोधू ॥ जो सद्यः स्वरूपावबोधू ॥ शिष्याचि ब्रह्म होय हा विनोदू ॥ नवल तेथिचा ॥ ॥ ७५ ॥ कल्पतरूची उपमा द्यावी ॥ तो कल्पिलिया अर्था-

---

तेंही परिसाच्या योगानें सोनें बनतें. ७०, ७१ त्याचप्रमाणें जे वैराग्याच्या अग्नींत तावून निघाले व ज्ञानाधिकारास पात्र झाले, ( त्यांचे ) गुरूच्या पायांच्या प्रसादानें अष्टधातुही ब्रह्मस्वरूपच होऊन जातात. ७२ गुरूचा महिमा पाहूं गेलें तर परीसही त्याच्या पुढें फिका पडतो ! तो लोखंडाचें सोनें करितो खरा; पण तें कांहीं परीस होत नाहीं. ७३ ( बरें दुसरी गोष्ट ) जें परिसालाच चिकटलेलें असतें तेवढ्याच लोखंडाचें सोनें बनून राहतें. पण तेथें जर दुसरें लोखंड आणून ठेविलें तर त्याचें कांहीं सोनें होत नाहीं. ७४ सद्गुरुकृपेच्या बोधाची तशी गोष्ट नाहीं. तो तात्काळ स्वरूपाचेंच ज्ञान अनुभव-करून देतो. इतकेंच नव्हे, तर तेथची अशी कांहीं विलक्षण मौज आहे कीं, तो शिष्यच ( तात्काळ )ब्रह्म होऊन बसतो. ७५ बरें सद्गुरूला कल्पवृक्षाची उपमा द्यावी तर तो मनांत जो अर्थ कल्पावा तोच अर्थ पुरविणारा. पण असिद्गुरुनाथ कल्पनातीत कल्पने-

तें पुरवी ॥ कल्पनातीत भेटवी ॥ श्रीगुरुनाथ ॥७६॥ जननी आणि जनकें ॥ तियें संसारदायिकें ॥ परी नव्हेति भवबंध छेदकें ॥ श्रीगुरूवांचोनी ॥ ७७ ॥ कामधेनु आणि चिंतामणी ॥ हींही पुरवूं न सकती ऐणी ॥ चिंतिलिया अर्थाचीं दानी ॥ ह्मणोनियां ॥ ७८॥ जें चिंतनासी अचिंत्य ॥ सकळ कल्पनेविरहीत ॥ तें ब्रह्म निजानंदभरित ॥ हे देता श्रीगुरुनाथ ॥ ७९ ॥ ह्मणोनि श्रीगुरूसी उपमा ॥ द्यावी ऐसी कवणासी असे महिमा ॥ प्रपंच होय परब्रह्मा ॥ प्रसादें जयाचेनी ॥ ८० ॥ परोपकाराचेनि संतोषें ॥ पात्र कुपात्र ऐसें नोळखे ॥ गुरुमेघ सर्वत्र वरुखे ॥ उदारपणें ॥ ८१ ॥ तथापि

---

च्या बाहेरचीही वस्तु पुरवितात. ७६ आईबाप हीं नुसतीं संसार मार्गे लावून देणारीं असतात. परंतु तीं कांहीं संसारबंधन तोडणारीं नव्हत. असें श्रीगुरुवांचून दुसरें कोण आहे ? ७७ ( आतां ) चिंतामणी आणि कामधेनु घेऊं. तर तीं देखील जो अर्थ चिंतावा तेवढेंच देणारीं. पण ब्रह्माची आर्ति कांहीं त्यांच्यानें पुरविणें होणार नाहीं. ७८ तर जें चिंतनास सुद्धां अचिंत्य, सर्व कल्पनारहित, तें निजानंदानें परिपूर्ण असें ब्रह्म प्राप्त करून देणारा एक श्रीगुरुनाथच होय. ७९ ह्मणून श्रीगुरूला उपमा द्यावी, अशी थोरवी कशामध्यें आहे ? ज्यांच्या प्रसादानें प्रपंचच परब्रह्मस्वरूप होतो. ८० परोपकाराचा आनंद इतका कीं, तेथें पात्र व अपात्र हा प्रश्नच नाहीं. हा सद्गुरु मेघ सर्वांवर सारखाच उदारपणानें वर्षाव करितो. ( येथें मेघाची उपमा फारच समर्पक आहे. ) ८१ तथापि पात्रता-

पात्रताविशेषें ॥ स्थिर होय सखोल भूमिके ॥ थेंबु न राहे उटंके ॥ जाय निरसोनि ॥ ८२ ॥ तैसें पात्रतेवीण ॥ स्थिरूं न शके ब्रह्मज्ञान ॥ येथें जो दृष्टांत सांगेन ॥ तो अवधारिजे ॥ ८३ जैसे पुत्र विटाळले ॥ ते पितृधनासी मुकले ॥ शुद्ध झालिया भाग पावले ॥ जयापरी ॥ ८४ ॥ तैसें निजजनक ईश्वराचें ॥ त्यासी ब्रह्मचि धन साचें ॥ शुद्ध जीव विभागी येथींचे ॥ तदंश ह्मणोनी ॥ ८५ ॥ जननीजनकें ॥ तियें संसारदायकें ॥ नव्हेति बंधविच्छेदकें ॥ श्रीगुरुवांचोनी ॥ ८६ ॥ चित्तासी पडे

---

विशेषाप्रमाणें खोल जमीन असली ह्मणजे तेथें जल स्थिर व्हावयाचें, आणि उथळ जमिनीवर एक थेंब सुद्धां रहावयाचा नाहीं. ८२ त्याचप्रमाणें पात्रतेशिवाय ब्रह्मज्ञानही स्थिरावत नाहीं. ह्यावर एक दृष्टांत सांगतों, तो ऐकावा. ८३ ज्याप्रमाणें विटाळलेले, भ्रष्ट झालेले ( रीतीप्रमाणें लग्नसंबंध न होतां झालेले ) जे पुत्र असतात, ते पितृधनास ( वारसदारीच्या धनास ) अंतरतात ( त्यांस वारसाचा हक्कच पोंचत नाहीं ), आणि तेच शुद्ध ( विवाहित स्त्रीच्या पोटचे ) असले तर त्यांस पितृधनाचा वांटा मिळतो ( हक्कानेंच मिळतो. ) ८४ त्याप्रमाणेंच आपणा सर्वांचा पिता जो ईश्वर त्याचें ब्रह्म हेंच खरोखरी धन आहे. शुद्ध जीव जे आहेत, ते त्याचेच अंश होत. ह्मणून तेच त्या धनाचे वांटेकरी होतात. ८५ मातापितरें बिचारीं काय देणार तर संसार ! तीं बंधनें कां नाहींसें करतील ? छे ! असा ( संसारबंधन तोडणारा ) एक श्रीसद्गुरूच. ८६ चित्ताला जावत्कालपर्यंत विषयाचा संग आहे, तावत्-

विषयसंगू ॥ तंव जीवासी कैंचा ज्ञानधनभागू ॥ ह्मणोनि आह्मीं हा प्रसंगु ॥ आदरिला ॥ ८७ ॥ शिष्याचे गुणदोष लक्षण ॥ संक्षेपें केलें कथन ॥ आतां कीजेल अनुसंधान ॥ पुढलिया कथेचें ॥ ८८ ॥ शिष्य तापत्रयीं संतप्त ॥ शमदमादि साधनसंयुक्त ॥ गुरूतें शरणागत ॥ विनवीतसे ॥ ८९ ॥ जी मी संसारसागरीं बुडालों ॥ तापत्रयवडवाग्नीनें पोळलों ॥ क्रोधादि जळचरीं विसंचलों ॥ जालों मी अति अशौच ॥९० तरी ज्ञानाच्या तारुवीं बैसउनी ॥ कृपेचा सुवायु पेलूनी ॥ देवेंचि तारक होउनी ॥ तारावें मातें ॥९१॥ भवरोग मध्यान्हतातवेळं ॥ तापलों तापत्रय दावानळें ॥ जी कृपाजळधरा

---

कालपर्यंत ब्रह्मज्ञानधनाचा वांटा जिवास मिळण्याचें नांव कशाला ? ह्मणूनच हा प्रसंग ( भाषणाचा ओघ ) आम्हीं आणला आहे. ८७ शिष्याचे गुणदोष कसे असतात ते येथपर्यंत थोडक्यांत सांगितले. आतां पुढील कथेचें अनुसंधान करण्यांत येईल. ८८ शिष्य त्रिविध तापानें तापून जाऊन, शमदमनादि साधनांनीं युक्त होत्साता गुरूस शरण गेला व विनवण्या करूं लागला. ८९ महाराज! मी ह्या संसारसमुद्रांत बुडालों, त्रिविधतापांच्या वडवाग्नीनें होरपळलों, क्रोधादिक जळचरांनीं माझी पाठ पुरविली, मी अगदीं हीन--केवळ पतित होऊन बसलों.९० तर महाराज, ज्ञानाच्या जहाजावर घेऊन कृपेचा अनुकूल वारा सोडून, गुरुदेवानींच तारक--नावाडी--होऊन माझा उद्धार करावा. ९१ भवरोगरूपी भरदोनप्रहरच्या रखरखीत उन्हांत, तापत्रयाच्या वणव्यानें

ज्ञानजळें॥ निववावें मातें ॥ ९२ ॥ संसाराचिया बंदिशाळे ॥ बांधलों अज्ञान शृंखळें ॥ तें बंधन तोडावें स्वामि सळें ॥ ज्ञानशस्त्रें करूनी ॥ ९३ ॥ ऐसी कृपा उपजउनी ॥ विनवी शिष्यशिरोमणी ॥ मस्तक श्रीगुरूच्या चरणीं ॥ न्यासिता झाला ॥ ९४ ॥ तंव बोलिला श्रीगुरुराजा ॥ बारे तूं शिणलासी कवण काजा ॥ कैसें बंधन तोडिजेल बोजा ॥ पाहें पां रोकडेंची ॥ ९५ ॥ ऐसी प्रतिज्ञा स्वीकारुनी ॥ शिष्यातें सन्मुख बैसउनी ॥ आज्ञासमावेश करुनी ॥ गुरुसंप्रदायक्रमें ॥ ९६ ॥ तेथें ज्ञानशक्तीचा प्रवेशु ॥ अज्ञानशक्तीचा

---

पोळून गेलों! तर महाराज, हे दयेच्या मेघा ( सद्गुरो )! ज्ञानजलाचा वर्षाव करून माझा दाह शांत करावा. ९२ संसाराच्या कैदखान्यांत, अज्ञानरूप सांखळदंडानें जखडून गेलों! तर महाराज! स्वामीनीं हा माझा खोडा ज्ञानरूप शस्त्रानें सत्वर तोडून टाकावा. ९३ त्याप्रमाणें करुणा भाकून, शिष्य शिरोमणी प्रार्थना करूं लागला, आणि त्यानें श्रीगुरुचरणीं मस्तक ठेविलें ९४तेव्हां श्रीगुरुराज ह्मणालेः—बरें तूं इतका कशासाठीं कष्टी झाला आहेस? बाबारे! आतांच्या आतां तुझें बंधन कसें तोडून टाकितों तें प्रत्यक्षच पहा ह्मणजे झालें. ९५ अशी प्रतिज्ञा करून शिष्याला सन्मुख बसवून गुरुसांप्रदायाच्या पद्धतीप्रमाणें आज्ञासमावेश अनुग्रह करून गुरुआज्ञेचा समावेश मंत्रदीक्षा केली ( ? ) ९६ तों तेथें ज्ञानशक्तीचा शिरकाव होऊन अज्ञानशक्ति अस्तास गेली; आणि शिष्या-

निरासु ॥ बोध उठिला स्वयंप्रकाशु ॥ शिष्यचैतन्यीं ॥९७॥ ते वेळीं कंपस्वेदादिक ॥ उठिले भाव सात्विक ॥ जैसें साम्राज्यातें पावे रंक ॥ तैसें वर्ततें जाहलें ॥ ॥ ९८ ॥ या नांव शक्तिपात बोलिजे ॥ स्वानुभवें अनुभविजे ॥ तेथें निःशेष विसरिजे ॥ संसारस्मरणादिक हें ॥ ९९ ॥ तंव आनंदाचा पुरु ॥ आला शिष्यसरितेसि थोरु ॥ तेथें अविवेक पव्हणारु ॥ बुडोनि जाय ॥ १०० ॥अहंकारद्रुम उन्मळिला ॥ तृष्णापक्षिणीचा कुरठा मोडिला ॥ इंद्रियग्राम बुडाला ॥ तिये आनंदजळीं ॥ १ ॥ ऐशिया सुखाचे शेजारीं ॥ तेथं स्वानुभुती अं-

---

च्या चैतन्यांत स्वयंप्रकाश स्वरूपानुभव ( एकदम ) प्रगट झाला. ९७ त्यावेळीं ( कशी अवस्था झाली म्हणून सांगावी? ) कंप, स्वेद ( घाम ) आदिकरून ( आठही ) सात्विक भाव ( एकदम ) उठावले आणि एखाद्या दरिद्र्याला ( एकदम ) सार्वभौम राज्य प्राप्त व्हावें, तशी अवस्था झाली. ९८ ह्यालाच ‘ शक्तिपात ’ असें नांव आहे. तो स्वानुभवानें जाणला पाहिजे. तेथें संसाराचें स्मरण वगैरेंचें पार नांव नाहींसें होतें ! ९९ तेव्हां शिष्यरूप नदीला आनंदाचा अपरंपार पूर लोटला. तेथें पोहणारा विचारशील नसेल तर ( तात्काळ ) बुडूनच जावयाचा ! १०० ( त्या पुराच्या सपाट्यांत ) अहंकाररूप वृक्ष उमळून पडला; तृष्णावासनारूप पक्षिणीचें घरटें उध्वस्त झालें; आणि तें जें आनंदाचें ( अपरंपार ) पाणी आलें त्यांत इंद्रियांच्या गांवाला तर जलसमाधिच मिळाली. १ अशा प्रकारच्या सुखाच्या शय्येवर, तेथें स्वानुभूतिरूप-

तुरी ॥ तिया आलिंगिला सुंदरी ॥ तो योगिराज ॥ २ ॥
तियेचेनि अंगमेळें ॥ नुठती विषयांचे डोहळे ॥ तेथें असिजे
केवळें ॥ स्वस्वरूपीं ॥ ३ ॥ स्वरूपसुखाचेनि भरें ॥ जेथें कां-
हींच न स्मरे ॥ ते योगनिद्रा न संचरे ॥ तया योगिराजासी
॥ ४ ॥ तेथें नेणीव ना जाणीव ॥ सरले भावाभाव ॥ तेथें
एकछत्री राणीव ॥ राजयोगाची ॥५॥ सर्व सुखांची कुरोंडी॥
जयासी वोंवाळूनि सांडिजे फुडी॥ तया ब्रह्मसुखाची गोडी ॥
केवीं बोलावी ॥ ६ ॥ जेथें मनाचें जाणणें ॥ खुंटलें वाचेचें
बोलणें ॥ हें ज्याचें तोचि जाणे ॥ येरा टकमकचि ॥ ७ ॥
तैसें परमात्मयाचेनि आधारें ॥ इंद्रियग्राम व्यापारे ॥ परी

---

स्त्री ( स्वरूपानुभवरूपीस्त्री ) होती–त्या सुंदरीनें त्या योगि-
श्रेष्ठाला आलिंगन दिलें. २ तिच्या अंगसंगानें विषयाचे डोहाळे
होतच नाहींत. तेथें केवळ स्वरूपांतच [निमग्न] असावें. ३ त्या स्व-
रूपसुखाच्या भरांत–जेथें सर्वच गोष्टींचा विसर पडतो, अशी जी
योगनिद्रा ती त्या योगिश्रेष्ठावर अंमल बसवूं शकत नाहीं. ४
तेथें नेणीवाचेंही नांव नाहीं, व जाणीवाचेंही नांव नाहीं; भाव व
अभाव ह्या दोहोंचेंही बोलणें खुंटलें; [ केवळ ] राजयोगाचें एक-
छत्री राज्य होऊन राहिलें. ५ खरोखर ज्यावरून सर्व सुखाची कु-
रवंडी करून तीं ओवाळून टाकावीं, त्या ब्रह्मसुखाची गोडी काय
सांगावी ? ६ जेथें मनाचें जाणणें आणि वाणीचें बोलणें हीं दोन्ही-
ही खुंटलीं. हें ज्याचें त्यानेंच अनुभवावें. इतरांना [ नुसती ] ट-
कमकच. ७ त्याचप्रमाणें परमात्म्याचा आधार असल्यामुळें–जरी

त्याचेनि वेव्हारें ॥ न लिंपिजे तो ॥ ८ ॥ ऐसा राजयोगसंकेतु ॥ पातला तो अवधूतू ॥ यावरील वृत्तांतु ॥ तो अवधारिजे ॥ ९ ॥ जें मना वाचे अगोचरू ॥ तें बोलतां सांकडें थोरू ॥ तथापि ऐकें तूं चतुरू ॥ श्रीमुकुंद ह्मणे ॥ ११० ॥

इतिश्रीमद्विवेकसिंधौसृष्टिक्रमेगुरुशिष्यसंवादेस्वरूपसमावेशोनामप्रथमप्रकरणं ॥ ॥ श्रीमत्सद्गुरुचरणारविंदाभ्यांनमः ॥

---

इंद्रियसमुदायाचा व्यापार चाललेलाच असतो तरी त्या व्यवहारानें त्याला कांहीं दोष लागत नाहीं. ८ त्याप्रमाणें राजयोगाची खूण त्या अवधूतास ( पवित्र झालेल्या शिष्यास ) पटली. आतां यापुढील गोष्ट श्रवण करा. ९ जें मनाला आणि वाणीलाही कळून न येणारें तें सांगावयाचें ह्मणजे महा कठिण काम ! श्रीमुकुंद ह्मणतातः—तथापि हे चतुर पुरुषा ! तूं ऐक. ११०

# प्रकरण दुसरें.

विषय—स्वानुभवादतिकरण ह्मणजे प्रशंसा कथन.

**श्रीगणेशाय नमः ॥ तंव सखी स्वानुभूतीची ॥ तुर्या पातली निजाची ॥ तिया प्रबोधीं लाहे ज्याची ॥ तो योगिराज ॥ १ ॥ झालें नेत्राचें उन्मीलन ॥ उठिलें अंतःकरण ॥ परी अनुभवाचें अवतरण ॥ तें न वचेचि ॥ २ ॥ इंद्रियें कीं रचियेलीं ॥ परी तयांची धांव मोडिली ॥ पुनरपि बुचकळलीं ॥ तये आनंदजळीं ॥ ३ ॥ जैसें भागलें ढोर ॥ पावे सुरवाडिक बिढार ॥ तेथूनि उठवितां थोर ॥ अंगाचि घाली ॥४॥ तैसीं**

श्रीगणेशायनमः—मग स्वानुभूतीची ( स्वरूपानुभवाची ) मैत्रीण जी निजावस्था–तुर्या ती प्राप्त झाली. त्या आत्मानुभवांत ( वर सांगितलेल्या–पूर्वप्रकरणीं सांगितलेल्या ) ज्याची अशी अवस्था होते, तो योग्यांचा राजा होय. १ नेत्र उन्मीलित झाले; अंतःकरणाचीही उठावणी झाली; परंतु ( हृदयांत ) जी अनुभवाची जागृति झाली, ती जाईचना. २ इंद्रियें ठिकाणावर आलीं खरीं, पण त्यांची धांवच मोडली; आणि तीं पुन्हां त्या आनंदाच्या पुरांत बुडवलीं गेलीं. ३ ज्याप्रमाणें एखादें थकलेलें गुरूं, चांगली सुखकर अशी जागा पाहून बसतें, आणि तेथून उठवूं लागलें असतां अगदीं घालून द्यावयास लागतें, ४ त्याचप्रमाणें त्रिविधतापानें पोळलेलीं

तापत्रयें तापलीं ॥ इंद्रियें ब्रह्मानंदें निवालीं ॥ स्वविषयीं प्रवर्तलीं ॥ न प्रवर्ततीच ॥ ५ ॥ मग शिष्य वाडवेळ ॥ लाहूनि इंद्रियाचें बळ ॥ गुरूतें वाचा बरळ ॥ विनवीत असे ॥ ६ ॥ उठिला आनंदभरित ॥ गुरूसी प्रदक्षिणा करित ॥ चरणांवरी मस्तक ठेवित ॥ वेळोवेळां ॥ ७ ॥ मन प्रेमरसें भरलें ॥ दोन्ही करसंपुट जोडिले ॥ मग कांहीं एक बोलणें आरंभिलें ॥ शिष्यराजें ॥ ८ ॥ जयजयाजी अनाथबंधु ॥ जयजयाजी करुणासिंधु ॥ तुमचा महिमा प्रसिद्ध ॥ राजयोगिया ॥ ९ ॥ जें अनादि हारवलें ॥ मीं मजाचि होतें चोरिलें ॥ तें मातें भेटविलें ॥ श्रीगुरुरायें ॥ १० ॥ तुझिया कृपादृष्टी ॥ जाली

---

इंद्रियें ब्रह्मानंदानें शांत झालीं; आणि त्यांना आपआपल्या विषयांत प्रवृत्त करूं गेलें तरी तीं स्वविषयास प्रवृत्त होईचनात. ५ नंतर शिष्य–बऱ्याच वेळानें इंद्रियें जेमतेम ठिकाणावर आणून–वेड्यावांकड्या भाषेनें गुरूस विनंति करूं लागला. ६ आनंदाच्या भरांतच उठला, आणि वरचेवर गुरूला प्रदक्षिणा घालूं लागला व (वारंवार) चरणांवर मस्तक ठेवूं लागला. ७ मन प्रेमरसानें भरून गेलें; दोन्ही करसंपुटें (हात) जोडलीं; आणि त्या शिष्यराजानें थोडथोडी भाषणास सुरवात केली. ८ हे अनाथांच्या बंधो ! हे करुणेच्या समुद्रा ! आपला जयजयकार असो. हे राजयोगिन् ! आपला महिमा प्रसिद्धच आहे. ९ जें अनादिकालापासून हरवलेलें, जें माझें मलाच चोरलेलें होतें, त्याची मला श्रीगुरुराजांनीं भेट करून दिली. १० महाराज ! आपल्या कृपादृष्टीनें मला अपरोक्ष वस्तूचें दर्शन झालें.

मज अपरोक्ष वस्तूसी भेटी ॥ उपमा नाहीं सृष्टीं॥ तया महासुखाची ॥११॥ तुझिया उपकारा ॥ उत्तीर्ण नव्हेगा दातारा॥ अर्पिजेति संभूतिसंभारा ॥ नानावस्तु ॥१२॥ ब्रह्म कालत्रयीं अबाधीत ॥ नानावस्तु त्या नाशिवंत ॥ तेणें होय उत्तीर्णत्व ॥ ऐसें केविं घडे ॥१३॥ एकें दिधला कल्पतरू ॥ तयासी दीजे दर्पणींचा हारू ॥ तेणें तो काय गव्हारु॥ उत्तीर्ण होईल ॥१४॥ चिंतामणीचियासाठीं ॥ देईजे फुकटीकाचवटी॥ तया उत्तीर्णपणाच्या गोष्टी ॥ काय करूं येतील ॥ १५ ॥ अहंतेचें काविरें ॥ जयाचिया दृष्टी उतरे ॥ तया सद्गुरूसी उत्तीर्ण

---

त्या महासुखाला त्या सृष्टीमध्यें उपमाच नाहीं ! ११ हे दातारा ! नाना प्रकारच्या वस्तु—नव्हे सृष्ट वस्तूंचे ढीगच्या ढीग जरी आपणांस अर्पण केले तरी आपल्या उपकाराची फेड व्हावयाची नाहीं. १२ ( कारण ) ब्रह्म ( खरी वस्तु ) हें तिन्ही काळीं अविनाशी—ज्याला कधींही विकार नाहीं—असें आहे. आणि इतर ज्या नानाप्रकारच्या वस्तु आहेत त्या सर्व नाशिवंत आहेत. तेव्हां त्यांनीं उपकाराची फेड कशी काय होणार ? १३ एकाला एकानें कल्पवृक्ष दिला म्हणून त्याला आरशांतला हार देऊं लागला तर तशानें तो मूर्ख त्याच्या उपकाराची कशी काय फेड करणार ? १४ कोणी चिंतामणि दिला म्हणून त्याच्या उपकाराच्या फेडीदाखल फुटकी—फुटणारी अशाश्वत कांच देऊं लागलें तर तें उतराई होणें काय कामाचें बरें ? १५ ज्याच्या दृष्टीस अहंकाराचें पिसें लागलेलें आहे, तो शहाणा सद्गुरूचा कसा काय उतराई हो-

चतुरें ॥ कैंचें होइजे ॥ १६ ॥ पशूसी सिंहाभिधान ॥ रंकाशी राणेपण ॥ जिवासि शिवपण ॥ गुरूचेनि प्रसादें ॥ १७ ॥ ह्मणोनि तनुमनधन ॥ गुरूसी कीजे समर्पण ॥ तरीच होइजे उत्तीर्ण ॥ कांहीं एक ॥ १८ ॥अहो भक्तिभाव गुरुवर्या ॥ हें नेणोनि जो प्राणिया ॥ गुरूसी न भजे तो ऋणिया ॥ जाय अधोगती ॥ १९ ॥ नाशिवंत हे उपचार ॥ गुरूसी वंचिती जे नर ॥ ते पाहुणे होती अविचार ॥ रवरवाचे ॥ २० ॥ आतां असो हे माझी अविद्या ॥ हेळाचि फाडिली सद्या ॥ जी भवरोगवैद्या ॥ श्रीगुरुराया ॥ २१ ॥ भवरोगें मी वेष्टिलों ॥देहप्रमाणें रोडेलों ॥ तो तुवां उपचारिलों ॥ निक्रियापरी

---

णार? १६ श्रीगुरूंच्या प्रसादानें पशूला सिंहाचें पद, रंकाला राज्यश्री आणि जीवाला शिवपण प्राप्त होतें. १७ ह्मणून सारें तनमनधनच जेव्हां श्रीगुरूला समर्पण करावें तेव्हांच कांहीं उतराई होतां आलें तर येईल. १८ अहो! गुरुराजांना भक्तिभावच पाहिजे. परंतु हें न जाणून जो प्राणी गुरूला भजत नाहीं, तो ऋणकरी अधोगतीलाच जावयाचा! १९ अशा नाशिवंत उपचारांनीं जे गुरूला ठकवितात ते मूर्ख पुरुष रौरवाचे पाहुणे होत. २० असो. आतां हें पुरे. परंतु महाराज! हे श्रीगुरुराया! हे संसाररूप रोग निवारण करणाऱ्या वैद्यराजा! आपण आतांच्या आतां एका क्षणांत माझी अविद्या—माझें अज्ञान—पार नाहींसें केलेंत! (ही गोष्ट खरी) २१ मी संसाररूप रोगानें अगदीं बेजार झालों होतों, देह हेंच प्रमाण मानून—किंवा देहाएवढा—रोडेजलों होतों, पण त्या मला आपण फारच उत्तमप्रकारचे

॥२२॥ अर्धमात्रा ब्रह्मरसें ॥ मातें उपचारिलें कैसें ॥ ब्रह्मगोळ कोंदतु असे ॥ माझेनि पुष्टपणें ॥ २३ ॥ कवण एकाचिया मरणा ॥ आड घालिती साधुजना ॥ तयाचिया उपकारा उत्तीर्णा ॥ तेणें केवीं होइजे ॥ २४ ॥ जन्ममरणांचिया कोडी ॥ चुकती जयाचिया प्रौढी ॥ तया गुरुदास्याची गोडी ॥ अनुपम्य कीं ॥२५॥ गुरुकृपेचें फळलेपण ॥ हेंचि तेथेंचि जाणा खूण ॥जें नीच नवें प्रेमलक्षण ॥ गुरुदास्याविषयीं ॥२६॥ मंत्रयंत्रादि उपदेशितें ॥ गुरु घरोघरीं असती आइते॥परी संसारमहादुःखातें॥ फेडूं न शकती ॥ २७ ॥ म्हणोनि दुर्लभ श्रीगुरू ॥ जो परब्रह्मेंसी करी साक्षात्कारू ॥ जयाचिये दृष्टिहेळाचि

उपचार केलेत.२२ब्रह्माच्या रसामध्यें अर्धमात्रा देऊन मला जो काय उपचार केलात तो काय सांगावा? त्याणें मला अशी कांहीं पुष्टता आली कीं, त्या पुष्टतेनें सारें ब्रह्मांड कोंडून राहिलें आहे.२३साधुजन एखाद्याचें मरणच चुकवितात, तेव्हां त्या त्याच्या उपकाराला त्यानें कशानें उतराई व्हावें२४आणि ज्याच्या महिम्यानें कोटीच्या कोटि जन्ममरणें चुकतात त्या गुरूच्या दास्याची गोडी काय सांगावी? केवळ अनुपमच २५ गुरुकृपेची प्राप्ति हीच त्याची खूण समजावी. तेथें गुरुदास्याविषयीं प्रेमलक्षण नित्य नवें असतें.२६ मंत्र यंत्र इत्यादिकांचा उपदेश करणारे गुरु घरोघरीं (हवेतितके) आयते-तयार-आहेत. परंतु संसाररूप महादुःखाचें निवारण कांहीं त्यांच्यानें होणार नाहीं. २७ म्हणून श्रीगुरु हे दुर्लभ होत. ज्यांच्या कृपाकटाक्षानें एका क्षणांत संसाराचा निरास होतो; आणि जे परब्रह्माचा साक्षात्कार करून

संसारू ॥ निरसोनि जाय ॥२८॥ आतां कैवल्याचा दानी॥ तूंचि एक त्रिभुवनीं ॥ संसारदैन्य जयाचेनी ॥ देशधडी होय ॥ २९ ॥ संसारदुःख विसरलों ॥ मी महासुखें निवालों ॥ तुमचा अनुग्रहो पावलों ॥ ह्मणोनी जी ॥ ३० ॥ आतां राउळें ऐसें करावें ॥ तें सुख मागुतें मज द्यावें ॥ तेंचि होवोनि असावें ॥ म्यां निरंतर ॥३१॥ तें सुख किमात्मक ॥ कैसें जाणावें म्यां सम्यक ॥ तरी जी कृपापूर्वक ॥ मज निरूपावें ॥३२॥ ऐसी प्रार्थना ऐकोन ॥ श्रीगुरु तेचि कामधेनु ॥ दुभे वोरसे दाटून ॥ शिष्यवत्सासी ॥३३॥ मग तो काय बोलिला योगींद्रु॥बारे तूं पूर्णचंद्रु॥तुवां माझा बोधसमुद्रु ॥कैसा उल्हासविलासी ॥ ३४ ॥ तुझिया गुणगणनेसी ॥ उपमा नाहीं को-

---

देतात. २८ तर महाराज! आपणच एक ह्या सबंध त्रिभुवनांत कैवल्याचे दाते आहां. कीं ज्याच्या योगानें संसाराचें दारिद्र देशोधडीस लागतें; २९ महाराज! मला आपला अनुग्रह झाला, ह्मणूनच मी महासुखानें शांत झालों व मला संसारदुःखाचा विसर पडला. ३० आतां गुरुमहाराजांनीं एवढें करावें कीं, तें सुख मला फिरून द्यावें आणि मीं निरंतर तेंच होऊन रहावें. ३१ तर महाराज! तें सुख कशाप्रकारचें आहे! तें मीं यथार्थरीतीनें कसें जाणावें! हें मला कृपा करून सांगा. ३२ ही प्रार्थना ऐकून श्रीगुरु हीच कोणी एक कामधेनु तिला पान्हा दाटला आणि ती शिष्यरूप वत्साला पाजूं लागली. ३३ मग ते योगिराज ह्मणाले बाबारे ! तूं पूर्णचंद्र होस. तूं माझ्या बोधसमुद्राला कशी भरती आणलीस ह्मणून सांगूं ! ३४

णासी ॥ तरी बोलिजेल ते निजमानसीं ॥ दृढ धरावें ॥२५॥
तुज महासुख ॥ लाधलें ॥ जें गुरुदास्य फळलें ॥ जें अनुभ-
वासि आलें ॥ परब्रह्म ॥ २६ ॥ जेथें मनासी नाहीं सौरसु॥
वाचेसी नाहीं प्रवेशु ॥ तो भेटला स्वयंप्रकाशु ॥ ब्रह्मानंदु
॥ २७ ॥ जें स्थूल ना रोड ॥ ठेंगणें ना वाड ॥ तें महासुख
गोड ॥ ईश्वरस्वरूप ॥ २८ ॥ जें परब्रह्म अखंड ॥ बोलतां वे-
दासि कुवाड ॥ तें अनुभवितां होय कावाड ॥ विषयसुख पैं
॥ २९ ॥ जेथें निद्रा ना जागणें ॥ करणें ना भोगणें ॥ तया
सुखासी चाखणें ॥ आपणचि ॥ ४० ॥ मी तूं हे कडसणी ॥
जेथें नाहीं काळीं कवणीं ॥ तिये परम निर्वाणीं ॥ लीन ज्ञा-

---

तुझ्या गुणांच्या गणनेला कोणतीच उपमा नाहीं. तर आतां सांग-ण्यांत येईल तें नीटपणें आपल्या ध्यानांत ठेव. २५ तुझें गुरुदास्य फळास आलें ह्मणून तुला महासुखाचा लाभ झाला आणि परब्रह्माचा अनुभव घडला.. २६ जेथला रसास्वाद मनाला कधीं ठाऊक नाहीं, वाचेचा जेथें रिघाव होत नाहीं, जो स्वयंप्रकाश, तो ब्रह्मानंद ( आज ) तुला भेटला. २७ जें स्थूळही नाहीं व रोड ( बारीक ) ही नाहीं; ठेंगणेंही नाहीं व उंचही नाहीं. तें मधुर असें महासुख ह्मणजे ईश्वरस्वरूपच होय. २८ ज्या अखंड परब्रह्माचें वर्णन करतांना चारी वेदांना कोडें पडलें, तेंच अनुभवास आल्यावर त्यापुढें विषय-सुखाची मातब्बरी ती काय! २९ जेथें झोंपही नाहीं व जागेपणही नाहीं; करणेंही नाहीं व भोगणेंही नाहीं; त्या सुखास चाखणार आपला आपणच! ४० जेथें कोणत्याही काळीं ‘ मी ’ ‘ तूं ’

लासि तूं ॥४१॥ कल्पनेचें आभाळ ॥ जेथें विरालें एकवेळ ॥ तें चिदाकाश निर्मळ ॥ तुज प्रकाशिलें ॥ ४२ ॥ हें महावाक्याचें रहस्य ॥ जें जीवेश्वरांचें सामरस्य ॥ जेणें उपजे वैरस्य॥ संसारसुखाचें ॥ ४३ ॥ हाचि शिवशक्तीचा समयोगू ॥ यातेंच बोलिजे राजयोगू ॥ जेणें फिटे भवरोगू ॥ हेळामात्रें ॥ ४४ ॥ हे निर्विकल्पसमाधी ॥ भवरोगा दिव्य औषधी ॥ जेणें तुटे आधिव्याधि ॥ विषयाची पैं ॥ ४५ ॥ हाचि तुज अलभ्य लाभ जाहला ॥ जो परमात्मा भेटला ॥ क्षण एकु सुकाळु जाला ॥ महासुखाचा ॥ ४६ ॥ ऐसी हे ब्रह्मस्थिति॥ येथें मज व्हावी दृढ मती॥ऐसी तुझी चित्तवृत्ति ॥

---

हा भेद नाहीं, त्या परम निर्वाणाच्या ठिकाणीं तूं लीन झालास. ४१ जेथें एकेच वेळीं कल्पनेचें आभाळ पार वितळून गेलें. तें निर्मळ असें चिदाकाश तुजपुढें प्रकाशमान झालें. ४२ हेंच महावाक्याचें रहस्य होय. कीं जे जीव व ईश्वर यांचें सामरस्य किंवा ऐक्य, जेणेंकरून संसारसुखाचा विरसपणा मनांत बाणतो. ४३ ( आणि ) हाच शिवशक्तीचा समयोग होय. ह्यालाच राजयोग असें नांव आहे. जेणेंकरून क्षणमात्रांत संसाराची व्याधि निर्मूळ होते. ४४ निर्विकल्प समाधि हीच. हीच संसाररूप रोगावरची दिव्य औषधी कीं जिच्या योगानें विषयाचीही पण आधिव्याधि नाहींशी होते. ४५ हाच अलभ्य लाभ तुला झाला, जेणेंकरून तुला परमात्म्याची भेट झाली, आणि क्षणभर महासुखाचा सुकाळ होऊन गेला. ४६ अशा प्रकारची जी ही ब्रह्मस्थिति तेथें आपली बुद्धि दृढ व्हावी असा भाव तुझ्या

तरी अवधारिजे ॥ ४७ ॥ येविषयीं असे उपावो ॥ जेणें होय स्वरूपीं सद्भावो ॥ तोचि धरी येरू सांडी वावो ॥ मिथ्याभ्रमु ॥ ४८ ॥ व्हावी विषयीं विरक्ती ॥ चित्तासी प्रत्यक्वृत्ती ॥ करावी ईश्वरभक्ती ॥ अनन्यभावें ॥ ४९ ॥ जो श्रीगुरूचा अनुग्रहीत ॥ तेणें सेवावा एकांत ॥ तेथें चिंतावा गुणातीत ॥ परमपुरुष ॥ ५० ॥ जे जे वृत्ती उठी ॥ ते ते देखिजे वेगळाली दिठी ॥ तरी कल्पना हिंपुटी ॥ होऊनि पुरे ॥५१ ॥ मनासरिसें धांवतां ॥ न तुटे संसारव्यथा ॥ तेणेंसि वगळें होतां ॥ महासुख ॥५२॥ जो जो विषय आठवेल ॥ तो तो मिथ्यात्वें विदारिजेल ॥ तरी सहजचि उपजेल॥ सुलीनता ॥५३॥ ह्म-

---

चित्तांत आला आहे, तर ऐक. ४७ तर ह्याला एकच उपाय आहे. तो हा कीं, स्वरूपाच्या ठिकाणीं सद्भावना तीच धरावी. इतर मिथ्या भ्रम व्यर्थ आहे, तो टाकून द्यावा. ४८ विषयाच्या ठिकाणीं विरक्ति धरावी, चित्ताची प्रत्यक् वृत्ति करावी, आणि अनन्यभावेंकरून ईश्वरभक्ति करावी. ४९ ज्याच्यावर श्रीगुरूचा अनुग्रह झाला, त्यानें एकांतवास सेवन करावा. आणि तेथें त्या गुणातीत पुरुषाचें चिंतन करावें. ५० जी जी वृत्ति उठेल ती ती निराळ्याच दृष्टीनें पहावी ह्मणजे कल्पना बापुडवाणी होऊन जिरून जाईल. ५१ मनाबरोबर धांवूं लागलें ह्मणजे संसारव्यथा संपावयाची नाहीं; आपण त्याच्यापासून वेगळें झालों ह्मणजे महासुख ठेवलेलें आहे. ५२ जो जो विषय मनांत येईल तो तो मिथ्या ह्मणून जर आपण त्याचा भेद करीत गेला तर आपोआपच सुलीनता प्राप्त होईल. ५३ ह्मणून संकल्प उठला

णोनि जो संकल्प उठी ॥ नव जावें तयापाठीं ॥ वळावी मा·
गुती दृष्टी ॥ निरालंबीं ॥ ५४ ॥ तें निरालंब निर्गुण ॥ जि-
वाचें जन्मस्थान ॥ म्हणूनि व्हावें लीन ॥ तेथेंचि पैं ॥ ५५ ॥
मी ब्रह्म येणें आकारें ॥ ब्रह्मरूप स्फूर्तिस्फुरे ॥ तें विचारितां
तत्त्व निर्धारें ॥ उठे निरालंबीं॥५६॥ आपुलिये जन्मभूमिके॥
वस्ती बहुतें पुण्यें ठाके॥तेथें निमिजे तरी चुके ॥ अधःपतन
॥ ५७ ॥ देहाचे जन्मभूमिकेचें ॥ एवढें महिमान साचें ॥ तरी
जन्मस्थान जिवाचें ॥ तें अगाध महिमान कीं ॥ ५८ ॥ नद्या
उगमीं स्थिरावती ॥ तरी तेचि समुद्र होती ॥ आधार कां
नव्हती ॥ आणिका नदींसी ॥ ५९ ॥ तैसा आपुला उगवु ॥

---

कीं, त्याच्या पाठीमागें न जातां दृष्टि माघारी—निरालंबस्वरूपाकडे वळवावी. ५४ तें निरालंब आणि निर्गुण स्वरूप हेंच जिवाचें जन्म-स्थान आहे, म्हणून तेथेंच लीन व्हावें. ५५ मी ब्रह्म ह्या भावनेनें ब्रह्मरूप स्फुरण होऊं लागतें. त्याचा तत्त्वनिश्चयेंकरून विचार केला म्हणजे तें निरालंब स्वरूपामध्येंच उठलेलें असतें ( असें कळून येतें. ) ५६ आपल्या जन्मस्थानीं बहुत पुण्याईनें आ-पलें वास्तव्य घडतें. तेथें आपणास विश्रांति मिळाली म्हणजे अधोगति चुकते. ५७ देहाच्या जन्मस्थानाचा जर खरोखर एवढा महिमा आहे तर जीवाच्या जन्मस्थानाचा महिमा अगाधच असला पाहिजे. ५८ नद्या उगमाच्या ठिकाणींच जर स्थिर झाल्या असत्या तर त्याच समुद्र झाल्या असत्या. आणि मग त्या इतर नद्यांनाही आधार झाल्या नसत्या काय ? ५९ त्याचप्रमाणें त्या जीवानें जर

जरी न सोडिता हा जीवु ॥ तरी अंगासि येता थोरावु ॥ ब्रह्मपणाचा ॥ ६० ॥ ह्मणूनि कल्पनेसी मारू ॥ करावा इंद्रियांचा संहारू ॥ तरी जीवब्रह्मासी सिनारू ॥ कैंचा उरे ॥६१॥ अनुभवाची एक खूण ॥ जेणें प्रपंचासी होय संहारण तेथींची विवंचना सांगेन ॥ ते ऐक पा तूं ॥६२॥ स्वरूपोन्मुख स्फुरण ॥ हें मायेचें लक्षण ॥ अविद्या ते जाण ॥ विपरीत कल्पना ॥६३॥ मनचक्षुरादिकें ॥ इंद्रियें हीं अनेकें ॥ तीं सुखदुःखदायकें ॥ अविद्याजनितें ॥६४॥ ह्मणूनि कल्पनेच्या ग्रासीं ॥ नासे माया अविद्येशीं ॥ तेथें संहार इंद्रियांसी ॥ आपैसें होय ॥६५॥ जैसें पाणीचोराच्या द्वारीं ॥ वरील रंध्र दा-

आपला उगम सोडला नसता तर ब्रह्मत्वाचा महिमा त्याच्या अंगीं ( सहज ) आला असता. ६० ह्मणून कल्पना मारली, आणि इंद्रियें होतीं कां नव्हतीं अशीं करून टाकलीं ह्मणजे मग जीव व ब्रह्म ह्यांत भेद कसा उरेल? ६१ जी अनुभवाची खूण, जिच्या योगानें प्रपंचाचें निर्मूळ होतें, तेथचा विचार आतां तुला सांगतों. तो तूं ऐक. ६२ स्वरूपाविषयीं पराङ्मुखवृत्ति हेंच मायेचें लक्षण होय. आणि विपरीत कल्पना ती अविद्या होय. ६३ मन, चक्षु आदिकरून जीं हीं अनेक इंद्रियें तींच सुख व दुःख देणारीं होत. तीच लोकांतली अविद्या होय. ६४ ह्मणून कल्पनेचाच ग्रास केला कीं अविद्येसहवर्तमान माया आटोपली! आणि मग इंद्रियांचाही आपोआपच संहार होतो. ६५ ज्याप्रमाणें पाणीचोरनामक पात्राच्या ( अनेक ) द्वारांपैकीं फक्त वरचें रंध्र ( द्वार ) बंद केलें ह्मणजे

टिजे जरी ॥ येरें मोकळींच परी ॥ धरावीं न लगती ॥ ६६ ॥
तैसी कल्पना विराली ॥ तेथं संसृति निमाली ॥ येथें आक्षे-
पीं स्फुरली ॥ मज युक्ति एक ॥६७॥ सुषुप्तीअवस्थे कल्पना॥
निःशेष होय लीना ॥ तरी जीवाचे संसारणा ॥ कां न चुके
चि ॥६८॥ ऐशा आक्षेपीं उत्तर ॥ बोलिजेल सुंदर ॥ तें ऐक
तूं चतुर ॥ जेणें संदेह फिटे ॥६९॥ जीवासी सुषुप्तीदशे ॥ क-
ल्पना कीर नसे ॥ परी अज्ञान न निरसे ॥ तेणें संसृती होय
॥७०॥ सषुप्ती आत्मा नेणिजे ॥ तैसेचि होऊनी असिजे ॥
तेथेंचि स्वानुभव बोलिजे ॥ कवणेपरी ॥ ७१॥ आत्मविषयीं

---

बाकीचीं जरी मोकळीं असलीं तरी तीं बंद करावीं लागत नाहींत.
( तीं बंद न करतांच आंतील पाणी सोडावयाचें बंद होतें. ) ६६
त्याचप्रमाणें कल्पना नाहींशी झाली कीं, संसारही सुटला ह्मणून
समजावें. आतां येथें मला एक आक्षेपाची कल्पना सुचली आहे.
६७ ( ती ही कीं, ) निद्रावस्थेमध्येंही कल्पना अगदीं लीन झाले-
ली असते. मग त्यानें जिवाचा संसार कां चुकत नाहीं ? ६८ त्या
आक्षेपावर आतां सुरेख उत्तर देण्यांत येईल. तरी हे चतुर पुरुषा !
तें तूं श्रवण कर. त्याच्या योगानें तुझा संशय फिटेल. ६९ निद्रा-
दशेंत जीवाला कल्पना ह्मणून खरोखर नसते खरी; पण अज्ञान
कांहीं गेलेलें नसतें. ह्मणून पुन्हां संसार आलाच ! ७० झोपेंमध्यें
आत्म्याचें अज्ञान असतें तें तसेंच्या तसेंच असतें. त्यालाच ' स्वा-
नुभव ' असें कसें ह्मणावें ? ७१ आत्मविषयक अज्ञान जोंपर्यंत
क्षीण झालें नाहीं, तोंपर्यंत जीवाला जन्ममरण कांहीं चुकावयाचें

अज्ञान ॥ जंववरी नव्हे क्षीण ॥ तंव न चुके जन्ममरण ॥ जीवासी पैं ॥ ७२॥ श्रीगुरूचेनि कृपाभरें ॥ फिटे अज्ञान भुररं ॥ मग सच्चिदानंद उरे ॥ परब्रह्म तें ॥ ७३ ॥ सुषुप्ती-काळीं कल्पना ॥ अज्ञानामाजी होय लीना ॥ तेणें अज्ञानेशीं जाणा ॥ वर्ते आत्मग्रासीं ॥७४॥ तेथें अज्ञान न मरे ॥ ह्मणूनि संसार नसरे ॥ तरी आक्षेपाचीं उत्तरें ॥ निरर्थकचि ॥७५॥ जीवां वृक्षजाती ॥ निरंतर वर्ते सुषुप्ती ॥ तेथें कल्पने-सी वस्ती ॥ अज्ञानगर्भी ॥७६॥ अनुभवाची खूण ॥ ते अना-रिसी जाण ॥ तेथें अज्ञानसहित कल्पना ॥ विरे स्वस्वरूपीं ॥७७॥ श्रीगुरूच उपदेशें अज्ञान मरे आपैसें ॥ तेथें परब्रह्म प्र-

---

नाहीं. ७२ ( परंतु ) श्रीगुरूच्या अतुल कृपेनें अज्ञानाचें वारें पार निघून जातें; आणि मग केवळ तें सच्चिदानंदस्वरूप परब्रह्मच राहतें.७३ निद्राकाळीं कल्पनाही अज्ञानामध्यें लीन होते; आणि अज्ञानासह-वर्तमान ती आत्म्याच्या ठिकाणीं असते हें ध्यानांत ठेव. ७४ तेथें अज्ञान हें कांहीं लयास जात नाहीं, ह्मणून संसारही पण सु-टत नाहीं. वास्तव आक्षेपाचीं उत्तरें सुद्धां निरर्थकच होत. ७५ जीवांस आणि वृक्षजातांससुद्धां झोंप ही नेहमींच आहे. आणि तेथें अज्ञानाच्या गर्भात -पोटांत--कल्पनेची वस्ती असते. ७६ अनुभ-वाची खूण ती निराळीच आहे. तेथें कल्पना ही अज्ञानासहवर्तमान स्वरूपामध्यें लीन होते. ७७ श्रीगुरूच्या कृपेनें--बोधानें--अज्ञान आपोआप नाश पावतें, आणि तेथें कल्पनातीत परब्रह्म प्रकाशमान

काशे ॥ कल्पनातीत ॥७८॥ अनुभवाचिया भूमिका ॥ चारी गा शिष्यटिळका ॥ सांगिजती त्या ऐका ॥ एकाग्र होऊनी ॥७९॥ प्रथम जाण विक्षेपता॥दुसरी ते गतायाता॥तिसरी ते संश्लिष्टता॥ चौथी सुलीनता प्राप्तदशेची ॥ ८० ॥ करितां ब्रह्माभ्यासु॥ चित्तासी होय स्वरूपीं सौरसु ॥ तें सांडूनि करी ह्व्यासु ॥ सांसारिक ॥ ८१ ॥ मग सावध होईजे ॥ चित्तासी मागुती वळविजे ॥ ब्रह्माभ्यास कीजे ॥ ते विक्षेपता पैं ॥ ८२ ॥ गतायाता ते ऐसी ॥ चित्तस्वरूपीं समरसी ॥ तेथूनि उठे परी आपैसी ॥ बैसे स्वरूपीं ॥ ८३ ॥ मन स्वरूपीं लाविजे ॥ तेणें तेथेंचि असिजे ॥ आनंदें फुंजों लागिजे ॥ ते संश्लिष्ट-

---

होतें. ७८ हे शिष्यतिलका! अनुभवाच्या चारी भूमिका (अवस्था) आतां सांगण्यांत येतील, त्या एकाग्र मन करून ऐक. ७९ पहिली 'विक्षेपता' हें लक्षांत असूं दे. दुसरी 'गतायाता' होय. तिसरी 'संश्लिष्टता;' आणि चौथी प्राप्तदशेची 'सुलीनता' होय. ८० ब्रह्माचा अभ्यास करूं लागलें ह्मणजे चित्ताला स्वरूपाची गोडी लागते, तें टाकून देऊन सांसारिक असतो तों (मध्येंच) ह्व्यासांत पडतो. ८१ मग सावध होऊन चित्ताला माघारें वळवावयाचें आणि ब्रह्माभ्यास करावयाचा हीच 'विक्षेपता' होय. ८२ 'गतायाता' ती अशीः—चित्त स्वरूपाच्या ठिकाणीं समरस--अगदीं एकवट-लीन--करावयाचें, तें तेथून चळतें खरें, पण पुन्हां आपोआपच स्वरूपीं लागतें. ८३ मन स्वरूपीं लावावयाचें, आणि तें तेथेंच ठेवावयाचें ह्मणजे तें आनंदानें (स्वरूपानंदानें) उसळ्या खाऊ लागतें.

ता पैं ॥ ८४ ॥ ब्रह्मीं चित्त निःशेष मुरे ॥ केवळ ज्ञप्तिचि उरे ॥ सुखाचा फुंज उतरे ॥ ते सुलीनदशा ॥ ८५ ॥ ऐसा ब्रह्माभ्यासकरितां ॥ भूमिका जाणवती समस्ता ॥ मग अनायासें तत्त्वता ॥ पावे योगिराज ॥ ८६॥ अथवा इंद्रियें कां मारावीं ॥ जेथें धांवती तेथेंचि धरावीं ॥ सुलीनता पावावी ॥ रोकडीची ॥ ८७ ॥ ना तीं इंद्रियें ना ते विषय सुखें ॥ तेथें कवण कवणातें देखे ॥ चित्त मुरे मग ओळखे ॥ कवण कवणातें ॥ ८८ ॥ मंदमतीचिया आक्षेपा ॥ हा प्रस्ताव सांगितला बापा ॥ येरासि कायसें पा ॥ सायास हो ॥८९॥ आतां असो

---

हीच संश्लिष्टता होय. ८४ ब्रह्मामध्यें चित्त पूर्णपणें लीन होतें केवळ ज्ञप्तिमात्र उरतें, आणि त्या सुखाची--आनंदाची--उसळ जिरून जाते. तीच सुलीनावस्था. ८५ अशाप्रकारें ब्रह्माभ्यास करूं लागलें ह्मणजे सर्व भूमिकांचें ज्ञान होतें. मग योगिराज अनायासेंच तत्त्वाला जाऊन पोंचतो. ८६ अथवा इंद्रियें तरी कां मारावीं, तीं जेथें जेथें जातील तेथें तेथेंच त्यांस धरून ठेवावींत, ह्मणजे तरी रोकडीच सुलीनता प्राप्त होईल. ८७ तेथें इंद्रियांचेंही नांव नाहीं, व विषयसुखाचेंही नांव नाहीं, तेथें कोण कोणाला पाहणार? चित्तच मुळीं मुरून गेल्यावर मग कोणी कोणाला ओळखावयाचें ? ८८ बाबा ! मंदबुद्धीच्या आक्षेपासाठीं हा एवढा प्रस्ताव करावा लागला. इतरांना येवढे सायास कशाला पाहिजेत? ८९

हा प्रसंगु ॥ तुज निरोपिला राजयोगु ॥ हें स्मरे तो चांगु ॥ बहुतांमध्यें ॥ ९० ॥ निमिषोन्मेषाचें अर्ध ॥ चित्त स्वरूपीं होय सावध ॥ तरी पापराशी होती दग्ध ॥ क्षणमात्रें ॥९१॥ जैसें स्वप्नीं घडे दुरित ॥ तें प्रबोधीं होय भस्मभूत ॥ तैसें निजबोधें समस्त ॥ पातक जळे ॥ ९२ ॥ चित्त अवलंबनें-वीण ॥ जरी न राहे स्थिरपण ॥ तरी देवाचें सगुण ॥ स्वरूप चिंतावें ॥ ९३ ॥ तेथें हृदयाच्या शेजारीं ॥ षोडशोप-चारें पूजा करी ॥ उपासावा श्रीहरी ॥ अनन्यभावें ॥ ९४ ॥ रजस्तमीं जें मेळ ॥ तें चित्त वेगें होय निर्मळ ॥ मग निर्गुणीं

---

असो. आतां हा प्रसंग पुरे. तुला जो हा राजयोग सांगितला हा जो ध्यानांत धरील तो बहुत लोकांमध्यें उत्तम म्हणून समजावा. ९० अर्धनुर्धे पात्यास पातें लागतें न लागतें इतक्या अल्प वेळा-इतकी जरी मनाला स्वरूपाचे ठिकाणीं जागृति घडली तरी क्षणमा-त्रांत सर्व पापांच्या राशी दग्ध होतात. ९१ ज्याप्रमाणें स्वप्नांत पा-तक घडलें तर जागृतावस्थेंत तें भस्मीभूत होतें, त्याचप्रमाणें आत्म-बोधानें सर्व पातक जळून खाक होतें. ९२ चित्त जर आश्रयाशिवाय स्थिर रहातच नसेल तर देवाच्या सगुण स्वरूपाचें चिंतन करावें. ९३ तेथें अंतःकरणाच्या शेजवर षोडशोपचारपूर्वक पूजन करून अनन्यभावानें श्रीहरीची उपासना करावी. ९४ रजोगुण आणि त-मोगुण जेव्हां धुवून जातील, तेव्हांच चित्त झपाट्यानें निर्मळ होईल. आणि मग निर्गुण स्वरूपाच्या ठिकाणीं आपोआपच प्रबळ भक्ति

भक्ती प्रवळ ॥ आपसयां होय ॥ ९५ ॥ निर्गुणीं परमपुरुषीं ॥ जीवा ऐक्य होय शेखीं ॥ तये महासुखीं ॥ समरसे तो ॥९६॥ नातरी अष्टांगयोगें ॥ कां भक्तिप्रसंगें ॥ जीव परमात्मासंगें ॥ तदात्मता पाव ॥ ९७ ॥ तंव शिष्यें विनविजे ॥ जीवशब्दें काय बोलिजे ॥ ब्रह्म हें नांव ठेविजे ॥ कवणासी जी ॥९८॥ परमात्मा तो कवण ॥ सगुण कीं निर्गुण ॥ तो कैसा किं लक्षण ॥ सांगावें जी ॥ ९९ ॥ माया ते कवण शक्ति ॥ तियेसी कैसी स्वरूपस्थिती ॥ अविद्येची कैसी रीती ॥ किमाश्रय ते ॥ १०० ॥ प्रपंच कवणें निर्मिला ॥ कासयाचा उभारला ॥ जीवासी संसार नाथिला ॥ किं निमित्त जी ॥१

---

उत्पन्न होईल. ९५ शेवटीं त्या निर्गुण परम पुरुषाच्या ठिकाणीं जीव ऐक्य पावतो आणि तो त्या महासुखामध्यें समरस—अगदीं एकवट होऊन राहतो.९६ किंवा अष्टांगयोगेंकरून अथवा भक्तीच्या बळानें जीव व परमात्मा ह्यांची भेट होऊन तो तादात्म्य पावतो. ९७तेव्हां शिष्य विनवूं लागला कीं, महाराज! जीव काय समजावयाचें ! ब्रह्म कशाला म्हणावयाचें ? ९८ परमात्मा तो कोण ? तो सगुण आहे कां निर्गुण आहे ? महाराज ! तो कसा आहे ? व त्याचें लक्षण काय ? तें कथन करावें. ९९ माया ही कसली शक्ति आहे ? तिचें स्वरूप व स्थिति कशी आहे ? अविद्येचा प्रकार काय ? आणि तिला आश्रय कोणाचा ? १०० प्रपंच कोणीं केला ? आणि त्याची उभारणी कशी झाली ? तसेंच महाराज ! जिवाच्या मागें हा नसताच संसार काय म्हणून ? १०१ महाराज ! ह्या प्रश्नांचें निरूपण करून

जी हे प्रश्न निरूपावे ॥ माझे मनोरथ पुरवावे ॥ मातें सर्वज्ञ करावें ॥ कृपानिधी ॥ २ ॥ ऐसी शिष्याची विनंती ॥ ऐकोनि श्रीगुरु काय बोलती ॥ श्रोतीं अवधारावें चित्तीं ॥ म्हणे मुकुंदराज ॥३॥ इति श्रीमद्विवेकसिंधौ सृष्टिक्रमे गुरुशिष्यसंवादे स्वानुभवाद्दातिकरणं नाम द्वितीयप्रकरणं समाप्तं ॥

---

माझे मनोरथ पूर्ण करावे, आणि हे कृपानिधे! मला सर्वज्ञ करून सोडावें. २ मुकुंदराज म्हणतात अशी शिष्याची विनंति ऐकून पुढें श्रीगुरु काय म्हणाले तिकडे श्रोत्यांनी चित्त द्यावें. १०३

---

# प्रकरण तिसरें.

## विषय—तत्वसृष्टि कथन.

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ऐकें शिष्य शिरोमणी ॥ धन्यधन्य तुझी वाणी ॥ आठवे येथींच्या प्रश्नीं ॥ परमपुरुष तो ॥१॥ स्वरूपांबरीं निर्गुणीं ॥ उमटती जीवेश्वरांच्या श्रेणी ॥ तेथींची करावी उपलवणी ॥ स्वानुभवें कीं ॥२॥ पाथरवटाची टांकी॥ जरी झाली तिखी निकी ॥ तथापि करूं नये मौक्तिकीं ॥ रंध्रशलाका ॥ ३ ॥ तैशा देशवळा युक्ती ॥ घेऊं नये ब्रह्मसंविती ॥ तेथें विवेकाची संपत्ती ॥ निकी व्हावी लागे ॥४॥ म्हणोनि विवेकाचे कान ॥ करूनि ऐक निरूपण ॥ अनुक्रमें

---

श्रीगणेशाय नमः—हे शिष्यशिरोमणे ! ऐक. तुझी वाणी धन्य धन्य आहे ! [ कारण ] आजच्या ह्या तुझ्या प्रश्नांनीं त्या परमपुरुषाचें स्मरण होतें. १ त्या निर्गुण स्वरूपाच्या चांदव्यावर जीवेश्वरांच्या पंगतीच्या पंगती बसलेल्या आहेत. त्यांचा विस्तार करावयाचा म्हणजे स्वानुभवानेंच केला पाहिजे. २ पाथरवटाची टांकी कितीही जरी तीक्ष्ण झाली तरी ती मोत्याला भोंक पाडण्याची सळई करून कांहीं उपयोगाची नाहीं. ३ त्याप्रमाणेंच आपलें प्राकृत ज्ञान कांहीं ब्रह्मज्ञानाच्या उपयोगीं पडावयाचें नाहीं. तर तेथें विवेकाचेंच भांडवल भरपूर पाहिजे. ४ म्हणून विवेकाचेच कान करून निरूपण

तुझे प्रश्न ॥ सांगिजेती ॥५॥ जें शक्तिचक्रासी वेगळ ॥ जें ज्ञप्ति-
मात्र केवळ ॥ तें निजानंद निर्मळ ॥ परब्रह्म जाणावें ॥६॥ दृश्य
द्रष्टा दर्शन ॥ हे त्रिपुटी जेथें क्षीण ॥ तें परब्रह्म जाण ॥ अनिर्देश्य
॥७॥ ज्ञाता ज्ञान ज्ञेय ॥ हें जेथें नाहीं त्रितय ॥ तें परब्रह्म अप्र-
मेय ॥ जाणावें पैं ॥ ८॥ ज्ञान ह्मणूं तरी नाहीं जाणिव ॥
अज्ञान ह्मणूं तरी नाहीं नेणिव ॥ अभाव ह्मणूं तरी नवल ठेव॥
आनंदाची॥९॥ अभाव ह्मणिजे तें शून्य ॥ शून्यवादीयाचें मत
तें जघन्य ॥ ह्मणूनि जगीं तेचि गा धन्य ॥ ब्रह्मविद जे ॥१०॥
आहे ह्मणूं तरी कैसेनि ध्यावें ॥ नाहीं ह्मणूं तरी कैसेनि

---

एक. [ आतां ] तुझे प्रश्न ओळीनेंच सांगत जाऊं. ५ जें शक्तिच-
क्राच्या पलीकडचें, जें केवळ ज्ञप्तिमात्रच, तें निजानंद आणि नि-
र्मळ स्वरूप परब्रह्म होय, हें लक्षांत असूं दे. ६ दृश्य, द्रष्टा, आणि
दर्शन, ही त्रिपुटी जेथें मावळते तें अनिर्देश्य [ज्याचा निर्देश करतां
येत नाहीं तें—अनिर्वचनीय ] परब्रह्म हें ध्यानांत आण. ७ ज्ञाता,
ज्ञान, ज्ञेय हें त्रिकूट जेथें नाहीं, तेंच अप्रमेय परब्रह्म असें समज.
८ ज्ञान ह्मणावें तर जाणीवही नव्हे; अज्ञान ह्मणून ह्मणाव-
यास जावें तर नेणिवही नव्हे. बरें; हीं दोन्हीही नव्हेत ह्मणून अ-
भाव ह्मणावा तर आश्चर्य हें आहे कीं, ती आनंदाची ठेव आहे.९
अभाव ह्मणजे शून्य, ह्मणून शून्यवाद्याचें मत अगदीं कुचकामाचें—
निंद्य. ह्यासाठीं जे ब्रह्मज्ञानी आहेत तेच जगांत धन्य होत. १०
आहे ह्मणावें तर ध्यावयाचें कसें ? नाहीं ह्मणावें तर सोडावयाचें
कसें [ कारण तुमच्या आजूबाजूला, वर, खालीं, व आंतही तेंच

सांडावें ॥ असो हें ब्रह्म अनुभवावें ॥ जयाचें तेणेंचि ॥ ११ ॥ जें निद्रिस्थातें चेववी ॥ चेइलीयातें जाणवी ॥ जागलीयातें भोगवी ॥ परी अक्रिय तें ॥ १२ ॥ स्फटिकशिळेचें पोट ॥ जैसें निरंतर निघोट ॥ तैसें चैतन्य एकदाट॥ परब्रह्म तें ॥ १३ ॥ नातरी गगनाऐसें पोकळ ॥ व्यापक परी व्याप्यासि वेगळ ॥ निजप्रकाशें सोज्वळ ॥ आपण पैंची ॥ १४ ॥ ब्रह्माविष्णुमहेश्वर ॥ करितां शिणती निजव्यापार ॥ मग सेविती विश्राममंदिर ॥ परब्रह्म तें ॥ १५ ॥ जेथें विद्या ना अविद्या ॥ जें अनुपम्य स्वसंवेद्या ॥ तें जाणावें सुविद्या ॥ ब्रह्मस्वरूप तूं ॥ १६ ॥ झाला पां सर्वेश्वरु ॥ धरिला जाणिवेचा

---

भरून राहिलें आहे. ]१ असो. तर हें ब्रह्म जें आहे, तें ज्याचें त्यानेंच अनुभवावें. ११ जें निजलेल्यास चावळवतें, चावळलेल्यास जागृती देतें, आणि जागृताला भोग भोगावयाला लावतें. आणि असें असून तें [ पुन्हां ] अक्रिय! १२ स्फटिक शिळेचें पोट जसें निरंतरचेंच निघोट—अगदीं तुळतुळीत असतें, तसेंच एकदाट भरून राहिलेलें चैतन्य तेंच परब्रह्म होय. १३ किंवा आकाशाप्रमाणें पोकळ व तसेंच व्यापकही खरें पण व्यापलें जाणारें मात्र नव्हे. आपल्या प्रकाशानें आपणच सोज्ज्वळ झालेलें! १४ ब्रह्मा, विष्णु आणि शंकर आपआपलें कर्तव्य करून थकले ह्मणजे मग जेथें विश्रांतीचें स्थान ह्मणून विसाव्यास येतात तेंच परब्रह्म होय. १५ विद्या अविद्या रहित, उपमारहित, स्वतः जाणण्यास योग्य असें ब्रह्म तू जाण. १६ सर्वेश्वर जरी झाला तरी देखील तो जर जाणिवेचा अहंकार धारण करील तर

अहंकारु ॥ तरी तोही नेणे पारु ॥ तया स्वरूपाचा ॥१७॥ म्हणूनि अहंकार गळे ॥ आणि कल्पना मावळे ॥ तरीच ब्रह्म आकळे ॥ स्वानुभवासी ॥१८॥ ब्रह्मगोळकाचें सहस्र ॥ व्यापूनि सबाह्यांतर ॥ आमर्केचि उरलें निरंतर ॥ ब्रह्मस्वरूप जें ॥ १९ ॥ गगनीं नाथिलें अभाळ ॥ तैसें ब्रह्मीं मायापडळ ॥ तें विगालिया केवळ ॥ ब्रह्माचि असे ॥ २० ॥ ब्रह्मादिक सकळें ॥ रजस्वला व्याली डिसाळें ॥ तिया मायादेवीसी नातळे ॥ परब्रह्म तें ॥ २१ ॥ तें ध्यानेंवीण ध्यायिजे ॥ चिंतणेंवीण चिंतिजे ॥ जाणणेंवीण जाणिजे ॥ परब्रह्म तें ॥ २२ ॥ हें परब्रह्म निर्गुण ॥ सर्वेश्वराचें निजस्वरूप जाण ॥

---

त्याला सुद्धां त्या स्वरूपाचा अंत लागावयाचा नाहीं. १७ म्हणून अहंकार जेव्हां झडून जाईल, आणि कल्पना मावळेल तेव्हांच स्वानुभवपूर्वक ब्रह्माचें आकलन होईल. १८ हजारों ब्रह्मांडें आंतून बाहेरून व्यापून टाकून जें निरंतर सर्वत्वानें उरलेलें आहे, तेंच परब्रह्मस्वरूप होय. १९ आकाशांत नसतेंच—मिथ्या—नाशिवंत- आभाळ उठतें त्याप्रमाणें ब्रह्मावर मायेचें पलट आलेलें आहे. तें नाहींसें झालें कीं बाकी निवळ ब्रह्मच आहे. २० ब्रह्मादि हें सर्व जगडंबर हीं अस्पर्श्य मायादेवी प्रसवली आहे. तिचा विटाळही त्या परब्रह्माला खपत नाहीं. २१ तें ध्यानाशिवायच ध्यायिलें पाहिजे; चिंतनाशिवायाच तें चिंतिलें पाहिजे; आणि ज्ञानाशिवायच तें जाणलें पाहिजे, अशा प्रकारचें तें परब्रह्म होय. २२ हें निर्गुण परब्रह्म सर्वेश्वराचें निजस्वरूप होय, हें ध्यानांत ठेव. जें मूळमायेचें अधिष्ठान पूर्ण

मूळमायेसी अधिष्ठान ॥ पूर्ण चैतन्य जें ॥ २३ ॥ माया ब्रह्मींचा विवर्त ॥ ऐसें बोले वेदांत सिद्धांत ॥ जो उपनिषदांचा मथितार्थ ॥ प्रमाणसिद्ध ॥ २४ ॥ वेदविरुद्ध मत ॥ तें पाखांड जाण निश्चित ॥ म्हणोनि सांडी ते अपसिद्धांत ॥ विवर्त ऐक ॥ २५ ॥ ब्रह्म निर्विकार जैसें ॥ तैसें असतचि असे ॥ तेथें अन्यथा आभास भासे ॥ तो तद्विवर्त गा ॥२६॥ निजाकारें विचरत ॥ रविप्रकाशें असे वर्तत ॥ तेथें जळाभास भासत ॥ तो तद्विवर्त जैसा ॥ २७ ॥ नातरी जैसा दोरु ॥ तेथींचा न मोडे आकारु ॥ नाहीं तोचि आभासे थोरु ॥ म-

---

चैतन्यच होय. २३ माया हा ब्रह्माच्या ठिकाणीं उत्पन्न झालेला विवर्त ह्मणजे भास होय असा वेदांताचा सिद्धांत आहे. उपनिषदांचाही प्रमाणसिद्ध मथितार्थ तोच आहे. २४ जें वेदाच्या विरुद्ध मत तें निश्चयेंकरून पाखंडमत असें समज. ते अपसिद्धांत होत, ह्मणून ते टाकून दे. आतां विवर्त ह्मणजे काय तें ऐक. २५ ब्रह्म जसें निर्विकार असतें, तसें तें असतें तसेंच असतें, परंतु तेथें जो अन्यथा भास भासमान होतो, तोच याचा विवर्त होय. २६ सूर्य निजाकारानें व निजप्रकाशानें वावरतो व भ्रमण करीत असतो. तेथें जो जळाभास भासत असतो ( ह्मणजे पाण्यांत जें सूर्याचें बिंब प्रतिबिंब भासमान होतें तें किंवा मृगजळ. ) तो त्याचा विवर्त समज. २७ नाहींतर एखादी दोरी घ्या. तिचा आकार कांहीं मोडत बदलत नाहीं खरा, पण तिचा एखादा महासर्प असावा असा नस-

हासर्प जैसा ॥ २८ ॥ ब्रह्म तें उपमारहित ॥ तेथें कायसे पां दृष्टांत ॥ परी एकदेशी होय उचित ॥ बुझावया उद्देश ॥२९॥ असो आदिब्रह्मींचा विवर्त ॥ तेथें गुणसाम्य ऐसा संकेत ॥ अनुवादे सांख्यसिद्धांत ॥ अतिचतुर जो ॥ ३० ॥ हे गुणत्रयाची साम्यता ॥ ईश्वराची उन्मनी अवस्था ॥ तेचि चैतन्यें अधिष्ठिता ॥ बोलिजे महामाया ॥ ३१ ॥ महामायेचें लक्षण ॥ तें शुद्धसत्वात्मक जाण॥स्वस्वरूपाचें अनुसंधान ॥ परब्रह्म तें ॥ ३२ ॥ सत्वगुणाची क्षोभक दशा ॥ महामाया येणें नांवें ऐसा ॥ आभासें मिथ्याभूत ठसा ॥ तो ब्रह्मविवर्त गा ॥ ३३ ॥ मी ब्रह्म येणें आकारें ॥ ज्ञानरूप स्फुर्ती स्फुरे ॥

---

ताच भयंकर भास होतो. २८ ब्रह्म हें तर उपमारहित आहे. तेथें दृष्टांत काय होत? परंतु उद्देश समजण्याकरितां एकदेशी दृष्टांत देणें उचित होय. २९ असो. आदिब्रह्मींचा हा जो विवर्त ह्यालाच ज्ञानपूर्ण असें जें सांख्यशास्त्र त्यांत ‘ गुणसाम्य ’ अशी संज्ञा आहे. ३० ही जी तिन्ही गुणांची साम्यता तीच ईश्वराची उन्मनी अवस्था होय. आणि तीच चैतन्याची अधिष्ठात्री महामाया असें ह्मणतात. ३१ शुद्ध सत्व हें महामायेचें लक्षण असें समज. आणि स्वस्वरूपाचें अनुसंधान तें परब्रह्म होय. ३२ सत्वगुणाचा क्षोभ तोच महामाया ह्या नांवानें मिथ्याच भूतांचा ठसा भासमान होतो. आणि बाबा; तोच ब्रह्मींचा विवर्त. ३३ मीच ब्रह्म या भावनेनें ज्ञानरूप स्फरण होऊं लागतें,

ती ओळखावी चतुरें ॥ महामाया ॥ ३४ ॥ ब्रह्म जैसें परिपूर्ण ॥ तदाकारें स्फुरण ॥ तये मायेसी मर्यादा कवण ॥ करील बारे ॥ ३५ ॥ मायेची दुर्घटता ॥ तेचि हे जाणावी जाणतां ॥ जे केवळ भासे तद्वत्ता ॥ नाथिलीची ॥ ३६ ॥ म्हणूनि दुर्घटत्व हें भूषण ॥ मायेसी नव्हे दूषण ॥ ती ब्रह्मीं असे घटमान ॥ तरी माया नव्हेती ॥ ३७ ॥ हे न घडते ठाईं घडे ॥ मग दाखवी आपुले पवाडे ॥ जे भोजें नाचवी कोडें ॥ ब्रह्मादिकांतें ॥ ३८ ॥ सृष्ट्यादि व्यापार ॥ जो करी जगदीश्वर ॥ तोही मायेचा बडिवार ॥ ऐसा जाण तूं ॥ ३९ ॥ हे

---

तीच चतुर पुरुषानें महामाया म्हणून समजावी. ३४ ब्रह्म हें जसें परिपूर्ण आहे तसें त्याच आकाराचें स्फुरण ती माया होय. तेव्हां बाबारे; त्या मायेची तरी मर्यादा कोण करणार. ३५ मायेचा दुर्घटपणा हाच जाणिवेचा भास होय. तत्त्वतः पाहिलें तर तो केवळ मिथ्या आभास असतो. ३६ म्हणून दुर्घटपणा हें मायेला दूषण नसून ( उलट ) भूषणच आहे. ती ब्रह्माच्या ठिकाणीं जरी घटमान ( होणारी ) आहे, तरी ती माया नव्हे. ( नव्हेशी म्हणजे नसल्यासारखीच आहे. मिथ्या आहे. भास आहे. ) ३७ ही न घडत्या ठिकाणीं घडते ( उत्पन्न ) होते, आणि मग आपला महिमा दाखवीत असते. ब्रह्मादिकांना तर मौजेनें व कौतुकानें नाचवीत असते. ३८ जगदीश्वर जे सृष्टि आदिकरून व्यापार ( घडामोडी ) करतो तोही तूं मायेचाच महिमा असें समज. ३९ माया ही स्वतः असंभवनीय ( कधींही न होणारी ) व अनिर्वचनीय ( क-

असंभवनीय ॥ माया अनिर्वचनीय ॥ मिथ्याच परी वाय ॥ आभासतसे ॥ ४० ॥ तूं ऐसें म्हणसी ॥ माया अनिर्वचनीय कैसी ॥ तरी उत्तरार्धी बुझसी ॥ अनायासें ॥ ४१ ॥ अहो ब्रह्म आपणातें ॥ मी ब्रह्म ऐसें न ह्मणतें ॥ तरी ब्रह्मींचें काय उणें होतें ॥ ब्रह्मपण गा ॥ ४२ ॥ ह्मणानि मिथ्याभूत माया ॥ विश्व मायामय जाणूनियां ॥ तरी ब्रह्म तें अद्वय ॥ कां न म्हणावें ॥ ४२ ॥ जें मिथ्यात्वें कार्य असे ॥ साचासारखें आभासे ॥ गगनीं गंधर्वनगर जैसें ॥ नाथिलेंची ॥ ४४ ॥ ऐसी माया उठिली ॥ ते परब्रह्मीं अधिष्ठिली ॥ ॥ ते प्रकृती बोलिली ॥ सांख्यमतें ॥ ४५ ॥ हे माया मूलप्रकृती ॥ परमपुरुषाची निजशक्ती ॥ तियेसी तेणें-

---

शी आहे हें सांगतां न येण्यासारखी ) आहे. आणि हा सारा मिथ्याच पसारा भासमान झालेला आहे. ४० माया ही अनिर्वचनीय कशी ? असें जर तूं ह्मणत असशील तर तें तुला उत्तरार्धांत सहज समजून येईल. ४१ अहो; ह्या ब्रह्मानें जर मी ब्रह्म असें ह्मटलें नसतें, तर ब्रह्माचें ब्रह्मपण का नाहींसें झालें असतें ? नाहीं. ४२ ह्मणून भूतमाया ही मिथ्या आहे, आणि विश्व हें मायामय आहे, हें जाणून तरी ब्रह्माला अद्वैत कां ह्मणूं नये? ४३ आकाशांत ज्याप्रमाणें खोटेंच गंधर्वनगर उठतें त्याचप्रमाणें हें मिथ्यात्वानें कार्य झालेलें असून तें खऱ्यासारखें भासत आहे, एवढेंच. ४४ अशाप्रकारें मूळमाया ही उत्पन्न होऊन ती परब्रह्माच्या ठिकाणीं अधिष्ठित झाली आहे. तिलाच सांख्यमतांत 'प्रकृति' असें नांव आहे ४५ ही

सी संगती ॥ ते अवधारिजो ॥ ४६ ॥ घट जो जो निपजे ॥ ॥ तो तो आधींच गगनें व्यापिजे ॥ तैसें जें जें तत्व निपजे ॥ तें तें व्यापिजे चैतन्यें ॥ ४७ ॥ नातरी उठतिया तरंगांतें॥ ॥ जळ आधींच व्यापूनि वर्ते ॥ तैसें स्फूर्तिरूप मायेतें ॥ व्यापिलें परब्रह्में ॥ ४८ ॥ जेणें मायेतें व्यापिलें ॥ तें सगुण ब्रह्म बोलिलें ॥ येर जें अशेष उरलें ॥ तें केवळ ब्रह्म ॥४९॥ जेणें माया अधिष्ठिजे ॥ तें ब्रह्म मायोपाधिक बोलिजे ॥ माया शबल ऐसें म्हणिजे ॥ तयेतेंचि गा ॥५०॥ तें ब्रह्म सगुण ॥ तोचि परमात्मा जाण॥परमपुरुष ऐसी खूण॥ तेथेंचि बोलिजे ॥ ५१ ॥ परमपुरुषाचें लक्षण ॥ तें मूळप्रकृतीसी भिन्न ॥

---

माया मूळप्रकृति, हीच परमपुरुषाची निजशक्ति होय. तिची आणि त्याची संगति कशी आहे ती श्रवण करावी.४६जो जो घट उत्पन्न होतो, तो तो प्रथमच आकाशानें व्यापिलेला असतो, त्याप्रमाणें जें जें तत्व निपजतें, तें तें चैतन्यानें व्यापिलेलें असतें. ४७ किंवा उठलेल्या लहरीला पाणी आधींच व्यापून असतें, त्याप्रमाणें त्या स्फुरद्रूप मायेला परब्रह्म व्यापून आहे. ४८ मायेला व्यापून असलेलें जें ब्रह्म त्याला 'सगुणब्रह्म' असें म्हणतात. आणि बाकी जें सर्व उरलेलें तें 'केवळ ब्रह्म' होय. ४९ ज्याच्या योगानें माया अधिष्ठित झाली तें 'मायोपाधिक ब्रह्म' असें म्हणतात. अरे! 'शबल माया' असें त्यालाच नांव आहे. ५० तें सगुण ब्रह्म तोच परमात्मा हें ध्यानांत ठेव. परमपुरुषाची खूण ती तीच होय. ५१ परमपुरुषाचें लक्षण मूळप्रकृतीहून भिन्न आहे हें आतां सांगण्यांत येईल, तिकडे

हें कीजेल कथन ॥ तें ऐक पां तूं ॥ ५२ ॥ मूळप्रकृतीआंतु ॥ पुरुषसाक्षित्वें असे वर्ततु ॥ तियेतें असे जाणतु ॥ निजप्रकाशें ॥५३॥ ते साभास तो निराभास ॥ ते प्रकाश्य तो स्वप्रकाश ॥ तथापि अनादि सहवास ॥ तया प्रकृतिपुरुषांसी ॥ ५४ ॥ ते वेद्य तो वेत्ता ॥ ते ज्ञेय तो ज्ञाता ॥ परी नवल अभिन्नता ॥ तया दोघांची ॥ ५५ ॥ पुरुष प्रकृतीतें जाणे ॥ आपुलेनि सर्वज्ञपणें ॥ तियेसी नेणवे परी साजणें ॥ तेणें पुरुषेंसी ॥५६॥ हा अनादि सिद्ध रोळू ॥ जो प्रकृतिपुरुषांचा मेळू ॥ एका-वीण एकासी वेळू ॥ न फिटे क्षणभरी ॥ ५७ ॥ वर्णव्यक्ति-रहिते ॥ प्रकृतिपुरुषें दोघें अमूर्तें ॥ त्याचिया स्वरूपनिर्धा-

---

तूं लक्ष्य दे. ५२ मूळप्रकृतीमध्यें पुरुष हा साक्षित्वानें रहात असतो. तिला तूं निजप्रकाशानें ( आत्मानुभवानें ) ध्यानांत आण. ५३ ती साभास; तो निराभास आहे. ती प्रकाशली जाणारी; तो स्वयंप्रकाश आहे. तथापि त्या प्रकृतिपुरुषांचा अनादिकालापासून सहवास आहे. ५४ ती वेद्य तो वेत्ता; ती होय तो ज्ञाता होय. परंतु आश्चर्य हें कीं, तीं दोघेंही अभिन्न ( अगदीं एक ) आहेत. ५५ पुरुष प्रकृतीला आपल्या सर्वज्ञपणानें जाणतो, पण तिला मात्र तो पुरुष ऐकून सुद्धां माहित नाहीं. ५६ हा अनादिसिद्ध नियम चालत आला आहे. पण हा प्रकृतिपुरुषाचा मेळ असा आहे कीं, एकाशिवाय दुसऱ्याला एकक्षणभरही वेळ गमत नाहीं. ५७ ज्यांस वर्णही नाहीं, व जीं व्यक्तिही नव्हेत असें हें जें अमूर्त प्रकृतिपुरुषाचें जोडपें त्याच्या स्वरूपाचा

रातें ॥ जाण स्वानुभवें ॥ ५८ ॥ हा पुरुष परमात्मा ॥
॥ स्वयंज्योति विज्ञानात्मा ॥ येणें अनुग्रहीत जीवात्मा ॥ तो
जाणे पुरुषातें ॥ ५९ ॥ प्रकृतीचेनि दृश्यपणें ॥ द्रष्ट्या पुरुषा
लागे जाणणें ॥ अनुभवी तो या खुणे ॥ जाणेल गा ॥६०॥
हा ज्ञानविग्रही परमेश्वर ॥ सर्वात्मा निर्विकार ॥ तया स्व-
रूपाचा विसर ॥ कदांचि नाहीं ॥ ६१ ॥ प्रवृत्तिनिवृत्ति मा-
येची ॥ करावया समर्थ हाचि ॥ तेथें हरिहरब्रह्मादिकां-
ची ॥ मात कायसी ॥ ६२ ॥ ब्रह्माविष्णुमहेश्वर ॥ हे श्री-
प्रभूचे अवतार ॥ तथापि ते आज्ञाधार ॥ तया परेशाचे ॥६३
मायेचे गुणत्रय ॥ ते ब्रह्मादि देवत्रय ॥ करिती सृष्ट्यादिक

---

निश्चय करावयाचा ह्मणजे तुला स्वानुभावानेंच केला पाहिजे. ५८ हा पुरुषच परमात्मा होय. स्वयंज्योति ( स्वप्रकाश ) व विज्ञानात्मा ( चिदात्मा ) तोच. जीवात्मा हा याचा ' अनुगृहित ' होय. तो फक्त पुरुषाला जणतो. ५९ प्रकृति दृश्याकारास आल्यामुळें द्रष्ट्या पुरुषास जाणणें भाग आलें. अरे! जो अनुभवी आहे त्यालाच ह्याची खूण पटेल. ६० हा ज्ञानाचा निश्चय करणारा परमेश्वर सर्वात्मा व निर्विकार असून त्याला कधींच स्वरूपाचा विसर ह्मणून नाहीं. ६१ मायेची प्रवृत्ति निवृत्ति करणारा समर्थ हाच ! तेथें हरि हर ब्रह्मादिकांची काय कथा? ६२ ब्रह्मा, विष्णु, महेश्वर हे त्या प्रभूचेच अवतार खरे, तथापि ते त्या परमात्म्याचे आज्ञाधारक होत. ६३ मायेचे तीन गुण तेच ब्रह्मादि तीन देव होऊन सृष्टीची घडामोड करीत आहेत,

कार्य ॥ आज्ञे श्रीपतीचिया ॥ ६४ ॥ आणीक यांचा व्यापा-र ॥ करावयास समर्थ नव्हे इतर ॥ ह्मणूनि गोसावी सर्वेश्वर ॥ ब्रह्मादिकांसी ॥ ६५ ॥ अहो समस्त मायेतें ॥ सगुण ब्रह्म चेष्टवितें ॥ ह्मणूनि सर्वेश्वर आणिकातें ॥ ह्मणूंचि नये ६६ ॥ तेणें सर्वेश्वरें अवलोकिली ॥ माया महत्तत्वातें व्याली ॥ सृष्टि व्हावयाची इच्छा झाली ॥ तें महत्तत्व गा ॥ ६७ ॥ जें मायेचें शुद्धत्व ॥ तेंचि ओतीव महत्तत्व ॥ जेथ रजतमाचें गूढत्व ॥ वर्ते सत्वगर्भी ॥ ६८ ॥ हे गुणक्षोभिणी माया ॥ देवाचें कारणदेह जिया ॥ घडविलें महाप्रळया ॥ रुद्राक-र्वीं ॥ ६९ ॥ तें सर्वेश्वरें अधिष्ठित ॥ त्रिविध अहंकारा

---

पण कोणाच्या आज्ञेनें? त्या श्रीपतीच्याच. ६४ आणखी ह्यांची ही घडामोड चालवावयाला इतर कोणीही समर्थ नाहीं. ह्मणून सर्वेश्वर हा ब्रह्मादिकांचा स्वामी आहे. ६५ अहो! सगुण ब्रह्म हेंच सर्व मायेला चालवितें. ह्मणून सर्वेश्वर त्यालाच ह्मणावें. इतरांना ह्मणूंच नये. ६६ माया महत्तत्व प्रसवली, हें त्या सर्वेश्वरानेंच पाहिलें! आतां मह-त्तत्व तें कोणतें? ह्मणशील तर सृष्टि व्हावी अशी झालेली जी इच्छा तेंच महत्तत्व होय. ६७ मायेचें शुद्धत्व हेंच अस्सल महत्त-त्व असें समज. आणि तेथेंच सत्त्वाच्या पोटामध्यें रज व तम हीं छपून बसलीं होतीं. ६८ ही जी गुणक्षोभिणी माया तिनें महाप्रळ-यकरणाऱ्या रुद्राकडूच ईश्वराचा कारणदेह निर्माण केला. ६९ती स-र्वेश्वरानें अधिष्ठित झाली असून त्रिविध अहंकार प्रसवली आणि गुणांनीं चाळणा उत्पन्न होऊन माया प्रगट झाली ( दृश्याकारास

प्रसवत ॥ मायागुणीं चेष्टित ॥ प्रगटली ॥ ७० ॥ सात्विक राजस तामस ॥ त्रिविक अहंकार जाणजस ॥ तेथें शक्तित्रयाचा विकास ॥ दिसे अनुक्रमें ॥ ७१ ॥ सात्विक अहंकारीं ज्ञानशक्ती ॥ राजसीं वर्ते क्रियाशक्ती ॥ तामसीं असे द्रव्यशक्ती ॥ निरंतर पैं ॥ ७२ ॥ सर्वेश्वरु अवलोकित ॥ द्रव्यशक्तीसमवेत ॥ तामसअहंकार प्रसवत ॥ पंचमहाभूतें ॥ ७३ ॥ तामसअहंकार गगनातें ॥ गगन व्यापिलें पवनातें ॥ तो पवन दहनातें ॥ प्रसवता झाला ॥ ७४ ॥ दहन व्यापिला उदकातें ॥ उदक व्यापिलें पृथ्वीतें ॥ या परी पंचमहाभूतें ॥ जनितीं झालीं ॥७५॥ शब्दविषय गगनीं ॥ स्पर्शविषय पवनीं ॥ रूप बारे दहनीं ॥ विशेष गुण ॥७६॥

---

आली. )७०सात्विक, राजस व तामस हा त्रिविध अहंकार लक्ष्यांत आण. तेथें अनुक्रमानेंच तीन शक्तींचा विकास झालेला दिसतो. ७१ सात्विक अहंकाराच्या ठिकाणीं ज्ञानशक्ति, राजसामध्यें क्रियाशक्ति आणि तामसामध्यें निरंतरचीच द्रव्यशक्ति असते. ७२ सर्वेश्वर पहात असतो, आणि तामस अहंकार द्रव्यशक्तिसहवर्तमान पंचमहाभूतांना जन्म देतो.७३तामस अहंकारानें आकाशास व्यापून टाकिलें; आकाशानें वायूस व्यापिलें; आणि तो वायु तेज व्याला. ७४ तेजानें उदक व्यापून टाकिलें, व उदकानें पृथ्वी व्यापिली. त्याप्रमाणें पंचमहाभूतें निर्माण झालीं. ७५ आकाशाचा विषय शब्द, वायूचा स्पर्श, आणि बारे तेजाचा विशेष गुण म्हणजे रूप होय. ७६ उदकाचा विषय रस, आणि पृथ्वीचा गंध हें ध्यानांत [illegible] गुणांचा त्यांत कार्य कारण संबंधानें प्रवेश झालेला

आपाचा विषय रस ॥ पृथ्वीचा गंध जाणजस ॥ कार्यकारण भावें प्रवेश ॥ दिसे अन्यगुणांचा ॥ ७७ ॥ तंव चैतन्यनाथ अधिष्ठित ॥ क्रियाशक्ति समायुक्त ॥ राजस अहंकार प्रसवत ॥ पंचदशतत्त्वें ॥ ७८ ॥ व्यान उदान समान ॥ प्राण आणि अपान ॥ एवं पंचदश तत्वांचा गुण ॥ एकत्र संभूत ॥ ७९ ॥ श्रोत्र त्वक् चक्षु जिव्हा घ्राण ॥ हें ज्ञानेंद्रियपंचक जाण ॥ कर्मेंद्रियपंचक सांगेन ॥ तें ऐक पां तूं ॥ ८० ॥ वाचा पाणी पाद ॥ चौथें शिश्न पांचवें गुद ॥ हें कर्मेंद्रिय पंचकवृंद ॥ तुज निरूपिलें ॥ ८१ ॥ मग सात्विकअहंकारें ॥ ज्ञानशक्तीचे सहाकारें ॥ अंतःकरणपंचक बारे ॥ जन्मलें कैसें ॥ ८२ ॥ एकचि अंतःकरण ॥ चतुर्धा भेदें भिन्न ॥ मन बुद्धि चित्त अहंकार जाण ॥ येणेंचि न्यायें ॥ ८३ ॥ सात्विक अहंकार-

---

दिसतो. ७७ नंतर चैतन्यनाथ जो आत्मा तो अधिष्ठान होऊन क्रियाशक्तिसहवर्तमान राजस अहंकारानें पंधरा तत्वें उत्पन्न केलीं. ७८ व्यान, उदान, समान, प्राण, आणि अपान अशाप्रकारें पंधरा तत्वांचा गुण एके ठिकाणीं मिळाला. ७९ कान, त्वचा, डोळे, जीभ व नाक हें ज्ञानेंद्रियपंचक असें समज. आतां कर्मेंद्रियपंचक सांगतों तें तूं ऐक. ८० वाणी, हात, पाय, चवथें शिश्न व पांचवें गुद हा कर्मेंद्रियपंचकाचा समुदाय तुला सांगितला. ८१ मग सात्विक अहंकारानें ज्ञानशक्तीच्या साहाय्यानें बाबारे! अंतःकरणपंचक कसें निर्माण केलें, तें ऐक. ८२ अंतःकरण एकच पण तें चतुर्विध भेदानें निरनिराळें झालें. मन, बुद्धि, चित्त, अहंकारही ह्याचप्रकारें ध्यानांत आण. ८३ सात्विक अहंकरापासून

तत्वें जनिलीं ॥ तीं भोगसाधनें बोलिलीं॥ कर्ता भोक्ता म्ह-
णितलीं ॥ तत्त्वविदीं ॥ ८४ ॥ राजसअहंकारतत्वें जनित ॥
श्रोत्रादि त्वचेचा संघात ॥ तो साधनशब्दें विख्यात॥ सक-
लविषयीं ॥ ८५ ॥ तामसअहंकाराची सृष्टी ॥ ते भोग्य
साध्य ऐसी गोष्टी ॥ कार्य भोग्य हे परिपाठी ॥ तेथेंचि व-
र्ते ॥ ८६ ॥ एवं अहंकारें त्रिविधें॥ तत्त्वें जनिलीं विविधें ॥
तियें त्रिपुटी येणें शब्दें ॥ बोलिजेती ॥८७॥ ज्ञाता ज्ञान ज्ञेय।
भोक्ता भोगणें भोग्य॥ कर्ता कारण कार्य॥ ऐसी हे त्रिपुटी ॥
॥ ८८ ॥ अंतःकरण भोक्ता ॥ इंद्रियांसी भोगसाधनता ॥
पंचभूतांसी भोग्यता ॥ विषयरूपत्वें ॥ ८९ ॥ एकैक भोक्ता

---

जीं तत्वें निर्माण झालीं त्यांनाच भोगसाधनें ह्मणतात. तत्ववेत्त्यांनीं त्यांनाच कर्ता, भोक्ता अशीं नांवें दिलेलीं आहेत. ८४ राजस अ-हंकारापासून जन्मलेलीं तत्वें ह्मणजे श्रोत्र ( कर्ण ) आदिकरून त्वचेचा समूह होय. तो सर्व विषयाचें साधन ह्मणून प्रसिद्धच आहे. ८५ भोग्य, साध्य अशा ज्या गोष्टी ती तामस अहंकाराची सृष्टि होय. त्यालाच ' भोग्य, ' कार्य' असें ह्मणण्याचा प्रघात आहे. ८६ अशाप्रकारें त्रिविध अहंकारापासून विविध ( नानाप्रकारचीं ) तत्वें उदयास आलीं. तिलाच त्रिपुटी असें ह्मणतात ८७ ज्ञाता, ज्ञान, आणि ज्ञेय; भोक्ता, भोगणें, आणि भोग्य; कर्ता, कारण आणि कार्य अशाप्रकारची ही त्रिपुटी आहे. ८८ अंतःकरण हा भोक्ता, इंद्रियें हीं भोगाचें साधन, आणि विषयाच्या रूपानें पंचभूतांकडे भो-ग्यता आली आहे. ८९ एकेक साधक भोक्ता, त्या त्या साधनस-

साधक ॥ तिहीं साधनांचा मेळापंचक ॥ करूनि प्रवेशला निःशंक ॥ एकैक भूतीं ॥ ९० ॥ त्या परस्परानुप्रवेश ॥ सांगिजेल तो ऐकिजस ॥ ऐकूनि धरीजस ॥ निजमानसीं ॥ ॥ ९१ ॥ अंतःकरण व्यानाधारें ॥ श्रोत्र इंद्रियांचेनि द्वारें ॥ वाचासहित संचरे ॥ शब्दगुण आकाशीं ॥ ९२ ॥ मन समानाचेनि योगें ॥ त्वचेंद्रियाचेनि भोगें ॥ पाणींद्रियसहित रिघे ॥ स्पर्शगुण पवनीं ॥ ९३ ॥ बुद्धि उदानाचेनि बडिवारें ॥ चक्षु इंद्रियाचेनि आधारें ॥ पादेंद्रियसहित बारे ॥ रूपगुण तेजीं ॥ ९४ ॥ चित्त प्राणाचेनि बळे ॥ जिव्हेंद्रियाचेनि मेळें ॥ शिश्नसहित मिळे ॥ रसगुण आपीं ॥९५॥ अहंकार अपानीं

---

मूहाची पंचकडी जमवून निःशंकपणें एकेका भूतामध्यें प्रविष्ट झाला आहे. ९० त्यांचा परस्परांमध्यें कसा प्रवेश होतो, तो आतां सांगण्यांत येईल. तो ऐकून तूं आपल्या मनामध्यें नीट ठेव. ९१ अंतःकरण व व्यान वायु ह्यांच्या आधारनें कर्मेंद्रियाच्या मार्गानें वाणीसहवर्तमान आकाशाच्या ठायीं शब्द गुण प्रवेश करितो. ९२ मन व समानवायूच्या योगेंकरून त्वगिंद्रियाच्या ( त्वचेच्या ) भोगसाधनानें हस्तेंद्रियासहवर्तमान स्पर्श गुण वायूंत शिरतो. ९३ बुद्धि आणि उदान ह्यांच्या जोरावर, नेत्रेंद्रियाच्या साहाय्यानें, पादेंद्रियांसहवर्तमान रूपगुण तेजांत जाऊन बसतो. ९४ चित्त आणि प्राण ह्यांच्या सामर्थ्यानें, जिव्हेंद्रियांचें पाठबळ मिळून शिश्नेंद्रियासहवर्तमान उदकामध्यें रसगुण समाविष्ट होतो. ९५ अहंकार हा अपानाच्या ठिकाणीं असतो. त्याच्यायोगानें व प्राणाच्या समागमानें वायुसह-

बसे ॥ प्राणाचेनि सहवासें ॥ वायूसहित प्रवेशें ॥ गंधगुण पृथ्वीसी ॥ ९६ ॥ एवं विषयरूप भूतांसी ॥ चारी चारी एकासी ॥ पाचांचीं पंचवीस ऐसीं ॥ जाहलीं महाभूतें ॥९७॥ पंचविषय पंचभूतें ॥ तियें तामसाहंकारजनितें ॥ ह्मणोनि तत्वें समस्तें ॥ मिळालीं तेथेंचि पैं ॥ ९८ ॥ होतीं अतिसूक्ष्में अव्यक्तें ॥ जीं पंचमहाभूतें ॥ तीं पावलीं स्पष्टदशेतें ॥ परस्परानुमेळें ॥ ९९ ॥ एवं परस्परानुप्रवेश ॥ जे तत्वेंसी पंचधा सहवास ॥ हा ईश्वरइच्छा मायाविकाश ॥ विस्तार झाला ॥ १०० ॥ या प्रसंगानंतरें ॥ श्रीमुकुंदमुनीचे दातारें ॥ प्रपंच विस्तारिला सर्वेश्वरें ॥ कैसा तो अवधारिजे ॥ १०१ ॥ इति श्रीमद्विवेकसिंधौ सृष्टिक्रमे गुरुशिष्यसंवादे तत्वसृष्टिकथनं नाम तृतीयप्रकरणं समाप्तं ॥ श्रीमत्सद्गुरुचरणारविं० ॥

---

वर्तमान गंधगुण पृथ्वींत मिळतो. ९६ अशाप्रकारें विषयरूप भूतांना एकेकास आणखी चार चार मिळून अशींच पांचांचीं पंचवीस महाभूतें झालीं. ९७ पांचविषय व पांचभूतें हीं तामस अहंकारापासून उत्पन्न झालेलीं होत ह्मणून सर्व तत्वें तेथेंच येऊन मिळालीं. ९८ जीं पंचमहाभूतें अव्यक्त अतिसूक्ष्म-स्थितींत होतीं, तीच परस्परांचा मिलाफ होऊन स्पष्ट व्यक्त स्थितींत आलीं आहेत.९९अशाप्रकारें तत्वांचा पांच प्रकारें योग होऊन परस्पर मिलाफ झाला, आणि हाच मायेचा विकास ईश्वरेच्छेनें विस्तार पावला. १०० आतां पुढील प्रसंगीं (पुढील प्रकरणीं) श्रीमुकुंद मुनींचा दाता जो सर्वेश्वर त्यानें प्रपंचाची मांडणी कशी केली, तें श्रवण करावें. १०१

# प्रकरण चवथें.

## विषयः—ईश्वरतनुत्रयकथन.

**श्रीगणेशाय नमः ॥ ॥ मग श्रीपरमपुरुषें ॥ आपुलेनि इच्छा-वशें ॥ द्विधा केलीं अशेषें ॥ तियें पंचमहाभूतें ॥१॥ यांमध्यें एका भागाचा ॥ तया पंचविसां कळांचा ॥ लिंगदेह सर्वेश्व-राचा ॥ आरंभिता झाला ॥ २ ॥ जीं तत्वें पंचवीस ॥ तीं हिरण्यगर्भाचे अंश ॥ लिंगशरीर साभास ॥ एक देवाचें ॥ ३ ॥ श्रोत्र दिशा त्वचा पवन ॥ चक्षु सूर्य जिव्हा वरुण ॥ अश्विनौदेव तें घ्राण ॥ हिरण्यगर्भाचें ॥ ॥ ४ ॥ वाचा वन्ही पाणी सुरपति ॥ पाद वामन शिश्न प्रजापति ॥ गुदेंद्रिय तो**

---

श्रीगणेशाय नमः—नंतर त्या परमपुरुषानें आपल्या इच्छामात्रें-करून तीं सर्व पंचमहाभूतें द्विधा करून सोडलीं. १ त्यांमधील एका भागाचा, त्या पंचवीस कळांनीं युक्त, असा सर्वेश्वराचा लिंग देह त्यानें आरंभीं तयार केला. २ पंचवीस तत्वें ह्मणून जीं आहेत, तीं हिरण्यगर्भाचे अंश होत. आणि साभास लिंगदेह हा मात्र एक देवाचा ( सर्वेश्वराचा ) होय. ३ दिशा हे त्या हिरण्यगर्भाचे कान होत. वायु ही त्वचा; सूर्य हे चक्षु ( डोळे ) वरुण ही जीभ आणि अश्विनौ देव हें त्याचें घ्राण ( नाक ) होय. ४ अग्नि ही त्याची वाणी; इंद्र हे हात; वामन हे पाय; प्रजापति हें शिश्न आणि

नैर्ऋति ॥ प्रसिद्ध जाणावा ॥ ५ ॥ जया ब्रह्मांडीं विहरण ॥ तेचि प्रसिद्ध पंचप्राण ॥ दशधा भेदें भिन्न ॥सप्तचक्रें सप्त स्कंध जे ॥६॥ प्रथम जाणावा अवस्कंध ॥ वायूभूमीपासून प्रसिद्ध ॥ मेघपर्यंत स्वतःसिद्ध ॥ ओळखावा ॥ ७॥ प्रवस्कंध दुसरा ॥ मेघापासूनि अवधारा ॥ सूर्यापर्यंत खरा ॥ व्यापुनी असे ॥ ॥ ८ ॥ तिसरा उद्वस्कंध ॥ सूर्यापासूनि विशद ॥ चंद्रमापर्यंत भेद ॥ ओळखावा ॥९॥ सहस्कंध चवथा ॥ चंद्रमंडलापासोनि तत्वतां ॥ नक्षत्रपर्यंत पहातां ॥ विस्तारला जो ॥१०॥ विवस्कंध पांचवा ॥ नक्षत्रापासूनि जाणावा ॥ शनीपर्यंत बरवा ॥ विस्तारला जो ॥ ११ ॥ षष्ठम परास्कंध ॥ शनीपासूनि त्याचा

---

प्रसिद्ध नैर्ऋती तो गुदेंद्रिय समजावा. ५ सर्व ब्रह्मांडांत विहार करणारे ते सुप्रसिद्ध पंचप्राण होत. ते दशविध भेदांनीं वेगवेगळे झालेले आहेत. त्यांस ' सप्तचक्र ' व सप्तस्कंद अशा संज्ञा आहेत. ६ पहिला आवस्कंध होय. भूमीपासून तों मेघापर्यंत जो प्रसिद्ध व स्वतःसिद्ध वायु तो ' आवस्कंध ' समजावा. ७ दुसरा प्रवस्कंध हें पहा ! हा वायु मेघांपासून सूर्यापर्यंत खरोखर व्यापून असतो. ८ तिसरा उद्वस्कंध. हा खरोखर सूर्यापासून तों चंद्रम्यापर्यंत गेला आहे. ही त्याची खूण ध्यानांत ठेव. ९ सहस्कंध हा चवथा स्कंध समज. हा पाहूं गेलें तर चंद्रमंडळापासून नक्षत्रमंडळापर्यंत पसरला आहे. १० विवस्कंध हा पांचवा. हा नक्षत्रांपासून जो सारखा पसरला आहे तो शनीपर्यंत म्हणून समज. ११ साहवा परास्कंध. त्याचा वेध शनीपासून सप्तऋषींच्या ताऱ्यापर्यंत गेला आहे.हीच त्याची

वेध ॥ सप्तऋषींपर्यंत भेद ॥ प्रसिद्ध जाणावा ॥ १२ ॥ परिवाहस्कंध सातवा ॥ सप्तऋषींपासूनि सुहावा ॥ ध्रुवपर्यंत जाणावा ॥ मिळोनि असे ॥ १३ ॥ अंतःकरण तो विष्णु ॥ चंद्रमा तो मनु ॥ बुद्धी कमलासनु ॥ हिरण्यगर्भाची ॥ १४ ॥ चित्त तो नारायण ॥ अहंकार गौरीरमण ॥ एवं पंचवीस तत्वांचा गुण ॥ लिंगदेह प्रभूचा ॥ १५ ॥ हें सूक्ष्मभूतांचें दळवाडें ॥ लिंगदेह ईश्वराचें फुडें ॥ तथापि विषयसुख नातुडे स्थूलदेहावीण ॥ १६ ॥ तया स्थूळदेहाचें निर्माण ॥ नाहीं पंचीकृतभूतांवीण ॥ ह्मणूनि भूतांचें पंचीकरण ॥ देवें आरंभिलें ॥ १७ ॥ एकैक भूत पंचधा कीजे ॥ पांचही पांचां ठाई

---

प्रसिद्ध ह्मण. १२ परिवाह हा सातवा स्कंध होय. हा सप्तऋषींपासून तों थेट ध्रुवापर्यंत जाऊन भिडला आहे, हें लक्षांत असूंदे. १३ विष्णु हें त्याचें अंतःकरण व चंद्रमा तें मन; आणि ब्रह्मदेव ही त्या हिरण्यागर्भाची बुद्धि होय. १४ नारायण हें चित्त; व पार्वतीपति ( शंकर ) हे अहंकार होत. अशाप्रकारें पंचवीस तत्वांचा जो गुण तोच त्या प्रभूचा-सर्वेश्वराचा-लिंगदेह होय. १५ हा सूक्ष्मभूतांचा समुदाय हाच त्या ईश्वराचा स्पष्ट लिंगदेह होय. परंतु स्थूलदेहावांचून विषयसुख अनुभवावयाला येत नाहीं. १६ त्या स्थूळदेहाची उत्पत्ति, पंचीकृत भूतांशिवाय नाहीं. ह्मणून देवानें भूतांच्या पंचीकरणास आरंभ केला १७ एकेक भूत पंचधा करावयाचें आणि पांचही पांचांमध्यें मिळवावयाचीं, ह्यालाच वेदांतशास्त्रांत

मेळविजे ॥ हा पंचीकृत प्रकार बोलिजे ॥ वेदांतशास्त्रीं ॥१८॥ तो पंचीकृतप्रकार ॥ करिता झाला जगदीश्वर ॥ तेथींचा सांगिजेल निर्धार ॥ तो ऐकिजसु ॥१९॥ सर्वेश्वरें अवलोकिलें ॥ गगन पंचधा विभागिलें ॥ तें अंतःकरणरूपें राहिलें ॥ आपणपेंची ॥ २० ॥ व्यानांशें वायूसीं ॥ श्रोत्रांशें तेजासीं ॥ वाचा आपीं शब्द पृथ्वीसीं ॥ गगन मिळतें झालें ॥ २१ ॥ पवन मनोरूपें ॥ आकाशीं समर्पे ॥ समानांशें आपणपें ॥ अधिष्ठिता झाला ॥ २२ ॥ सत्वांशें पावकीं ॥ पाणींद्रियें उदकीं ॥ स्पर्शांशें पृथ्वीयेसि कीं ॥ वायु मिळता झाला ॥ ॥ २३ ॥ तेज बुद्ध्याकारें ॥ आकाशीं संचरे ॥ पवनीं प्रवेशे बारे ॥ उदानरूपें ॥ २४ ॥ चक्षुरूप राहिलें आपणपां ॥

---

' पंचीकरण ' असें म्हटलेलें आहे. १८ हें पंचीकरण जगदीश्वरानें निर्माण केलें. तेथचा विचार आतां सांगण्यांत येईल, तो तूं ऐकून घे. १९ सर्वेश्वरानें दृष्टि फेंकतांच आकाशाचे पांच प्रकार झाले. पण तें स्वतः मात्र अंतःकरणरूपानेंच राहिलें. २० व्यानअंशेंकरून वायूशीं, श्रोत्र अंशेंकरून तेजाशीं, वाचा अंशानें उदकाशीं, आणि शब्दरूपानें आकाश हें पृथ्वीशीं मिश्र झालें. २१ वायु हा मनाच्या रूपानें आकाशांत मिळाला आणि आपण मात्र समानाच्या अंशेंकरून अधिष्ठित झाला. २२ त्वचा अंशानें तेजामध्यें, हस्त इंद्रियांनीं उदकांत आणि स्पर्शांशेंकरून वायु हा पृथ्वींत मिळाला. २३ तेज हें बुद्धीच्या रूपानें आकाशांत शिरलें. आणि हें पहा ! तेंच उदानाच्या रूपानें वायूंत प्रगट झालें. २४ पादइंद्रियाच्य

पादेंद्रिय मिळालें आपा ॥ रूपांशें पृथ्वीसि पां ॥ तेज मिळतें झालें ॥ २५ ॥ उद्क चित्तांशें ॥ आकाशीं प्रवेशे ॥ पवनीं समरसे ॥ प्राणरूपें ॥ २६ ॥ जिव्हांशें तेजासी ॥ आपणपां स्थिरावलें शिश्नेसीं ॥ रसांशें पृथ्वीसी ॥ आप मिळतें झालें ॥ २७ ॥ अहंकारें धरणी ॥ प्रवेशली गगनीं ॥ अपानरूपें पवनीं मिळती झाली ॥ २८ ॥ घ्राणेंद्रियें तेजासी मिळाली ॥ गुदेंद्रियें आपासीं प्रवेशली ॥ गंधरूपें निजस्थानीं राहिली ॥ धरित्री हे ॥ २९ ॥ यापरी पंचीकृतें ॥ स्थूल पंचमहाभूतें ॥ गुणकर्मधर्मसहितें ॥ निपजतीं झालीं ॥ ३० ॥ कवण भूताचे कवण ॥ कर्म धर्म गुण ॥ ते सांगेन विवंचून ॥ ऐक पां

---

रूपानें उदकास आणि रूपाच्या रूपानें तेज हें पृथ्वीशीं सामील झालें. पण आपण मात्र चक्षुरूपच होऊन राहिलें. २५ उदक हें चित्तांशेंकरून आकाशांत प्रविष्ट झालें आणि प्राणरूपानें वायूमध्यें एकजीव हाऊन बसलें. २६ उदक हें जिव्हा-अंशेंकरून तेजाशीं आणि रस-रूपानें पृथ्वीशीं एकवटलें. आणि त्यानें स्वतः शिश्नाच्या ठिकाणीं ठाणें दिलें. २७ पृथ्वी ही अहंकाररूपानें आकाशामध्यें सामावली, आणि अपानाच्या रूपानें वायूप्रत संयोग पावली. २८ ही पृथ्वी घ्राणेंद्रियाच्या रूपानें तेजामध्यें व गुदेंद्रियेंकरून उदकामध्यें संमिश्र होऊन स्वतः मात्र गंध हेंच आपलें ठिकाण करून बसली. २९ ह्याप्रमाणें हीं पंचीकृत भूतें स्थूल पंचमहाभूतें, गुण, कर्म, धर्म ह्यां सहवर्तमान, उदयास आलीं. ३० कोणकोणत्या भूताचे गुण, कर्म, व धर्म कोणकोणते तें आतां विवरण करून सांगेन, तें तूं

सूं ॥३१॥ सच्छिद्रता हा धर्म ॥ अवकाश प्रधान कर्म ॥ शब्द गुण बुझ वर्म ॥ आकाशींचें ॥ ३२ ॥ शब्द स्पर्श हे गुण ॥ चांचल्यता हा धर्म जाण ॥ वहनादिक कर्म करण ॥ वायूचें पैं ॥ ३३ ॥ शब्द स्पर्श रूप ॥ हे तेजीं गुणत्रयाचा आरोप ॥ उष्णत्व हा धर्म देख ॥ कर्म पचनादिक ॥ ३४ ॥ शब्द स्पर्श रूप रस ॥ आपीं हे गुण समरस ॥ द्रवत्व धर्म बहुवस ॥ कूदनादिक ॥ ३५ ॥ शब्द स्पर्श रस रूप गंध ॥ हे गुण पृथ्वीचे प्रसिद्ध ॥ काठिणत्व धर्मकर्म स्वतः सिद्ध ॥ धारणादिक ॥३६॥ कारणभूतांचे गुण ॥ कार्यानुरूप वर्तती जाण ॥

---

एक. ३१ सच्छिद्रता ( छिद्र असणें ) हा आकाशाचा धर्म होय. अवकाश पोकळी हें त्याचें प्रधान (?) कर्म, आणि शब्द हा त्याचा गुण. हें त्याचें लक्षण तुला उमजलेलें असूं दे. ३२ शब्द आणि स्पर्श हे वायूचे गुण, चंचलता हा त्याचा धर्म, आणि वाहणें वगैरे त्याचें कर्म करणें होय. ३३ शब्द, स्पर्श आणि रूप ह्या तीन गुणांचा तेजाच्या ठिकाणीं आरोप करितात. उष्णता हा त्याचा धर्म, आणि पचवणें–शिजवणें वगैरे त्याचें कर्म होय. ३४ शब्द, स्पर्श, रूप, व रस हे सर्व गुण उदकाचे ठिकाणीं एकवटलेले आहेत. ओलेपणा, द्रवणें हाच त्याचा मोठा धर्म, आणि कूदन आदिकरून त्याचें कर्म होय. ३५ शब्द, स्पर्श, रस, रूप आणि गंध हे पृथ्वीचे प्रसिद्ध गुण आहेत. काठिणपणा हा तिचा धर्म, आणि धारणा आदिकरून तिचें स्वतःसिद्ध कर्म आहे. ३६ भूतांचे गुण हे कारण होत. ते कार्यानुरूप बदलत असतात. ज्याप्रमाणें

जैसें जळींचें सार्द्रपण ॥ वर्ते तरंगासवें ॥ ३७ ॥ एकैक भूतीं एकएक ॥ विशेष गुण मुख्य नायक ॥ अन्य भूतांचे आगंतुक ॥ वर्तती कारणत्वें ॥ ३८ ॥ शब्द गुण असे आकाशीं ॥ ह्मणूनि वेद्य श्रोत्रेंद्रियासी ॥ गगनापासूनि जन्म वायूसी ॥ ह्मणूनि द्विगुण तो ॥ ३९ ॥ शब्द स्पर्श गुण वायोसी ॥ ह्मणोनि वेद्य श्रोत्रत्वचेसी ॥ वायूपासाव जन्म तेजासी ॥ ह्मणूनि त्रिगुण तें ॥ ४० ॥ शब्द स्पर्श रूप हे गुण तेजासी ॥ ह्मणूनि वेद्य श्रोत्रत्वचाचक्षूंसी ॥ तेजापासाव जन्म आपासी ॥ तें चतुर्गुण गा ॥ ४१ ॥ शब्द

---

पाण्याचें पाणीपण लाटांच्या अनुषंगानें बदलत असतें. ३७ एकेका भूतामध्यें एक एक विशेष गुण मुख्य अगदीं सर्वांत अग्रगण्य असतो. आणि बाकीच्या भूतांचे कारणरूपानें अगांतुक आलेले असतात. ३८ आकाशामध्यें शब्दगुण असतो. म्हणून तो श्रोत्रेंद्रियास जाणला जाण्यास योग्य आहे. आकाशापासूनच वायूचा जन्म आहे म्हणून त्याला दोन गुण प्राप्त झालेले आहेत. ३९ शब्द आणि स्पर्श हे दोन गुण वायूचे आहेत. म्हणून ते श्रोत्र आणि त्वचा ह्यांनीं जाणले जाण्यास पात्र आहेत. आणखी वायूपासून तेजाची उत्पत्ति झाली. अर्थातच तेजाच्या ठिकाणीं तीन गुण आले. ४० तेव्हां शब्द, स्पर्श व रूप हे तीन तेजाचे गुण झाले. म्हणून ते श्रोत्र, त्वचा, व चक्षु ( डोळे ) ह्यांनीं जाणण्याजोगे झाले. आतां तेजानें उदक उदयास आणिलें. म्हणून तें चौगुणित झालें. ४१ शब्द, स्पर्श, रूप, व रस हे गुण उत्पन्न झाले

स्पर्श रूप रस हे गुण ॥ आपासी ह्मणूनि दृश्यपण ॥ श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा जाण ॥ जळासि गा ॥ ४२ ॥ उदकापासूनि जन्मली ॥ ह्मणूनि गुणपंचकें आथिली ॥ इंद्रियपंचकासी वेद्य झाली ॥ धरित्री हे ॥ ४३ ॥ आपुलेनि इच्छामात्रें ॥ पंचभूतें विचित्रें ॥ कालऊनि रसतन्मात्रें ॥ कर्दम केला ॥ ४४ ॥ असो हीं स्थूळ महाभूतें ॥ सर्वेश्वरें केलीं पंचीकृतें ॥ मग स्थूळ देह अनंतें ॥ निर्मिला कैसा ॥ ४५ ॥ महातेजाचेनि प्रभावें ॥ कर्दम शोषिला स्वभावें ॥ मग निर्मिलें देहभावें ॥ ब्रह्मांड हें ॥ ४६ ॥ देवतामय लिंगदेह ॥ तयाचें स्थूळ शरीर गृह ॥ ह्मणूनि देवें अवयवसमूह ॥

---

म्हणूनच पाणी दृश्य—व्यक्त—स्वरूपास आलें. म्हणूनच श्रोत्र, त्वचा, चक्षु जिव्हा ह्यांच्या ठिकाणीं त्याचें ज्ञान आलें, असें समज. ४२ उदकापासून जन्म पावली ह्मणूनच पृथ्वीला गुणपंचक लागूं झालें. आणि तिचें ज्ञान पांच इंद्रियांच्या ठिकाणीं आलें. ४३ स्वेच्छामात्रेंकरून हा विलक्षण पंचभूतांचा तन्मात्रेमध्यें रस कालवून कर्दम ( चिखल ) केला. ४४ असो. हीं स्थूल महाभूतें सर्वेश्वरानें पंचीकृत केलीं. आणि मग त्या अनंतानें स्थूल—जड—देह कसा निर्माण केला तें ऐका. ४५ महातेजाच्या प्रभावानें तो कर्दम आपोआपच शोषला गेला. आणि मग देहभावानें हें ब्रह्मांड निर्माण केलें. ४६ लिंगदेह हा देवतामय आहे. स्थूल शरीर, हें त्याचें घर होय. ह्मणून ईश्वरानें हें ब्रह्मांड हाच अवयवांचा समूह

रचिलें ब्रह्मांड हें ॥ ४७ ॥ सप्तपाताळ ते चरण ॥ तेथें त्रि-
विक्रमाचें अधिष्ठान ॥ तेथींची विवंचना सांगेन ॥ ते ऐक
पा तूं ॥४८॥ सातवें पाताळ तें तळ ॥ विराट पुरुषाचें पाद-
तळ ॥ प्रपद तें रसातळ ॥ जाणावें पैं ॥ ४९ ॥ गुल्फद्वय तें
महातळ ॥ पोटरीया तळातळ ॥ सुतळ तें जानुयुगुल ॥ वि-
श्वरूपाचें ॥ ५० ॥ वितळ आणि अतळ ॥ हें जाणावें ऊ-
रुयुगुल ॥ कटिप्रदेशांत महीतळ ॥ वोळखावें ॥ ५१ ॥ तृण
वृक्ष गुल्म लता ॥ त्या रोमावली समस्ता॥गंगादिनानासरि-
ता ॥ त्या नाडिचक्रें ॥ ५२ ॥ सप्तही सागर ॥ तें देवाचें
उदर ॥ तेथें वडवानळ तो जठर ॥ वह्नी जाणावा ॥५३॥ ना-
भिस्थान तें नभमंडळ ॥ ज्योतिर्लोक तें वक्षस्थळ ॥ महर्लोक

---

तयार केला. ४७ सप्त पाताळ हे पाय होत. तेथें त्रिविक्रमाचें अ-
धिष्ठान असतें. तेथचा विचार आतां सांगतों तो ऐक. ४८ सातवें
पाताळ तें तळ ह्मणजे विराटपुरुषाचें पादतळ ( तळवा ) होय.
रसातळ हें प्रपद ह्मणजे पायाचा दुसरा भाग होय. ४९ महातळ
ते दोन्ही घोटे, तळातळ त्या पोटऱ्या, आणि सुतळ तें त्या विश्व-
रूपाचे दोन्ही गुडघे होत. ५० वितळ आणि अतळ ते दोन्ही
मांड्या आणि महीतळ हा कमरेचा भाग समजावा. ५१ गवत, झाडें-
झुडपें, व वेली त्या सर्व केशपंक्ति होत. गंगा वगैरे निरनिराळ्या
नद्या तीं नाडीचक्रें. सातसमुद्र हें देवाचें पोट होय. आणि त्यांत
वडवानळ ती जठरांतील उष्णता समजावी. ५३ नभोमंडळ तें ना-
भिस्थान; ज्योतिर्लोक तें वक्षस्थळ ( ऊर ) आणि महर्लोक तें त्या

तें कंठनाळ ॥ विराटाचें ॥५४॥ जनोलोक तें वदन ॥ तपो-
लोक तें ललाटस्थान ॥ मस्तक ब्रह्मभुवन ॥ सत्यलोक पैं
॥ ५५ ॥ इंद्रलोक ते हात ॥ इंद्रासी अधिष्ठान जेथ ॥ दिशां-
चा पोकळ पंथ ॥ तीं कर्णरंध्रें ॥ ५६ ॥ तरणीचें मंडळ ॥ तें
जाणावें नेत्रयुगुल ॥ तेथें चक्षुरिंद्रिय विशाल ॥ सूर्यासारखें
॥ ५७ ॥ पुत्र कलत्र स्नेह दांत ॥ यम दाढा उग्रत ॥ वरुण
लोक विख्यात ॥ ते जिव्हा जाणावी ॥ ५८ ॥ प्रजापतिलो-
क तें शिश्न ॥ निरयलोक गुदस्थान ॥ जलवृष्टि रेत जाण ॥
विराटपुरुषाचें ॥ ५९ ॥ एकाचि देहामाझारीं ॥ जैसी कृमीं-
ची भरोवरी ॥ तेणें समस्तेंसी चतुरी ॥ एकचि बोलिजे ६०
तैशा चौऱ्यायशीलक्ष योनी ॥ असती ब्रह्मांडभुवनीं ॥ ति-

---

विराटाचें कंठनाळ ( गळा ) होय. ५४ जनलोक हें तोंड, तपोलोक तें कपाळ, आणि ब्रह्मभुवन जो सत्यलोक तें त्याचें मस्तक समजावें. ५५ इंद्रलोक ते हात, हेंच इंद्राचें अधिष्ठान होय. दिशांच्या पोकळ मार्ग तींच कर्णरंध्रें ( कानाचीं भोकें ). ५६ सूर्यमंडळ हेच दोन्ही नेत्र. येथें सूर्यासारखें विशाळ चक्षुरिंद्रिय असतें. ५७ बायकामुलाचा लोभ तेच दांत, यम ह्याच भयंकर दाढा, आणि प्रसिद्ध वरुणलोक ती त्याची जीभ होय. ५८ प्रजापति लोक तें त्याचें शिश्न, नरकलोक तेंच त्याचें गुदस्थान, आणि जलवृष्टि तेंच त्या विराट पुरुषाचें रेत समजावें. ५९ एकाच देहामध्यें ज्याप्रमाणें कृमींची गर्दी असते, पण त्या सर्वांना शहाणे एकच नांव देतात, ६० त्याचप्रमाणें ह्या ब्रह्मांडभुवनांत चौऱ्याशीं लक्ष योनी दाटल्या

हींसहित वेदपुराणीं ॥ ब्रह्मांड बोलिजे ॥६१॥ ऐसा हा ब्रह्मांड-
गोल ॥ पंचभूतांचा निखिल ॥ या भीतरीं सकल ॥ जीवसमूह
॥६२॥ या भूगोला दशगुण ॥ बाह्य पृथ्वीचें आवरण ॥ पृथ्वीसी
दशगुण वेष्टून ॥ आवरण उदकाचें ॥६३॥ उदका दशोत्तर ॥
धडाडित वैश्वानर ॥ तया दशगुण समीर ॥ आवरण गा॥६४
तया दशगुण अधिक ॥ बाहेरी नभाचा कंचुक ॥ नभा दश-
गुण कौतुक ॥ अहंकाराचें ॥ ६५ ॥ अहंकारा दशगुण ॥ म-
हत्तत्त्वाचें पांघरूण ॥ ऐसें हें सप्तावरण ॥ ब्रह्मांड पैं ॥६६॥
जैसा सप्तकंचुक पिंड ॥ तैसेंचि हें ब्रह्मांड ॥ ह्मणूनि उभय-
तांचें कोड ॥ एकसारिखें ॥ ६७ ॥ ऐसिया ब्रह्मांडाच्या

आहेत, त्या सर्वांसही वेदांत व पुराणांत 'ब्रह्मांड' असें ह्मटलें
आहे. ६१ अशाप्रकारें हा ब्रह्मांडगोल निवळ पंचभूतांचा आहे.
आणि ह्याच्या पोटांत सारे जीवसमुदाय आहेत. ६२ ह्या भूगोला-
च्या दसपट बाह्य पृथ्वीचें आवरण असतें; आणि पृथ्वीला दस-
पटीनें उदकाच्या आवरणाचा वेढा असतो. ६३ आणि त्याच्याही
दसपटीनें उदकाला धगधगीत तेजाचें आणि त्याला त्याच्याही
दसपटीनें वायूचें आवरण असतें. ६४ त्याला आणखी दसपटीनें
बाहेरून आकाशाचा वेढा असतो; आणि मौज ही कीं, त्या आका-
शाला दसपटीनें अहंकाराचा वेढा असतो. ६५ अहंकारालाही दसपटीनें
महत्तत्त्वाचें पांघरूण असतें. येणेंप्रमाणें हें ब्रह्मांड सप्त आवरणा-
त्मक आहे. ६६ जसा सात पदरी पिंड असावा, त्याप्रमाणेंच हें
ब्रह्मांडही आहे. ह्मणून दोघांचीही गोष्ट एकसारखीच आहे. ६७

कोटी ॥ उपजती मायादेवीच्या पोटीं ॥ असो हे तत्वसृष्टी परिपाठी ॥ तुज निरूपिली ॥ ६८ ॥ हें ब्रह्मांड स्थूलशरीर ॥ श्रीप्रभूचा गा विस्तार ॥ तेथें सृष्टिरचनेचा उभार ॥ ते जागृती अवस्था ॥ ६९ ॥ स्थूलदेह ब्रह्मांड ॥ सृष्टिअवस्था प्रचंड ॥ या दोहोंचा अभिमानी अखंड ॥ जो ब्रह्मा सृष्टिकर्ता ॥ ७० ॥ प्रणवाची प्रथम मात्रा ॥ अकाराक्षर जे पवित्रा ॥ आतां दोहींच्या चरित्रा ॥ बोलतसे ॥ ७१ ॥ हिरण्यगर्भाख्य लिंगदेह ॥ जेथें हरी अभिमानी होय ॥ तेथें स्थिति अवस्था निःसंदेह ॥ स्वप्न बोलिजे ॥ ७२ ॥ हिरण्यगर्भ स्थिति अवस्था ॥ या दोहींचा अभिमानी भोक्ता ॥ जो विष्णु तारी

---

अशाप्रकारचीं कोटि ब्रह्मांडें त्या मायादेवीच्या पोटीं जन्मास येतात. असो. हा तत्वसृष्टीचा प्रकार तुला कथन केला. ६८ हें पहा! हें ब्रह्मांडरूप स्थूलशरीर हा त्या श्रीसर्वेश्वराचाच पसारा आहे. तेथें सृष्टिरचनेची उभारणी ही ' जागृति ' अवस्था होय. ६९ ब्रह्मांड हा स्थूल देह, आणि सृष्टि ही त्याची प्रचंड अवस्था ( जागृति ) आहे. सृष्टिकर्ता जो ब्रह्मदेव तो ह्या दोहोंचा अखंड अभिमानी होय. ७० पवित्र अकार-अक्षर ही प्रणवाची ( ओंकाराची ) पहिली मात्रा होय. आतां त्या दोहोंची गोष्ट सांगतों. ७१ हिरण्यगर्भ हाच प्रसिद्ध लिंगदेह, येथचा अभिमानी हरी ( श्रीविष्णु ). येथली स्थिति म्हणजे निःसंशय स्वप्न–अवस्था होय. ७२ हिरण्यगर्भाची त्या स्थितींतील ही अवस्था असून त्या देहाचा अभिमानी व भोक्ता

बुडतां ॥ भवसागरीं ॥ ७३ ॥ या त्रयातें असें बोलत ॥ प्रणवींचा उकार जो विख्यात ॥ द्वितीय मात्रा ऐसा संकेत ॥ तेथें बोलिजे ॥ ७४ ॥ देवाचा कारणदेह प्रकृती ॥ जेथें महाप्रळय सुषुप्ती ॥ या दोहींचा अभिमानी गौरीपति ॥ तेथें बोलिजे ॥७५॥ या तिहींचा उच्चार॥ करी तृतीयमात्रा मकार ॥ असो सकलही ओंकार ॥ विस्तारला ॥ ७६ ॥ विराट हिरण्यगर्भ माया ॥ हे सर्वेश्वराचे देहत्रय ॥ उत्पत्ति स्थिति प्रळय ॥ अवस्थात्रय पैं ॥७७॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर॥ हे अभिमानी सुरवर ॥ अकार उकार मकार ॥ मात्रात्रय हें॥७८ रज सत्व तम हें गुणत्रय ॥ प्रणवाचें पादत्रय ॥ असो हे

---

संसारसमुद्रांत बुडत असतांना भक्तांना तारणारा—श्रीविष्णु होय.७३ ह्याच त्रयीला प्रणवांतील प्रसिद्ध उकार ह्मणतात. त्यालाच द्वितीय मात्रा अशी संज्ञा आहे. ७४ प्रकृति हा देवाचा कारण देह असून तेथें सुषुप्ति महाप्रळयही होय. गौरीचे पति शंकर हेच त्या दोहोंचे अभिमानी होत. ७५ ह्या तिहींचा उच्चार तोच मकार, व तीच तिसरी मात्रा होय. असो. अशाप्रकारें हा सर्वही ओंकार विस्तार पावला. ७६ विराट, हिरण्यगर्भ व माया हेच सर्वेश्वराचे तीन देह होत. आणि उत्पत्ति, स्थिति व प्रळय ह्या त्यांच्या तीन अवस्था होत.७७ ब्रह्मा,विष्णु,व महेश हे श्रेष्ठ देव अभिमानी आहेत.अकार,उकार व मकार ह्या तीन मात्रा होत ७८ रज,सत्त्व, व तम हे तीन गुण हेच प्रणवाचे तीन पाद होत. असो. अशी ही मायिक उभारणी ह्यानें

**उभवणी मायामय ॥ जणें रचिली ॥ ७९ ॥ हे कारणरूप उपाधी ॥ सर्वेश्वरीं वर्ते त्रिशुद्धी ॥ केवळ ब्रह्मीं विशुद्धीं ॥ ते आर्थीविना ॥ ८० ॥ हा कारणोपाधिमिश्रित ॥ निरूपिला शबल तत्पदार्थ ॥ श्रीमुकुंदमुनि त्वंपदार्थ ॥ आतां सांगिजेल ॥ ८१ ॥ इति श्रीमद्विवेकसिंधौ सृष्टिक्रमे गुरुशिष्यसंवादे ईश्वरतनुत्रयकथनं नाम चतुर्थप्रकरणं समाप्तं ॥**

---

केली. ७९. ही कारणरूप उपाधि सर्वेश्वरालाच निश्चयेंकरून असते. केवळ ब्रह्म मात्र अगदीं शुद्ध असतें. तेथें मात्र ह्याचें नांव नाहीं. ८० हा कारण व उपाधि ह्यांशीं संयोग पावलेला शबल तत्पदार्थ सांगितला, आतां श्रीमुकुंदमुनी त्वंपदार्थाचें निरूपण करतील. ८१

---

# प्रकरण पांचवें.

## विषयः—लिंगदेह निरूपण.

श्रीगणेशाय नमः ॥ तंव बोलिला शिष्याचा राणा ॥ जीव ईश्वर ब्रह्मांचें लक्षण ॥ गाउळें निरूपिलें पूर्ण ॥ मज कृपाबुद्धि ॥ १ ॥ आतां जीवसृष्टीची कथा ॥ सांगावी श्रीगुरुनाथा ॥ माझी फिटे संदेहव्यथा ॥ आत्मविषयींची ॥ २ ॥ ऐसी शिष्याची विनवणी ॥ श्रीगुरुराजें ऐकूनी ॥ मग प्रेमभावें आलिंगुनी ॥ बोलता झाला ॥ ३ ॥ बारे तुझे प्रश्न ॥ झालें सुखाचें पारणें ॥ ऐक सावधानपणें ॥ बोलिजेल जें ॥ ४ ॥ हां गा आपुला अलंकार ॥ चोख करी जो सोनार॥

---

श्रीगणेशाय नमः—तेव्हां शिष्यराजशिरोमणी ह्मणालेः—देवांनीं कृपा करून जीव, ईश्वर, व ब्रह्म ह्यांचें लक्षण मला पूर्णपणें सांगितलें. १ आतां श्रीगुरुराजांनीं जेणेंकरून माझी आत्म्याविषयींची संशयरूप बाधा नाहींशी होईल, अशा प्रकारें जीवसृष्टीचा प्रकार कथन करावा. २ अशी शिष्याची विनंति ऐकून श्रीगुरुराजांनीं प्रेमभावानें आलिंगन दिलें व बोलूं लागले. ३ बाबारे! तुझ्या प्रश्नानें आनंदाचें पारणें झालें. तर आतां जें सांगूं तें सावधान चित्तानें श्रवण कर. ४ अरे! असें पहा. आपला दागिना जो सोनार चोख घडवून देतो त्याचा उपकार न विसरण्यासारखाच ह्मट-

तयाचा उपकार ॥ न विसरीजे पैं ॥ ५ ॥ तैसें आपुलें नि-
जसुख ॥ तुवां स्मरविलें देख ॥ जें स्फुरलें उन्मेष ॥ मज
ईश्वरविषयीं ॥ ६ ॥ घरोघरीं रेटम काहाणी ॥ एक पुसे एक
वाखाणी ॥ तया ब्रह्मसुखाची शिराणी ॥ हतदैवांसि कैंची
॥ ७ ॥ आत्मयाचें परिज्ञान ॥ हें तत्पदार्थ शोधन ॥ एत-
दर्थी संन्यासादिक साधन ॥ श्रुती बोलती ॥ ८ ॥ तत्पदार्थ
ईश्वरेंवीण ॥ त्वंपदार्थी नाहीं वर्तन ॥ ह्मणूनि पुनरपि कथन ॥
एक तत्पदींचें ॥ ९ ॥ जो परमात्मा महाविष्णु ॥ आदिपुरुष
भगवानु ॥ जो सच्चिदानंदतनु ॥ पूर्वी निरूपिला ॥ १० ॥

---

ला पाहिजे. ( कारण, उत्तम दागिना असला ह्मणजे त्याची वरचे-
वर वरचेवर आठवण होते व खालीं ठेवावासा वाटत नाहीं. ) ५
त्याचप्रमाणें हें पहा ! आपल्या स्वात्मसुखाची तूं मला आठवण
दिलीस. तेणेंकरून मला ईश्वरविषयक ज्ञानाची स्फूर्ति झाली.
६ घरोघर भाकडकथा चाललेल्या असतात. एक पुसत असतो;
एक वाखणणी करीत असतो. परंतु कपाळकरंट्यांना त्या ब्रह्मसुखा-
ची इच्छा कोठची व्हायला ? नाहींच व्हावयाची. ७ आत्म्याचें
परिज्ञान हेंच तत्पदार्थाचें शोधन होय. ह्याविषयीं श्रुतीनें संन्या-
सादिक साधन सांगितलेलें आहे. ८ तत्पदार्थ जो ईश्वर त्याच्या-
शिवाय त्वंपदार्थ कांहीं असावयाचा नाहीं. ह्मणून तत्पदानें पुन्हां
एकवार निरूपण एक. ९ पूर्वी सांगितलेला जो महाविष्णु परमात्मा,
जो आदिपुरुष भगवान्, सत् चित् आनंद हेंच ज्याचें शरीर; १०
जो सर्वात्मा, सर्वसाक्षी, सर्वेश्वर, आणि सर्व बाजूंस असणारा, जो

जो सर्वात्मा सर्वसाक्षी ॥ सर्वेश्वर सर्वकुक्षी ॥ जो कांहींच नुपेक्षी ॥ निजभक्तातें ॥ ११ ॥ जो देव अतिलाघवी ॥ नाहीं तें ब्रह्मगोल दाखवी ॥ गेलें ह्मणोनी लपवी ॥ जेथींचें तेथें ॥ १२ ॥ जयासी कानावीण ऐकणें ॥ डोळ्यावीण देखणें ॥ जिव्हेवीण चाखणें ॥ सर्व रसातें ॥ १३ ॥ पायांवीण सर्व चालणें ॥ हातांवीण देणें घेणें ॥ तया जीवांतें उद्धारणें ॥ इच्छामात्रें ॥ १४ ॥ जो जवळींची परी अतिदूरी ॥ दूरस्थ परी जीवाभीतरीं ॥ जयाची सत्ता निजव्यापारीं ॥ वर्ते इंद्रियग्राम ॥ १५ ॥ प्रतिग्रामीं अवभासक ॥ जैसा तरणीच एक ॥ तो सर्व जीवां प्रकाशक ॥ परमात्माचि पैं ॥१६ तोचि शबल तत्पदार्थ ॥ ज्ञानविग्रह अमूर्त ॥ सर्वव्यापक

---

आपल्या भक्तांकडून कशाचीच अपेक्षा करीत नाहीं; ११ जो अतिशय मायिक लीला करणारा, नसतींच ब्रह्मांडें डोळ्यांसमोर उभीं करणारा; आणि गेलें ह्मणजे जो जेथल्या तेथें गडप करून टाकणारा; १२ कानांशिवाय ज्याचें ऐकणें, डोळ्यांशिवाय पाहणें, जिभेशिवाय सर्व रस चाखणें, १३ पायांशिवाय चहूंकडे फिरणें, व हातांशिवायच त्याचें देणें घेणें चालतें. आणि इच्छामात्रेंकरून जीवाचा उद्धार करतो. १४ जो जवळच असून अतिशय दूर, दूर रहातो परंतु असतो जीवामध्येंच ! ज्याच्या सत्तेनें इंद्रियग्रामसमूह आपआपल्या व्यापारास प्रवृत्त होतात. १५ एकच सूर्य जसा प्रतिग्रामीं-प्रत्येक गांवांत-प्रकाशमान होतो, त्याचप्रमाणें तो एक परमात्माच सर्व जीवांना प्रकाश ज्ञान देणारा आहे १६ तोच शबल

परी मूर्तिमंत ॥ भक्तांकारणें ॥ १७ ॥ नट नाट्या धरितां ॥ आपणयातें न भुले सर्वथा ॥ तैसं नाना अवतार घेतां ॥ न भुले स्वस्वरूप ॥ १८ ॥ सगुणरूप मायिक ॥ ऐसें मानूनियां देख ॥ जे न भजती कौतुक ॥ ते मूढ जाणावे ॥ १९॥ सोंग संपादितां तोपलेपणें ॥ नटासी दीजती अलंकारभूपणें॥सोंग मिथ्या परि पावणें ॥ नटासीचि ॥२०॥ तैसें कीर मायिक अवतरण ॥ तेथें कीजे जें भजन ॥ तें होय समर्पण ॥ जगदीश्वरीं ॥ २१ ॥ म्हणोनि सर्वेश्वराचें भजन ॥ कांहींच नव्हे अप्रमाण ॥ जें भक्तांसी कैवल्यसाधन ॥ ज्ञानद्वारें ॥ २२ ॥ श्रवण कीर्तन स्मरण ॥ पादसेवन अर्चन वंदन ॥ दास्य

तत्पदार्थ होय. अमूर्त-अव्यक्त परंतु ज्ञानानें व्यक्त-स्पष्ट होणारा; सर्व ब्रह्मांड-स्थिरचर व्यापून उरणारा खरा, परंतु भक्तांसाठीं सगुण रूप धारण करणारा. १७ नटनाट्य सूत्रें हलवणारा, पण आपण मात्र अगदीं अलिप्त. नानाप्रकारचे अवतार धारण करतो तरी स्वस्वरूप कांहीं चळत नाहीं. १८ हें पहा ! सगुणरूप हें मायिक असें समजून जे त्याचें आवडीनें भजन करीत नाहींत, ते मूढ होत. १९ सोंग उत्तम उठलें म्हणजे खूष होऊन नटाच्या अंगावर अळंकार भूषणें टाकलीं तर सोंग जरी मिथ्या हें खरें तरी तीं सर्व नटालाच पोंचतात. २० तसेंच मायारूप जरी असलें तरी तेथें जें भजन घडतें, तें जगदीश्वरालाच समर्पण होतें. २१ म्हणून सर्वेश्वराचें भजन हें मुळींच अप्रमाण नाहीं. भक्तांना ज्ञानमार्गानें तेंच कैवल्याचें साधन आहे. २२ श्रवण, कीर्तन, स्मरण, पाद-

सख्य आत्मनिवेदन ॥ हे भक्ति नवविधा पैं ॥ २३ ॥ नवलक्षण भजनें ॥ सर्वेश्वर आभारलेपणें ॥ ज्ञान देऊनि बंधनें ॥ तोडी निजसेवकांचीं ॥ २४ ॥ तो देव परमात्मा ॥ ब्रह्म होईना जीवात्मा ॥ प्रपंच ठाईंचा अनात्मा ॥ तो देव कैसेनी ह्मणावा ॥ २५ ॥ ब्रह्म तो ईश्वर कां न ह्मणावा ॥ ऐसा साक्षेपीं बोल ऐकावा ॥ तत्त्वतः अद्वैत परी जाणावा ॥ भेद औपाधिक ॥ २६ ॥ अहंता ममता प्रयत्नरहिता ॥ इच्छादि शक्तिचक्रें विवर्जिता ॥ तें ब्रह्म तूं आधींच तत्त्वता ॥ ईश्वर कैसेनिगा ॥ २७ ॥ इच्छादिशक्तिचक्रासी नियंता ॥ जो सृष्टिस्थितिसंहारकर्ता ॥ षड्गुणैश्वर्याचा अधिष्ठिता ॥ तो

---

सेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन ही नवविधा ( नऊप्रकारची ) भक्ति होय. २३ ह्या नऊप्रकारच्या भजनानें सर्वेश्वर ऋणी होऊन आपल्या भक्तांचीं बंधनें ज्ञानाच्या द्वारें तोडून टाकितो. २४ तो देवच परमात्मा–परब्रह्म होय. जीवात्मा हा कांहीं ब्रह्म नव्हे. प्रपंच हा तर मूळचाच अनात्मा. त्याला देव कसें बरें समजावें? २५ ब्रह्म तो ईश्वर कां नव्हे? ह्या आक्षेपाचें उत्तर ऐकावें. तात्त्विकरीत्या अद्वैतच आहे हें खरें, पण भेद हा उपाधीनें झाला आहे असें समजावें. २६ अहंता, ममता, व प्रयत्नरहित, ज्याच्यामागें इच्छादि शक्तिचक्रें नाहींत, तें ब्रह्म तत्त्वतः पाहूं गेलें तर तूं मूळचाच आहेस, हें खरें, पण बाबा! तूं ईश्वर कसा समजावास? २७ इच्छा आदिकरून माया शक्तिचक्राचें नियमन करणारा; जो सृष्टि ( उत्पत्ति, ) स्थिति, व लय करणारा; षड्-

जेणें चैतन्यासी भरे अवतरण ॥ अहंतेचें ॥ ३९ ॥ अवयव हस्तपादादिक ॥ एका देहाचे जैसे अनेक ॥ तैसे अज्ञानसंगें असंख्य ॥ अंश मायादेवीचे ॥ ४० ॥ एकाच बुद्धीच्या अनेक वृत्ती ॥ तेवीं मायेच्या अनेक शक्ती ॥ जाणिवेनेणिवेच्या प्रतीति ॥ जगप्रसिद्ध कीं ॥४१॥ मायादेवीचा गोसावी॥ ज्ञानशक्ती मायावी ॥ प्रविष्ट झालिया जीवात्मभावीं ॥ तोचि बोलिजे ॥ ४२ ॥ जैसा मुख्य एक सविता ॥ प्रतिबिंबासी नगी अनेकता ॥ तैसी ईश्वरीं असे अनेक द्वैतता ॥ उपाधिभेदें ॥४३॥ जेवीं मुख्य सूर्यमंडल ॥ तें असे निश्चळ ॥ प्रतिबिंबमय तें व्याकुळ ॥ तरंगवशें ॥ ४४ ॥ तैसें नित्यानंदभरित ॥ ईश्वर असे वर्तत ॥ जीवसंगें व्याकुळ होत ॥

हेंच अज्ञानाचें लक्षण होय. जेणेंकरून चैतन्यामध्यें अहंतेचें वारें शिरतें. ३९ हात पाय वगैरे जसे एकाच देहाचे अनेक अवयव असतात, त्याचप्रमाणें अज्ञानाच्या योगानें मायादेवीचेही असंख्य अंश झालेले आहेत. ४० एकाच बुद्धीच्या जशा अनेक वृत्ति असतात, तशाच मायेच्याही अनेक शक्ति आहेत. जाणिवेचे व नेणिवेचे अनुभव जगप्रसिद्धच आहेत. ४१ ह्या जीवात्मभावांत जी मायिक ज्ञानशक्ति प्रविष्ट झाली, तिलाच ‘ मायदेवीचा स्वामी ’ ह्मणतात. ४२ जसा मुख्य एक सूर्य असून प्रतिबिंबें अनेक असतात त्याचप्रमाणें एका ईश्वरामध्यें उपाधिभेदानें अनेक द्वैतें आहेत. ४३ ज्याप्रमाणें मुख्य सूर्यमंडळ आहे तें निश्चळ असून प्रतिबिंबित सूर्यलहरींच्या योगानें चंचल दिसतो. ४४ त्याचप्रमाणें ईश्वर हा नित्य आनंदपूर्ण असून

अज्ञानवशें ॥ ४५ ॥ तळींचें पाणी असतचि असे ॥ तदंश तरंगांसी जन्ममरण दिसे ॥ तैसा देव परी विनाशे ॥ जीवसंगें हा ॥ ४६ ॥ तरंगाच्या जन्ममरणीं ॥ जेवीं न घेपिजे पाणी ॥ तैसी जीवधर्मांची घाणी ॥ ईश्वरीं नलगे ॥ ४७ ॥ पाणीयासी कीजे वेगळें ॥ तरंगचि नाहीं कवणिये काळें ॥ परी तरंगधर्म ते जळें ॥ त्यजिलेचि कीं ॥ ४८ ॥ तैसें परमात्म्याचिये सत्ते ॥ सकल जीव असती वर्तत ॥ परी जीवधर्म कदाचित ॥ न घेपिजे तो ॥४९॥ आतां असो हे शब्दरचना ॥ चैतन्यें अधिष्ठितां अज्ञाना ॥ तत्क्षणीं विपरीतज्ञाना ॥ तेथेंचि आभास ॥५०॥ रज्जुविपर्यीं जें अज्ञान ॥ तयासी द्रष्टाचि

---

जीवाच्या संगतीनें अज्ञानभ्रमांत पडून विव्हळ होत आहे. ४५ तळ्यांतलें पाणी असतें तसेंच असतें, परंतु त्याचेच अंश जे तरंग ( लाटा ) त्यांना उत्पत्ति व नाश आहे असें दिसतें. तसाच हा देव खरा पण तो जीवाच्या संगतीनें नाश पावतो असें वाटतें. ४६ लाटाच्या उत्पत्तिनाशानें जसें पाणी ध्यावयाचें नाहीं, तसाच जीवधर्मांचा मळही ईश्वरास लागत नाहीं. ४७ पाणी निराळें केलें ह्मणजे कोणत्याही काळीं तरंग हा तर नाहींच, परंतु पाण्यानें लाटांचा धर्मच टाकला ह्मणावयाचा. ४८ त्याचप्रमाणें परमात्मा आहे ह्मणून सारे जीव आहेत. परंतु जीवधर्म त्याच्या अंगीं मुळींच लावूं नये. ४९ असो. आतां हें शब्दजाल राहूंदे. चैतन्यामध्यें अज्ञानाचें अधिष्ठान आलें कीं, तेथें लगोलग विपरीतज्ञान भासूं लागलेंच ! ५० दोरीविषयींचें जें अज्ञान, तेथें द्रष्ट्याचेंच अधिष्ठान असतें. परंतु तेथेंच

अधिष्ठान ॥ सर्पाकारें विपरीत ज्ञान ॥ उठिलें तेथेंचि पैं ॥५१॥ म्हणूनि अज्ञान अन्यथाज्ञान ॥ उभयांसी चैतन्य अधिष्ठान ॥ जडवर्गासि स्वतंत्रपण ॥ तें ठाईंच नाहीं ॥५२॥ रज्जू आपणातें नेणे ॥ नाहीं सर्पाकार जाणणें ॥ म्हणूनि अज्ञान अन्यथाज्ञानें ॥ अजडीं आत्मरूपीं ॥५३॥ सूर्यरश्मीचे मेघ होती ॥ ते सूर्यातेंचि आवारिती ॥ परी सूर्यातें लोपवूं न शकती ॥ दिवसपणातें ॥ ५४ ॥ तैसें आपुलीया अधिष्ठानातें ॥ अज्ञान आवरी आत्मयातें ॥ साक्षित्व लक्षणीं प्रकाशातें ॥ कवण निवारी ॥५५॥ आत्मा आपणयातें कीर नेणे ॥ परी सर्वातें साक्षित्वें जाणे ॥ हें निवारावें कवणें ॥ विचारीपा ॥५६॥

---

सर्पभ्रमानें विपरीतज्ञान उद्भवतें. ५१ म्हणून अज्ञान व अन्यथा ( विपरीत ज्ञान ) ज्ञान ह्या दोहोंसही चैतन्य हेंच अधिष्ठान आहे. जडवर्गाला स्वतंत्रपणा हा मुळांतच नाहीं. ५२ दोरी ही आपल्यास ठाऊक नाहीं, आणि ती सर्परूप आपण समजलों म्हणून अज्ञान व विपरीतज्ञान सूक्ष्म आत्मरूपांतच असतें. ५३ सूर्यकिरणांपासूनच मेघ होतात, पण ते सूर्यालाच झाकतात. तरी ते सूर्याला-किंवा दिवसाला नाहींसें करूं शकत नाहींत. ५४ त्याचप्रमाणें आपल्याच अधिष्ठानाला-आत्म्याला अज्ञान हें शत्रु आहे; परंतु त्याचा जो साक्षित्वाच्या रूपानें प्रकाश आहे तो कोण नाहींसा करणार! ५५ आत्मा आपणाला जाणत नाहीं, परंतु तो सर्व कांहीं साक्षित्वानें जाणतो आहे. तेव्हां ह्याचें निवारण कोण करील, त्याचा विचार तूंच कर म्हणजे झालें. ५६ अज्ञान अविद्या आवरण घालणारी, व वि-

अज्ञान अविद्या आवरिका ॥ विपरीतज्ञान विक्षेपिका ॥ ह्या द्विविधा संसारदायका ॥ जीवात्मयासी ॥ ५७ ॥ अविद्याप्रकृतीचा प्रवेश ॥ ह्मणूनि प्रकृति ऐसा निर्देश ॥ जीव परमपुरुषाचा अंश ॥ ह्मणूनि पुरुष तो ॥ ५८ ॥ स्वरूपपरिपूर्णत्वाकारणें ॥ परमपुरुष ऐसें बोलणें ॥ हें बृहदारण्यकातें पुसणें ॥ नामनिर्वचन ॥५९॥ स्थूलदेह तोचि पुर ॥ तेथें जीव निद्रिस्थ निरंतर ॥ ह्मणूनि तो पुरुष हें उत्तर ॥ व्याकरणसिद्ध ॥ ६० ॥ ऐशीं प्रकृतिपुरुषांचीं द्वंद्वें ॥ उठलीं अनादिसिद्धें ॥ हें भगवद्गीतेंत गोविंदें ॥ निरूपिलें असे ॥६१ ॥ ब्रह्म तें तंव नित्य शुद्ध ॥ ब्रह्मविवर्त अनादिसिद्ध ॥ मायामय

---

परीत ज्ञान ही मधली अडचण दोन्ही मिळून जीवात्म्याच्या मागें संसार लावून देणारीं होत. ५७ अविद्या हाच प्रकृतीचा आरंभ, व ह्मणूनच अविद्येला प्रकृति अशी संज्ञा आहे. जीव हा परमपुरुषाचा अंश होय. ह्मणून त्याला पुरुष असें ह्मणतात. ५८ स्वरूपाच्या परिपूर्णत्वाटीं परमपुष असें ह्मणावयाचें. हा नांवाचा विचार ' बृहदारण्यकांत ' पहावा. ५९ स्थूल देह तेंच पुर ह्मणजे वस्तीचें ठिकाण, तेथें जीव हा निरंतर झोप घेत पडला आहे. ह्मणून तो ' पुरुष ' हें व्याकरणसिद्ध उत्तर होय. ६० अशीं प्रकृतिपुरुषांचीं द्वंद्वें अनादिसिद्ध उद्भवलेलीं आहेत. हें श्रीमद्भगवद्गीतेंत श्रीकृष्णांनीं सांगितलेलें आहे ६१ ब्रह्म हें तर नित्य व शुद्ध आहे. ब्रह्माच्या ठिकाणीं उत्पन्न झालेला विवर्तही अनादिसिद्ध आहे आणि ही विविध मायिक सृष्टि ही देखील अनादीच

जीवसृष्टि विविध ॥ तेही अनादीची ॥ ६२ ॥ निरूपिलें जें अज्ञान ॥ तें जीवाचें देह कारण ॥ असो हें व्यालें अन्यथाज्ञान ॥ लिंगदेहातें ॥ ६३ ॥ अविद्यादर्पणीं प्रतिबिंबत ॥ प्रविष्ट जीव स्वरूपें अनंत ॥ हिरण्यगर्भ तेथें संचरत ॥ लिंगरूपें ॥ ६४ ॥ सूर्य दर्पणीं प्रतिबिंबतां ॥ सरसीच चाले प्रकाशता ॥ तैसा लिंगदेह प्रगटतां ॥ विलंब नलगे ॥ ६५ ॥ निर्विषय प्रथम स्फुरण ॥ तें जाणावें अंतःकरण ॥ संकल्पविकल्पात्मक मन ॥ ओळखावें पैं ॥ ६६ ॥ स्फुरतपदार्थांचा आकार ॥ तथींचा कीजे निर्धार ॥ ऐसा निश्चयात्मक वृत्यंकुर ॥ ते बुद्धि जाणावी ॥ ६७ ॥ चित्त चेतव्यलक्षण ॥ जें वृत्तीचें

---

आहे. ६२ अज्ञान ह्मणून जें सांगितलें तेंच जिवाला देह प्राप्त होण्याचें कारण असतें. असो. आणि विपरीत ज्ञान हें लिंगदेहाला व्यापून टाकितें. ६३ अविद्यारूप आरशामध्यें प्रतिबिंबित झालेलीं, अनंत जीवस्वरूपें प्रकट झालेलीं आहेत. आणि तेथें लिंग [वासना] रूपानें हिरण्यगर्भाचा शिरकाव झालेला आहे. ६४ सूर्य आरशामध्यें प्रतिबिंबित झाला कीं, त्याबरोबर लगेच प्रकाशही येतोच. त्याप्रमाणें लिंग ह्मणजे वासना व देह हींही बरोबरच प्रगट होतात. ६५ पहिलें निर्विषय स्फुरण तेंच अंतःकरण होय. आणि संकल्पविकल्पात्मक तें मन ह्मणून समजावें. ६६ स्फुरण झालेल्या वस्तूच्या रूपाचा निश्चय केला पाहिजे, असा जो वृत्तीचा अंकुर ती बुद्धि समजावी. ६७ चित्तरूपानें अनुसंधानात्मक जें वृत्तीचें स्फुरण

स्फुरण ॥ अनुसंधानात्मक जाण ॥ चित्तरूपें ॥ ६८ ॥ देहीं अहंभावातें उठवी ॥ पदार्थममतेतें धरवी ॥ तो अहंकार जीवातें भोगवी ॥ सुखदुःखातें ॥ ६९ ॥ प्रकृतिपुरुषाच्या समयोगीं ॥ अंतःकरणपंचकाच्या अंगीं ॥ स्फुरतीये चंचलतेच्या वेगीं ॥ झाले पंचप्राण ॥ ७० ॥ कवण प्राणाचें कवण ॥ कैसें स्वरूप लक्षण ॥ कवण व्यापार कवण स्थान ॥ तें जाणावें पैं ॥ ७१ ॥ आपादतल मस्तक देहातें ॥ व्यापूनि भोगी भुक्तरसातें ॥ देहींचिया सर्व नाडींतें ॥ व्यापिलें व्यानें ॥७२॥ समान नाभिदेशीं वसे ॥ परी देहाचे सर्वसंधीं पैसे॥ तेणें लवती आपैसे ॥ हस्तपादादिक ॥ ७३ ॥ उदानाचें

---

तेंच चित्ताचें चैतन्य (स्फूर्ति) लक्षण होय. ६८ देहामध्यें मीपणाची प्रेरणा करतो, पदार्थांत ममता धरावयाला लावतो तो अहंकार होय. हाच जीवाला सुखदुःख भोगणें भाग पाडतो. ६९ प्रकृतिपुरुषांचा संयोग होऊन अंतःकरण पंचकाच्या ठिकाणीं स्फुरण पावलेल्या चंचलतेच्या वेगानें पंचप्राण झाले. ७० कोणत्या प्राणाचें कोणतें व कसकसें स्वरूप आहे? त्यांचा व्यापार काय काय?त्यांचे व्यापार काय काय? व त्यांचें स्थान कोणकोणतें ? तें समजून घ्यावें. ७१ व्यान हा देहामध्यें पायाच्या तळव्यांपासून मस्तकांपर्यंत भरून राहिलेला असून भुक्तरस सेवन करतो आणि देहांतील सर्व नाड्या व्यापून टाकितो.७२समान हा नाभि (बेंबी) प्रदेशीं वास करतो खरा पण तो सर्व संधींत पसरलेला असतो. त्याच्यामुळेंच हातपाय वगैरे हे लवतात. ७३ कंठस्थान हें उदानाचें घर होय. तो इच्छादिव्यापार चालवितो

कंठस्थान मंदिर ॥ करी इच्छादि व्यापार ॥ स्वप्न दावी नानाविकार ॥ निद्रिस्थासी ॥ ७४ ॥ अपानासी गुदस्थानीं बैसणें ॥ सदां अधोगती चालणें ॥ मलमूत्र विसर्ग करणें ॥ व्यापार तयाचा ॥ ७५ ॥ नासामार्गीं प्राणासी रिघनिघ ॥ प्रवेशनिर्गमांची लगबग ॥ क्षुधातृषेची लगलग ॥ होय तयाचेनी ॥ ७६ ॥ अंतःकरणवृत्ती शब्दोन्मुख ॥ तें श्रोत्रेंद्रिय ओळख ॥ तयातें कर्णरंध्रीं बैसक ॥ तेथूनि घेई शब्दातें ॥ ७७ ॥ स्पर्शविषयातें निवडिती ॥ जे मनाचिया वृत्ती ॥ तें त्वगिंद्रिय ऐसी स्थिती ॥ ओळखावी ॥ ७८ ॥ जे वृत्ति बुद्धीच्या पोटीं ॥ स्वरूपग्रहणोन्मुख उठी ॥ तें चक्षु डोळ्याचे

आणि निजलेल्यास नाना विकारांनीं युक्त असें स्वप्न पाडतो. ७४ अपानाची बैठक अपानमार्गींच असते. त्याची गति ह्मणजे नेहमींच अधोगति ( खालींच. ) मलमूत्रोत्सर्ग करणें हा त्याचा व्यापार होय. ७५ प्राण हा नाकावाटें आंतबाहेर येत जात असतो. त्याची आंत येण्याची व बाहेर जाण्याची घाई उडालेली असते. त्याच्याच मुळें तहान व भूक हीं लागतात. ७६ शब्दाकडे वळलेली जी अंतःकरणाची वृत्ति तेंच श्रोत्रेंद्रिय असें समज. त्याची बैठक कानाचे ठिकाणीं असते; व तेथून तें शब्द ग्रहण करतें. ७७ ज्या मनाच्या वृत्ति स्पर्श विषयाची निवड करतात, तें त्वक्-त्वचा-इंद्रिय ही खूण समजावी. ७८ जी वृत्ति बुद्धीच्या पोटांत स्वरूप ग्रहण करण्यासाठीं उद्भवते तें चक्षु इंद्रिय होय. तें डोळ्यांच्या वाटींत बसून रूप ग्रहण

वाटीं ॥ वैसूनि घे रूपातें ॥७९॥ रसग्रहणोन्मुख चित्तवृत्ती ॥ तेचि नर्तकी मिरवती ॥ मुखरंगीं होय नाचती ॥ रसभावें ॥ ८० ॥ अहंकारगजाच्या कुंभस्थानीं ॥ घ्राण मुक्ताफळ झालें सुपाणी ॥ गंधप्रकाशाची फुलावणी ॥ ते नासापुटीं ॥ ८१ ॥ शब्द बोलूं पहाती ॥ जे अंतःकरणाची वृत्ति ॥ ते वागिंद्रिय मुखें करिती ॥ बोले मातृकाक्षरीं ॥८२॥ मनींची एक वासना ॥ करी ग्रहणोपादानकल्पना ॥ व्यापारार्थ होती आरोहणा ॥ पाणींद्रियें करिती ॥ ८३ ॥ बुद्धीचा वृत्तिविशेष ॥ अध्वसंक्रमण दोष उन्मेष ॥ होऊनि गगनासन्मुख ॥ चेष्टवीत चरणांतें ॥ ८४ ॥ आत्मया कृष्णाच्या घरीं ॥ झाला चित्त-

करते. ७९ रस ग्रहण करण्यास प्रवृत्त झालेली जी चित्तवृत्ति तीच शोभती जिव्हा होय. तीच रसभावेंकरून मुखरंगाच्या ठिकाणीं लुवलुव नाचणारी होय८० अहंकाररूप हत्तीच्या गंडास्थळावर प्राण (इंद्रिय) हें पाणीदार मोतीं उत्पन्न झालें. गंध (सुवास) ज्ञानाचा प्रफुल्लितपणा तो नासापुटांत (नाकपुड्यांत) येतो. ८१ जी अंतःकरणाची वृत्ति शब्द उच्चारूं पाहते, तें वागिंद्रिय होय. तें तोंडाच्या द्वारानें अक्षरोच्चार करूं लागतें. ८२ मनांतील एक वृत्ति, उपादान कल्पना ग्रहण करते. ती पाणींद्रियांकडून हातांना व्यापारास प्रवृत्त करते. ८३ बुद्धीची आणखी एक विशेषप्रकारची वृत्ति असते. तिला खालीं चालण्याची जी उणीव असते, तिची जागृति होऊन नाकासमोर जाण्याची पायांस चाळणा देते. ८४ आत्मारूप कृष्णाच्या घरीं, चित्तरूप रुक्मिणीच्या पोटीं जन्मास आलेल्या मन्मथाची

रुक्मिणीच्या उदरीं ॥ शिश्न मन्मथाची चाड धरी ॥ रति-
सुखाची ॥ ८५ ॥ अहंकारबीजाचा अंकूर ॥ करूं पाहे म-
लोत्सर्गे व्यापार ॥ गुदस्थानीं बैसूनि निर्धार ॥ पायु इंद्रियें
करी ॥ ८६ ॥ अंतःकरणपंचकवृत्ति ॥ शब्दादिविषयाकार-
स्फूर्ती ॥ तेचि पंच विषय बोलिजेति ॥ लिंगदेहाचे ॥ ८७ ॥
एवं पंचवीस कळांचा ॥ सूक्ष्मदेह जीवाचा ॥ हिरण्यगर्भ तेथीं-
चा ॥ अधिदैवत पैं ॥ ८८ ॥ इंद्रियें सर्वेश्वराचीं ॥ तीं अ-
धिदैवतें जीवाचीं ॥ हे जाणावी विवंचना तेथींची ॥ अ-
धिभूतसहित ॥८९॥ अध्यात्म अंतःकरण ॥ अधिभूत निर्वि-
कल्पस्फुरण ॥ तेथींचें अधिदैवत जाण ॥ वैकुंठनाथ ॥ ९० ॥
मन अध्यात्म निश्चित ॥ मंतव्य अधिभूत तेथ ॥ चंद्रमा अधि-

---

अर्थात् रतिसुखाची शिश्न इच्छा करतें. ८५ अहंकाररूप बीजाचा एक अंकूर, मलमूत्रविसर्जनव्यापार करूं पाहतो तो निश्चयेंकरून गुदस्थानीं बसून पायु इंद्रियाकडून तें काम करवितो.८६ अंतःकरण पंचकाची वृत्ति, शब्द वगैरे विषयरूपानें स्फुरण तेच लिंगदेहाचे पांच विषय म्हटलेले आहेत. ८७ येणेंप्रमाणें जीवाचा सूक्ष्म देह पंचवीस कळांचा आहे. हिरण्यगर्भ हा तेथचा अधिदैवत आहे.८८सर्वेश्वराचीं इंद्रियें तीं जीवाचीं अधिदैवतें होत. अधिभूतासहवर्तमान हा तेथला विचार समजून घ्यावा.८९अंतःकरण हें अध्यात्म, निर्विकल्प स्फुरण तें अधिभूत होय. तेथील अधिदैवत श्रीवैकुंठनाथ ( विष्णु ) होत. ९० मन हें निश्चयेंकरून अध्यात्म, मंतव्य [ विचारस्फुरण ] तें

दैवत॥जाणावें पैं ॥९१॥ बुद्धि अध्यात्म जेथ ॥ बोद्धव्य अधिभूत तेथ ॥ ब्रह्मा अधिदैवत॥जाणावें पैं ॥९२॥ चित्त अध्यात्म जेथ ॥ चेतव्य अधिभूत॥ वासुदेव अधिदैवत ॥ जाणावें पैं ॥९३॥ अहंकार अध्यात्म जेथ॥अहंकृतत्व अधिभूत ॥ श्रीरुद्र अधिदैवत॥ निरंतर पैं ॥९४॥ श्रोत्र अध्यात्म जेथ ॥ श्रोतव्य अधिभूत ॥ दिशा अधिदैवत ॥ सर्वथैव गा ॥ ९५ ॥ त्वचा अध्यात्म जेथ ॥ स्पर्शत्व अधिभूत ॥ वायु अधिदैवत ॥ प्रसिद्ध जाणावा ॥ ९६ ॥ चक्षु अध्यात्म जेथ ॥ द्रष्टृत्व अधिभूत ॥ सूर्य अधिदैवत ॥ विख्यात पैं ॥ ९७ ॥ जिव्हेंद्रिय अध्यात्म

---

अधिभूत व तेथचें अधिदैवत चंद्रमा हें ध्यानांत असूं दे. ९१ जेथें बुद्धि ही अध्यात्म आहे तेथें बोद्धव्य [ज्ञानवृत्ति] हें अधिभूत आणि ब्रह्मा हें अधिदैवत समजावें. ९२ चित्त हें अध्यात्म, चेतव्य [चित्तवृत्ति] हें अधिभूत, आणि तेथेंही वासुदेव अधिदैवत जाणावें. ९३ अहंकार हें जेथें अध्यात्म आलें तेथें अहंकर्तृत्व हें अधिभूत, आणि श्रीरुद्र ( शंकर ) हें निरंतरचेंच अधिदैवत होय. ९४ जेथें श्रोत्र हें अध्यात्म आहे तेथें श्रोतव्य [ श्रोत्रवृत्ति ] हें अधिभूत आणि दिशा हें सर्वथैव अधिदैवत होय. ९५ त्वचा ही जेथें अध्यात्म आहे, तेथें स्पर्शत्व हें अधिभूत, आणि प्रसिद्ध वायु हें अधिदैवत असें समजावें. ९६ चक्षु हे जेथें अध्यात्म आहेत, तेथें द्रष्टृत्व हें अधिभूत, आणि सूर्य हें विख्यात अधिदैवत होय. ९७ जिव्हेंद्रिय जेथें

जेथ ॥ रसयितव्य अधिभूत ॥ वरुण अधिदैवत ॥ ओळखावें ॥ ९८ ॥ घ्राणेंद्रिय अध्यात्म जेथ ॥ गंधत्व अधिभूत॥ अश्विनौदेव अधिदैवत ॥ विख्यात पैं ॥९९॥ वाचा अध्यात्म जेथ ॥ वक्तव्य अधिभूत ॥ वैश्वानर अधिदैवत ॥ जाणावें पैं ॥ १०० ॥ पाणींद्रिय अध्यात्म जेथ ॥ गृहीतृत्व अधिभूत ॥ इंद्र अधिदैवत ॥ निभ्रांत पैं ॥ १०१ ॥ पादेंद्रिय अध्यात्म जेथ ॥ गंतव्य अधिभूत ॥ त्रिविक्रम अधिदैवत ॥ बुझावें गा ॥ १०२ ॥ उपस्थेंद्रिय अध्यात्म जेथ ॥ आनंदयितव्य अधिभूत ॥ प्रजापति अधिदैवत ॥ जाणावें गा ॥ १०३ ॥ पायु अध्यात्म जेथ ॥ विसर्ग अधिभूत ॥ नैर्ऋती अधिदैवत ॥

---

अध्यात्म आहे, तेथें रसयितव्य हें अधिभूत, व वरुण हें अधिदैवत असें ओळखावें. ९८ घ्राणेंद्रिय जेथें अध्यात्म आहे, तेथें गंधत्व हें अधिभूत, आणि अश्विनौदेव हें प्रख्यात अधिदैवत होय. ९९ वाचा जेथें अध्यात्म झाली, तेथें वक्तव्य हें अधिभूत, आणि वैश्वानर [ अग्नि ] हें अधिदैवत जाणावें. १०० हस्तेंद्रिय जेथें अध्यात्म झालें, तेथें ग्रहीतत्व हें अधिभूत, आणि इंद्र हें निःसंशय अधिदैवत होय. १०१ जेथें पादेंद्रिय अध्यात्म आहे, तेथें गंतव्य हें अधिभूत, आणि त्रिविक्रम हें अधिदैवत हें लक्षांत आणावें. १०२ उपस्थेंद्रिय जेथें अध्यात्म आहे तेथें आनंदयितव्य हें अधिभूत, आणि प्रजापति हें अधिदैवत ओळखून ठेवावें. १०३ पायू हें जेथें अध्यात्म, तेथें विसर्ग हें अधिभूत, आणि नैर्ऋती हें प्रसि-

प्रसिद्ध जाणावें ॥ १०४ ॥ अज्ञान अध्यात्म जेथ ॥ विकार-यितव्य अधिभूत ॥ पुरुष अधिदैवत ॥ निभ्रांत पैं ॥१०५॥ जडत्व कारण प्राणासी ॥ तेवींच विषयपंचकासी ॥ अध्या-त्मादीक तयासी ॥ विभाग नाहीं ॥ १०६ ॥ आणीक ऐक कौतुक ॥ हा लिंगदेह जाण पुर्यष्टक ॥ एकाग्र होऊनि ऐक ॥ निरूपिजेल ॥ १०७ ॥ अविद्या काम कर्म ॥ हें पुरत्रय ऐसें वर्म ॥ अंतःकरणपंचक नाम ॥ चतुःपुरातें ॥ १०८ ॥ ज्ञानें-द्रियाचें पंचक ॥ तें पांचवें पुर सम्यक ॥ षष्ठ पुर ओळख ॥ कर्मेंद्रियपंचक ॥ १०९ ॥ पंचप्राण पुर सातवें ॥ विषयपंचक तें आठवें ॥ हें पुर्यष्टक जाणावें ॥ महानुभावीं ॥ ११० ॥ द्र-

द्ध अधिदैवत समजलासना ? १०४ अध्यात्म अज्ञान हें जेथें आहे, तेथें विकारयितव्य हें अधिभूत, आणि पुरुष हें निःसंदेह अधिदैवत होय. १०५ जडत्व हें प्राणाला तसेंच विषयपंचकालाही कारण होय. ह्मणून त्याला अध्यात्म आदिकरून भेद नाहीं. १०६ आणखी एक मौज अशी आहे कीं, हा लिंगदेह आठ पुरांचा बनलेला आहे. तो सांगण्यांत येईल, तर एकाग्र चित्त कर. १०७ अविद्या, वासना, आणि कर्म हीं पहिलीं तीन पुरें ध्यानांत ठेव. अंतःकरण पंचक हें चवथ्या पुराचें नांव होय. १०८ ज्ञानेंद्रियपंचक तें पांचवें सम्यक् [ उत्तम ] पुर होय. पांच कर्मेंद्रियें हीं साहवें पुर होय. १०९ पंचप्राण तें सातवें. आणि पांच विषय तें आठवें पुर होय. महानुभावांनीं हेंच ' पुर्यष्टक ' असें समजावें. ११० द्रष्टयाचें द्रष्टेपण [ आत्मानुभव

द्रष्टयाचें द्रष्टेपण ॥ तोंचि पुर्यष्टकाचें दहन ॥ जाहालिया निरसे बंधन ॥ जीवात्मयाचें ॥ १११ ॥ असो हा शब्दविस्तार ॥ सांगीतला लिंगदेहविचार ॥ आतां स्थूलदेहाचा विस्तार ॥ ह्मणे मुकुंदराज ॥ ११२ ॥ इति श्रीमद्विवेकसिंधौ सृष्टिक्रमे गुरुशिष्यसंवादे लिंगदेहनिरूपणं नाम पंचमप्रकरणं समाप्तम् ॥

---

जागृति ] तें ह्या आठपुरांचें दहन ( जळणें ) होय. तें झालें ह्मणजे जीवात्म्याचें बंधन नाश पावतें. ११ असो. ही शब्दांची लांबण पुरे. आतांपर्यंत लिंगदेहाचा विचार सांगितला. मुकुंदराज ह्मणतात आतां स्थूल देहाचें विवरण करूं. ११२

---

# प्रकरण साहावें.

## विषय—स्थूल देहकथन.

श्रीगणेशाय नमः ॥ अनादि अज्ञानें भ्रमला ॥ जीव लिंगशरीरें आवरला ॥ शुभाशुभकर्मे बांधिला ॥ जाहाला परवश तो ॥१॥ पुण्यपापाचें फळ ॥ सुखदुःख पावतु केवळ॥ स्वर्ग नर्क अविचळ ॥ भोगी कर्मवशें ॥ २ ॥ मनुष्यदेह पावोनी ॥ संत असंत कर्मे अर्जुनी ॥ संसारीं पावे नाना योनी ॥ श्वानसूकरादिक ॥ ३ ॥ पुण्याचेनि अधिकपणें॥ स्वर्गसुख भोगणें ॥ पाप अधिक तरी जाणें ॥ निरयासी आधीं ॥ ४ ॥ आधीं कर्मफल भोगीतु ॥ पुण्यपाप सम तुल्य

---

श्रीगणेशाय नमः—अनादि अज्ञानानें जीव भ्रमात पडला, लिंगशरीरांत गुरफटला गेला; आणि शुभ व अशुभ कर्मांनीं जखडून टाकिला, येणेंप्रमाणें तो ( सर्वस्वी ) परतंत्र होऊन बसला १ सुख व दुःख हें केवळ पुण्याचें व पापाचें फळ मिळतें. आणि हा कर्मानुरूप अखंड स्वर्ग किंवा नरक भोगीत असतो. २ मनुष्याचा देह प्राप्त होऊन बरीं वाईट कर्मे करून संसारामध्यें श्वानसूकरादिक नानाप्रकारच्या योनींत जातो. ३ पुण्यांश अधिक झाला तर स्वर्गसुख भोगावें; आणि पापांश अधिक झाला तर प्रथम नरक लोकाची वाट धरावी. ४ आधीं कर्मफल भोगतो, पुण्य व पाप समस-

करितु ॥ मग मनुष्ययोनी पावतु ॥ जननीये गर्भी ॥ ५ ॥ आधीं पितृदेहीं संचरे ॥ कवणी जीव श्वासरंध्रें ॥ कवणी एक जळपानद्वारें ॥ कर्माधीन होय ॥ ६ ॥ कवणी एक वृष्टी-सरिसा ॥ धान्यांवरी पडे अष्टादशा ॥ लीन होय माजी अन्नरसा ॥ षड्विधासि गा ॥ ७ ॥ सुषुप्तीचिया माळिका ॥ मूढदशा पावे सम्यका ॥ अन्नरसासरिसें एका ॥ पडती पितृदेहीं ॥ ८ ॥ जठराग्नीचेनि संपर्कें ॥ षड्धातूंचेनि परिपाकें ॥ पावे तिसरेनि सप्तकें ॥ शुक्रदशेतें ॥ ९ ॥ पंचभूतांचें धान्य निपजे ॥ तयाचा अन्नरस आपजे ॥ अन्नरसातें शुक्र बोलिजे ॥ पंचभूतात्मक ॥ १० ॥ पितयाचें रेत ॥ आणि मातेचें शो-

---

मान करितो, व मग आईच्या उदरीं येऊन मनुष्ययोनि पावतो. ५ आधीं पित्याच्या देहांत संचरत असतो. जीव कर्माधीन होतो आणि कोणी श्वासमार्गानें, तर कोणी पाणी पिण्याच्या द्वारानेंच पितृदेहांत प्रवेश करितो. ६ कोणी पावसाबरोबर अठरा प्रकारच्या धान्यांवर पडून षड्रस अन्नाच्या रसामध्यें लीन होतात. ७ सुषुप्तीची माळ लागून खऱ्या ज्ञानवंताला मूढावस्था प्राप्त होते, आणि एका अन्नरसाबरोबर पितृदेहामध्यें प्रवेश करितो. ८ जठराग्नीचा संस्कार व षड्धातूंचा पाक घडून तिसऱ्या आठवड्यांत तो शुक्रावस्थेला जाऊन पोहोंचतो. ९ पंचमहाभूतांचेंच धान्य होऊन त्याचाच अन्नरस उत्पन्न होतो. पंचभूतात्मक अन्नरसालाच शुक्र असें ह्मणतात. १० पित्याचें रेत आणि मातेचें शोणित, स्पर्शकाळीं जन-

णित ॥ जननीगर्भीं होय मिश्रित ॥ ऋतुकाळीं ॥ ११ ॥ प्राणापानाचेनि मेळें ॥ योनिमुखीं पितृरेत उसळे ॥ तेथें लिंग देह मिसळे ॥ मनोमेळें ॥ १२ ॥ जरी अधिक पितयाचें रेत ॥ उणें होय मातेचें शोणित ॥ तरी पुत्र निपजे निश्चित ॥ जननीये गर्भीं ॥ १३ ॥ स्त्रीरक्ताचेनि अधिकपणें ॥ कुमारीसी उपजणें ॥ शुक्रशोणिताचेनि समतुल्यपणें ॥ नपुंसक होय ॥ १४ ॥ पितयाचिया रेताचिया ॥ तिन्ही धातू सारखिया ॥ अस्थि शिरा मज्जा येणें नांवें तिया ॥ निपजती पैं ॥ १५ ॥ मातेच्या शोणिताचिया ॥ तिनी धातू सारखिया ॥ त्वचा मांस रक्त ऐसिया ॥ जननीचे गर्भीं ॥ १६ ॥ ऐसें स्थूल देह जीवाचें ॥ निपजे सहा धातूंचें ॥ पट्कोशिक

---

नीच्या गर्भात मिश्रित होतें. ११ प्राण व अपान त्यांच्या योगानें योनिमुखीं पितृरेत उसळतें, व तेथें मनाचा योग होऊन लिंगदेहही त्यांस सामील होतो. १२ पितृरेत अधिक व मातृशोणित कमी असें असलें ह्मणजे निश्चयेंकरून जननीच्या गर्भात पुत्र उत्पन्न होतो. १३ स्त्री शोणित अधिक झालें ह्मणजे कन्या होते; आणि शुक्रशोणित समसमान झालीं ह्मणजे नपुंसक निपजतो. १४ पितृरेताच्या हाडें, शिरा, व मज्जा अशा तीन सारख्या धातु उत्पन्न होतात. १५ मातेच्या शोणितापासून जननीच्या गर्भामध्यें त्वचा, मांस व रक्त अशा तीन सारख्या धातु उत्पन्न होतात. १६ याप्रमाणें जीवाचा जड देह सहा धातूंचा बनतो. म्हणून त्याला 'पट्कोशिक' असें नांव

नाम याचें ॥ ऐसें बोलिजे ॥१७॥ असो हा शुक्रशोणिताचा मेळ ॥ एक अहोरात्रें होय निश्चळ ॥ पांच अहोरात्रें सुढाळ ॥ बुद्बुदाकार ॥ १८ ॥ पक्षदिवशीं अंडाकार ॥ मासा निपजे शिर ॥ भुजा वक्षस्थळ हा विचार ॥ होय दोमासीं ॥ १९ ॥ तीमासीं उदर कटी पृष्ठी ॥ चौथ्या समग्र पाददृष्टी ॥ पांचव्या अस्थि शिरांची दाटी ॥ गर्भासि होय ॥२०॥ षण्मासीं त्वचा रोम ॥ सातव्या नखें केशोद्गम ॥ तेव्हांच प्रगटती चित्तधर्म ॥ स्मरणादिक ॥ २१ ॥ वरील दोमासीं अतिशोच्यता ॥ तंव गर्भासी उठली प्रसूत व्यथा ॥ मग तो पावे मूर्च्छावस्था ॥ बाहेर पडे ॥ २२ ॥ व्यथेचेनि अतिभरें ॥

---

आहे. १७असो. हें शुक्रशोणिताचें मिश्रण एक दिवस व एक रात्र गेली ह्मणजे स्थिर होतें. पांच दिवस व रात्रीं गेल्या ह्मणजे त्याला सुंदर बुडबुड्याचा आकार येतो. १८ पंधरवड्यानें अंडाकृति होते. महिन्यानें शिराची आकृति दिसूं लागते. दोन महिन्यांनीं हात हृदय वगैरे गोष्टी होतात. १९ तिसऱ्या महिन्यांत पोट पाठीचा भाग व कमर; चोथ्यांत पूर्ण पाय व दृष्टि, आणि पांचव्यांत अस्थि व शिरा ह्यांची गर्भाच्या ठिकाणीं गर्दी उडते. २० साहाव्या महिन्यांत त्वचा व केश, सातव्यांत नखें व केंसांची वाढ होते. ह्याच महिन्यांत स्मरण आदिकरून चित्ताचे धर्म प्रगट होतात. २१ पुढल्या दोन महिन्यांत अतिशय दुःख होऊं लागतें. इतक्यांत गर्भाला प्रसूतिवेदना होऊं लागतात. मग त्याला मूर्च्छा प्राप्त होते व तो बाहेर पडतो. २२ अत्यंत तीव्र वेदना होऊं लागल्या ह्मणजे

जातिस्मरत्व विसरे ॥ कोहंकोहं दीर्घस्वरें ॥ रुदन करी ॥२३॥ ऐसा पंचीकृत पंच भूतांचा ॥ स्थूल देह जीवात्मयाचा ॥ कवण अंश कवण भूतांचा ॥ तो तूं ऐक पां ॥ २४ ॥ रोम आणि त्वचा मांस ॥ अस्थि नाडी कठिनांश ॥ पंचीकृत पृथ्वीचे साभास ॥ जाणावे पैं ॥२५॥ लाळ मूत्र शोणित ॥ मज्जा आणि पांचवें रेत ॥ हे द्रवांश आपाचे सत्य ॥ स्थूल शरीरीं ॥ २६ ॥ क्षुधा आणि तृषा निद्रा ॥ आलस्य संग शिष्येंद्रा ॥ हे उष्णांश बुझ समग्रा ॥ तेजाचे पैं ॥ २७ ॥ धावन वलन आकुंचन ॥ प्रसरण आणि निरोधन ॥ हे चलनांश पांचही जाण ॥ पंचीकृत वायूचे ॥ २८ ॥ काम क्रोध शोक मोह भय ॥ हे व्यापकांश पाहे ॥ पंचीकृत नभाचे निः-

---

आपलें मूळचें ज्ञान विसरून जातो, आणि 'कोहं' 'कोहं' मी कोण? मी कोण ? म्हणून मोठ्यानें गळा काढून रडूं लागतो. २३ त्याप्रमाणें जीवात्म्याचा जड देह पंचीकृत भूतांचा बनलेला आहे. आतां कोणत्या भूताचा कोणकोणता अंश तें ऐकून घे. २४ केश, कातडी, आणि मांस, अस्थि व नाड्या हे कठीण भाग पृथ्वीचे अंश होत. २५ लाळ, मूत्र, शोणित ( रक्त ), मज्जा आणि पांचवें रेत हे ह्या जड शरीरांतील द्रवांश उदकाचे होत, हें उघड आहे. २६ हे शिष्यराजा ! तहान, भूक, झोंप, आळस, संग हे सगळे उष्णांश तेजाचे समज. २७ चलन, वलन, आकुंचन, प्रसरण, व निरोधन हे पांचही चलनांश पंचीकृत वायूचे होत. २८ काम, क्रोध, शोक, मोह, व भय हे ह्या जड देहांतील पंचीकृत आकाशाचे निःसंशय पांच

संशय ॥ जाण स्थूल शरीरीं ॥ २९ ॥ ऐसें हें स्थूल शरीर॥ लिंग देहाचें बिढार ॥ तेथें असती षड्विकार ॥ ते एक पां तूं ॥ ३० ॥ प्रथम विकार जायते॥ दुजा अस्ति तिसरा विवर्धते॥ तुरीय विपरीणमते पंचम अपक्षीयते॥ सहावा विनश्यति हे ॥३१॥ जायते ह्मणजे न होउनी होणें॥ अस्ति ह्मणजे नसूनि असणें ॥ विवर्धते ह्मणजे पावणें ॥ अभिवृद्धीतें ॥ ३२ ॥ विपरिणमते तें तारुण्य ॥ अपक्षीयते वार्धक्यपण ॥ विनश्यति ह्मणजे मरण ॥ षड्विकार हे ॥ ३३ ॥ निरूपिले साहाही विकार ॥ इहीं युक्त स्थूल शरीर ॥ तेथें जागृती निरंतर ॥ अवस्था वर्तें ॥ ३४ ॥ स्थूल देह जागृती अवस्था ॥ या दोहींचा अभिमानी विश्व निरुता ॥ या तिहींस आकार

---

व्यापकांश होत. २९ येणेंप्रमाणें हें जड शरीर हेंच लिंग देहाचें बसतिस्थान आहे. तेथें सहा विकार ( स्थिति ) असतात, ते तूं ऐक. ३० पहिला विकार 'जायते' दुसरा 'अस्ति,' तिसरा 'विवर्धते,' चवथा 'विपरिणमते,' पांचवा 'अपक्षीयते,' व साहवा 'विनश्यति' होय. ३१ 'जायते' ह्मणजे नुसतें होणें अस्तित्वांत येणें, 'अस्ति' ह्मणजे नुसतें असणें 'विवर्धते' ह्मणजे वृद्धि पावणें, ३२ 'विपरिणमते' ह्मणजे तारुण्य येणें, 'अपक्षीयते' ह्मणजे वार्धक्य, आणि 'विनश्यति' ह्मणजे मरण, असे हे सहा विकार होतात. ३३ हें जड शरीर ह्या सहा विकारांनीं युक्त असतें आणि येथें निरंतर जागृति ही अवस्था असते. ३४ स्थूल देह आणि जागृति अवस्था, ह्या दोहोंचा अभिमानी खरोखर विश्व आहे. आणि

व्यवस्था ॥ पुढें जाणावी ॥ ३५ ॥ नेत्रस्थान भोग स्थूळ ॥
रजोगुण षड्विधमेळ ॥ प्रणवाचा आद्यचरण सकळ ॥ ऐसें
बुझावें ॥ ३६ ॥ प्रणवाचा प्रथम चरण ॥ हा षड्विध गुण ॥
तेथींचा अर्थ कैसा कवण ॥ तो अवधारिजो ॥ ३७ ॥ पं
चीकृत भूतांविण ॥ नाहीं पिंडब्रह्मांडाचें वर्नन ॥ उत्पत्ती
जागृती जाण ॥ तिहींविण नाहीं ॥ ३८ ॥ उत्पत्ती जागृती-
वीण ॥ ब्रह्मा विश्व अभिमानी कवण ॥ तिहींवीण आकार
हे म्हूण ॥ बोलूंचि नये ॥ ३९ ॥ हें सकळही जेथें नाहीं ॥
तेथें नेत्रस्थान तें कायी ॥ स्थूल भोग नोही ॥ अघटमान
॥ ४० ॥ रजोगुणाचेनि अभावें ॥ मागील कांहींच न सं-
भवे ॥ ह्मणूनि सकळही जाणावें ॥ प्रथम चरण ॥ ४१ ॥

ह्या तिहींच्या रूपाचा प्रकार पुढीलप्रमाणेः—३५ नेत्रस्थान तो स्थूल भोग होय, व रजोगुणाचें सहाप्रकारचें मिश्रण, हा सर्व प्रणवाचा पहिला चरण असें समजावें. ३६ प्रणवाचा पहिला चरण हा षड्विध गुण होय. त्याचा अर्थ काय व कसा तें श्रवण करावें. ३७ पंचीकृत भूतांवांचून पिंडब्रह्मांडाचें अस्तित्व नाहीं. आणि त्या दोहों-शिवाय उत्पत्ति व जागृति हींही नाहींत. ३८ उत्पत्ति जागृतिशिवाय ब्रह्मा व विश्व हे अभिमानी तरी कशाचे? व त्यांच्याशिवाय अकार हें नांवच काढूं नये. ३९ आणि जेथें ह्यापैकीं कांहींच नाहीं तेथें नेत्र-स्थान काय आणि कसलें! स्थूल भोगच मुळीं अघटमान-असणें अशक्य! ४० रजोगुण नसला तर मागचें कांहींच संभवत नाहीं. ह्मणून हे सर्वही प्रथम चरण समजावें. ४१ जीवाचा लिंगदेह हेंच

जीवाचें लिंगशरीर ॥ तें स्वप्नावस्थेचें बिढार ॥ तैजस अभिमानी निरंतर ॥ तया दोहींचा पैं ॥ ४२ ॥ तैजस स्वप्नावस्था लिंगशरीर ॥ या तिहीं उकार विस्तार ॥ कंठस्थान् तें मंदिर ॥ या त्रितयाचें ॥४३॥ सुखदुःखमिश्रित ॥ तेथें भोग प्रविविक्त ॥ सत्वगुण असे प्रसवत ॥ यया पंचकातें ॥४४॥ नेणेंशीं सहित षट्क ॥ जो लिंगदेह प्रवर्तक ॥ द्वितीय चरण ऐसी व्याख्या ॥ बुझ प्रणवाची ॥ ४५ ॥ प्रणवाचा द्वितीय चरण ॥ कैसेनि हा समस्त गुण ॥ ऐशा साक्षेपीं युक्तीची खूण ॥ ने ऐक पां तूं ॥ ४६॥ नघडे सूक्ष्मभूतांवीण ॥ हिरण्यगर्भ लिंगदेहाचें वर्तन ॥ तीहींवीण केचें संभवन ॥ स्थिती स्वप्नावस्थेची ॥ ४७ ॥ जेथें स्थिती अवस्थाचि नाहीं ॥ तेथें अभिमानी कवणाचा काइ ॥ ह्मणूनि विष्णु तैजस दोघेही ॥ अ-

---

स्वप्नावस्थेचें स्थान होय. तैजस हा त्या दोहोंचा निरंतर अभिमानी असतो. ४२ तैजस, स्वप्नावस्था, व लिंगदेह ह्या तिहींचा विस्तार उकार होय. ह्या तिहींचें स्थान तें कंठस्थान होय. ४३ तेथें सुखदुःखमिश्रित गुप्त भोग असतात. ह्या पंचकाला सत्वगुण प्रसवतो. ४४ ट । षट्कासहवर्तमान जो लिंगदेहाचा प्रवर्तक, तोच प्रणवाचा द्वितीय चरण असें ह्मणतात. ४५ हा सर्व गुण हाच प्रणवाचा द्वितीय चरण कसा होतो, ह्या आक्षेपयुक्त कल्पनेचें समाधान तूं ऐक. ४६ सूक्ष्मभूतांशिवाय हिरण्यगर्भ व लिंगदेह ह्यांस अस्तित्वच नाहीं. मग त्याच्याशिवाय स्वप्नावस्था कशी संभवेल? ४७ जेथें स्थिति ही अवस्थाच नाहीं तेथें कोण कशाचा अभिमानी होणार? ह्मणून विष्णु

भिमानी कैसे ॥ ४८ ॥ तिहींवीण कंठस्थानासी योग ॥ नाहीं प्रविविक्त भोग ॥ तेथें सत्वगुणाचा प्रसंग ॥ केवीं बोलावा ॥ ४९ ॥ येणें समस्तेंवीण सर्वज्ञा ॥ नाहीं द्वितीय चरण ऐसी संज्ञा ॥ ह्मणूनि तोचि तो अवज्ञा ॥ कवणें करावी ॥ ५० ॥ अज्ञान जें कारणशरीर ॥ तें सुषुप्तीचें क्रीडामंदिर ॥ तया दोहींचा निरंतर ॥ प्राज्ञ अभिमानी ॥ ५१ ॥ प्रज्ञा सुषुप्ती अज्ञान ॥ हें त्रय मकार जाण ॥ तयासी हृदयस्थान ॥ जाण पैं गा ॥ ५२ ॥ आनंदभोग हृदयींचा ॥ हा विस्तार तमोगुणाचा ॥ तृतीय चरण प्रणवींचा ॥ हें सकळही गा ॥ ५३ ॥ हें सकळहि तृतीय चरण ॥ हा अर्थ केवीं होय घटमान ॥ ऐशा आक्षेपीं जाण ॥ सांगिजेल जें ॥५४॥

---

व तैजस हे दोघेही तेथें कसे अभिमानी होणार! ४८ ह्यावांचून कंठस्थान व गुप्तभोग हेही संभवत नाहींत. मग तेथें सत्वगुणाचें नांव कशाला! ४९ हे सर्व जाणत्या! ह्या सर्वांशिवाय द्वितीय चरण अशी संज्ञाच नाहीं. ह्मणून तोच तो होय. नाहीं काय ह्मणून ह्मणावें. ५० अज्ञान हें कारण शरीर असून तेंच सुषुप्तीचें क्रीडामंदीर आहे. ह्या दोहोंचा निरंतरचा अभिमानी प्राज्ञ होय. ५१ प्रज्ञा, सुषुप्ती, व अज्ञान ही त्रयी हाच मकार होय. हृदय हें त्याचें स्थान हें ध्यानांत ठेव. ५२ हृदयांतील आनंदभोग हा तमोगुणाचा विस्तार होय. हें सर्व मिळून प्रणवाचा तृतीय चरण समजलासना ? ५३ हें सर्व तृतीय चरण कसें होतें? ह्या आक्षेपावर उत्तर देऊं तें ध्यानांत ठेव. ५४ प्रसिद्ध महामायेशिवाय माया-अविद्येचें अधिष्ठान

प्रसिद्ध महामायेविण ॥ नाहीं माया अविद्येचें अधिष्ठान ॥ प्रळय सुषुप्ती रुद्र प्राज्ञ अभिमान ॥ हे कवणासिपां ॥ ५५ ॥ जरी अभाव या त्रितयासी ॥ तरी मकार ही संज्ञा कवणासी ॥ तेथें हृदयस्थान हें कवणासी ॥ इहींविण ॥ ५६ ॥ तिहीं अभिमानांविण ॥ या समस्तांशीं असंभावन ॥ आनंद भोग तो कवण ॥ तेथें तमोगुण कैंचा ॥५७॥ येणें षड्विधेंविण ॥ तृतीय चरण बोलिजे कवण ॥ ह्मणूनि तेंचि तें हें अप्रमाण ॥ कांहींच नव्हे ॥५८॥ एवं तिनी मात्रा प्रणवाचिया ॥ प्रपंचाकारें विस्तारलिया॥ऐशा श्रुती अथर्वणशाखेचिया॥बोलत असती ॥ ५९ ॥ एवं स्थूल लिंग कारण ॥ हें जीवाचें देहत्रय जाण ॥ जागृती स्वप्न सुषुप्ती पूर्ण ॥ अवस्थात्रय गा ॥ ६० ॥ विश्व तैजस प्राज्ञ ॥ अभिमानी त्रय

---

नाहीं. प्रळय, सुषुप्ति, रुद्र, प्राज्ञ, अभिमान हे कोणाला तूं समजतोस ? ५५ ह्या त्रितयाचाच जर अभाव झाला तर मकार संज्ञा तरी कोणाला ? तेथें ह्यांच्याशिवाय हृदय हें स्थान तरी कोणाला ? ५६ त्या अभिमानांवांचून ही सर्व असंभनीयच होत. तेथें आनंदभोग तो कसला ? व तमोगुण तरी कसला? ५७ह्या षड्विधावांचून तृतीयचरण तो कसला ह्मणावयाचा ? ह्मणून तेंच ते होत. ह्यांत असंबद्ध असें कांहींच नाहीं. ५८ अशाप्रकारें प्रणवाच्याच तिन्ही मात्रा प्रपंचरूपानें विस्तार पावल्या आहेत. असें अथर्वणशाखेचा वेद ह्मणतो. ५९ येणेंप्रमाणें स्थूळ, लिंग, व कारण हेच जीवाचे तीन देह होत; आणि जागृति, स्वप्न व सुषुप्ती ह्या तीन अवस्था होत. ६०

सर्वज्ञ ॥ अकार उकार मकार ही संज्ञ ॥ मात्रात्रयीं गा ॥६१॥ नयन कंठ हृदय ॥ हें अवस्थेचें स्थानत्रय ॥ स्थूल प्रविविक्त आनंदज्ञेय ॥ भोगत्रय पैं ॥ ६२ ॥ रज सत्व तम हे गुण ॥ अविद्येचे प्रसिद्ध जाण ॥ आद्य द्वितीय तृतीयचरण ॥ प्रणवाचे ॥६३॥ असो हे सुषुप्ती अज्ञानाची ॥ जागृती स्वप्न ही अवस्था अन्यथाज्ञानाची ॥ ऐसी संसृती अविद्येची ॥ जीवात्मया।मी ॥६४॥ जीवासी अविद्या असाधारण ॥ म्हणोनी संसारासी कारण ॥ नानायोनी संसरण ॥ तें गुणकर्मयोगें ॥ ६५ ॥ एकाचि अवस्थेआंत ॥ गुणत्रयाची एक मात ॥ जेणें नानायोनीसी हेत ॥ कर्मद्वारें ॥ ६६ ॥ गुणत्रयाची वृत्ती ॥ सारखी चेष्टे

---

विश्व, तैजस, प्राज्ञ, हे सर्वज्ञ असे तीन अभिमानी होत. आणि अकार, उकार, व मकार ही मात्रात्रयी होय. ६१ नयन, कंठ, व हृदय हीं अवस्थेचीं तीन स्थानें आणि स्थूल, प्रविविक्त ( सूक्ष्म ) व आनंद हे तीन भोग समजावे. ६२ सत्व, रज, तम हे जे अविद्येचे प्रसिद्ध तीन गुण, तेच प्रणवाचे क्रमानें तीन चरण होत. ६३ असो. सुषुप्ति ही अज्ञानाची, जागृति स्वप्न ही अवस्था अन्यथा ( विपरीत ) ज्ञानाची होय. अशाप्रकारें जीवात्म्याला अविद्येचा संसार लागला आहे. ६४ जीवाला अविद्या ही असाधारण ( नसतीच ) होय. म्हणून तीच संसाराला कारण आहे. आणि नानायोनींत जावें लागतें तें गुण व कर्म ह्यांच्यामुळें आहे. ६५ एकाच अवस्थेमध्यें गुणत्रयाची गोष्ट कशी आहे ती एक. तेच कर्माच्या द्वारें नानायोनींला कारणभूत होतात. ६६ त्रिगुणांची वृत्ति

चित्तवृत्ती ॥ मग इंद्रियें व्यापार करिती ॥ चित्तानुसारें ॥६७॥ सत्वगुण चित्तीं प्रगटे ॥ ते वेळीं पुण्यवासना उठे ॥ इंद्रियें करूनी आदटे ॥ परी अंतीं होतीं शांत ॥६८॥ निपजती कर्मे सात्विकें ॥ जीं उत्तम योनि दायकें ॥ तियें पुरविती कौतुकें ॥ स्वर्गसुखाचीं ॥६९॥ रजोगुण उठे चित्तीं ॥ ते वेळीं अभिलाषीं पावे स्थिती ॥ मग इंद्रियें प्रवर्तती ॥ विषयोद्यमीं ॥७०॥ कर्मे निपजती राजसें ॥ जिये विषयांचेनी अध्यासें ॥ रजोयोनी कर्मवशें ॥ पावे अनुक्रमें ॥ ७१ ॥ चित्तीं तमोगुणाचा होय अवतार ॥ ते वेळीं उठे क्रोधज्वर॥ पापवासनेचें अभ्यंतर ॥ वर्ते इंद्रियग्रामीं ॥७२॥ कर्मे निपजती तामसें ॥

---

चित्तवृत्तीला एकसारखी नाचवीत असते. मग चित्ताच्या अनुरोधानें इंद्रियें व्यापार करूं लागतात. ६७ जेव्हां सत्वगुण चित्तांत प्रगट होतो, तेव्हां तेव्हां पुण्यवासना होऊन इंद्रियें उचंबळूं लागतात, पण तीं अखेर शांत होतात. ६८ त्यामुळें सात्विक कर्मे घडतात. तीं उत्तम योनी प्राप्त करून देणारीं असतात. त्यामुळें स्वर्गसुखाची हौस पुरी होते. ६९ चित्तांत रजोगुण उठला कीं, मनांत अभिलाष उत्पन्न होतो; आणि मग इंद्रियें विषयाच्या प्रयत्नास प्रवृत्त होतात. ७० तेथें राजस कर्मे निपजतात; आणि त्या विषयांच्या ध्यासानें कर्मानुरूप ओळीनेंच रजोयोनी प्राप्त होते. ७१ चित्तांत तमोगुणाचा अवतार ( अवतारच तो! ) झाला कीं, क्रोधज्वर अंगीं भरलाच ! आणि इंद्रियसमूहांत आंतून पापवासना खेळूं लागते ७२ येथें तामस कर्मे निपजतात. ते आपोआपच हीनरूप

जे हीनरूप होती आपैसें ॥ मूढयोनींत कर्मवशें ॥ जीव जन्म पावे ॥ ७३ ॥ जे वेळीं जो गुण उठी ॥ तो येरा दोहींतें आणि तळवटीं ॥ तेथें विषयपरिपाठी ॥ ते सर्वथा नाहीं ॥ ७४ ॥ हें गुणत्रयाचें बंधन ॥ जीवासी पडलें गहन ॥ तंववरी नचुके जन्ममरण ॥ कल्पकोटी ॥ ७५ ॥ ही गुणत्रयाची व्याख्या ॥ जे त्रिगुणसृष्टी असंख्या ॥ जेथें महाप्रळयीं सौख्या ॥ नाहीं स्वरूपाचे ॥ ७६ ॥ जंव जीवासी मलिनदशा ॥ तंव न चुके गर्भवासा ॥ आणिक नटके सहसा ॥ तुर्या भूमी पैं ॥ ७७ ॥ ते तुर्या दशा कैसी ॥ तुज निरूपिजेल ऐसी ॥ तरी अवधान निजमानसीं ॥ दृढ करावें ॥ ७८ ॥ स्वरूपाचें अनुसंधान ॥

---

होऊन कर्मानुसार जीव मूढ योनींत जन्म पावतात. ७३ ज्या ज्या वेळीं जो जो गुण उठतो, त्यावेळीं तो तो दुसऱ्या दोघांना खालीं आणतो, एवढेंच. तेथें ( मुळांत )विषयाचें बिलकुल नांव नाहीं. ७४ जोंपर्यंत ह्या त्रिगुणांच्या बेडीनें जीव अगदीं जखडला गेला आहे, तोंपर्यंत कोटी कल्प गेले तरी जन्ममरण कांहीं चुकावयाचें नाहीं. ७५ हीच त्रिगुणांची व्याख्या होय. त्रिगुण सृष्टि ही असंख्य आहे. तेथें महाप्रळय झाला तरी सुद्धां स्वरूपसुख ह्मणून जें आहे तें नाहींच. ७६ जिवाची जोंपर्यंत मलिन दशा आहे, तोंपर्यंत गर्भवासही चुकावयाचा नाहीं; आणि तुर्यावस्था ही सहसा तिकडे ढुंकून पहावयाची नाहीं. ७७ आतां ती तुर्यावस्था कशी असते तेंही तुला सांगण्यांत येईल. तर नीट चित्त दे. ७८ स्वरूपाचें अनुसंधान, तोच महाकारण देह होय. आणि तेथेंच तुर्या ही सर्व-

तोचि देह महाकारण ॥ तेथें तुर्या अवस्था जाण ॥ सर्वसाक्षिणी ॥ ७९ ॥ तेंचि साक्षित्व आइक ॥ तुज सांगिजेल कौतुक ॥ जेणें तरले जनकादिक ॥ भवसागरीं ॥ ८० ॥ मी जागृती ना स्वप्न ॥ सुषुप्ती ना कल्पना कवण ॥ हे अवस्थात्रय मी न ॥ ना मज आथी ॥८१॥ मी स्थूल ना लिंगदेह॥ अज्ञान ना तत्कार्य मोह ॥ निर्विकार विदेह ॥ परमात्मा मी ॥ ८२ ॥ मी विश्व ना तैजस ॥ प्राज्ञ तोही परवश ॥ हे अभिमानी मी उदास ॥ अभिमानशून्य ॥ ८३ ॥ नयन कंठ हृदय ॥ मज नाहीं स्थानत्रय ॥ स्थानमानरहित अद्वय ॥ तें परब्रह्म मी ॥ ८४ ॥ मी स्थूल ना प्रविविक्त ॥ आनंदही

साक्षिणी अवस्था समजावी ७९. आतां साक्षित्व कसें असतें त्याची मौज तुला सांगूं. ऐक, तेणेंकरून जनकादिक हा भवसमुद्र तरून गेले. ८० मी जागृतिही नव्हें व स्वप्नही नव्हें; मी सुषुप्ति नव्हें कीं, कोणतीही कल्पना नव्हें; मी हे अवस्थात्रयही नव्हें; त्याचा माझ्याकडे कांहीं संबंध नाहीं. ८१ मी जडही नव्हें व लिंगही नव्हें; अज्ञानही नव्हें, किंवा हें त्याचें कार्य [ अविद्येचें उठलेलें आभाळ ] ही मी नव्हें. मी निर्विकार, विदेह, परमात्मा तो मी. ८२ मी विश्वही नव्हें, तैजसही नव्हें. प्राज्ञ ह्मणावा तर तोही परतंत्र आहे. हे अभिमानी आहेत व मी उदास—अभिमानरहित—आहें. ८३ नयन, कंठ, हृदय हीं तीन जीं स्थानें तींही मला नाहींत. तर स्थान मान शून्य, अद्वय, [ केवळ एकीएक ], असें जें परब्रह्म तें मी. ८४ मी स्थूलही नाहीं व प्रविविक्तही ( सूक्ष्मही )

नोव्हे सुषुप्त ॥ असो हे मी गुणातीत ॥ परब्रह्म मी ॥ ८५॥
या परी स्वरूपातें ॥ स्वयें बुझणें निरुतें ॥ तये अवस्था तुर्ये-
तें ॥ बुझीजसू ॥ ८६ ॥ तुर्येची परिपक्वता ॥ तेचि उन्मनी अ-
वस्था ॥ निंबोळियांस मधुरता ॥ जैशी पक्वदशें ॥ ८७ ॥
तुर्या ते शुद्धवासना ॥ तेथें हाचि कडवटपणा ॥ उन्मनी बुझ
निर्वासना ॥ ह्मणूनि गोड ते ॥ ८८ ॥ जैसी साखर उदकीं
विरे ॥ परी तेथींची मधुरता उरे ॥ तैसी तुर्या स्वरूपीं मुर॥
ते उन्मनी गा ॥ ८९ ॥ अवस्था पंचमा नास्ति ॥ ऐसी वदे
वेदश्रुती ॥ ह्मणूनि तुर्येची परिणामस्थिति॥ते उन्मनी कां॥९०॥

---

नाहीं; मी आनंदही नव्हें की सुषुप्तीही नव्हे. असो तर ह्यापैकीं कोणीही मी नव्हें. मी गुणातीत परब्रह्म जें तें मी. ८५ येणेंप्रमाणें आपलें आपणच स्वरूपाला निश्चितपणें जाणणें तीच तूं तुर्यावस्था ह्मणून समज. ८६ ज्याप्रमाणें लिंबें पक्वदशेस आलीं ह्मणजे त्यांस माधुर्य प्राप्त होतें त्याचप्रमाणें तुर्येचीही परिपक्वदशा पूर्ण—श्रेष्ठ पायरी तीच उन्मनी अवस्था होय. ८७ तुर्या ही शुद्ध वासना होय. परंतु तेथें वासना हाच कडवटपणा असतो. आणि उन्मनी अवस्था अगदीं वासनारहित असते हें ध्यानांत ठेव. ह्मणूनच ती उन्मनी गोड असें समज. ८८ ज्याप्रमाणें साखर पाण्यात विरते पण तेथें तिचा गोडपणा राहतो त्याचप्रमाणें तुर्यास्वरूपांत मुरून जी उरली ती उन्मनी अवस्था होय. ८९ पांचवी अवस्थाच नाहीं, असें श्रुतीचें ह्मणणें आहे. म्हणून तुर्येची परिपूर्णावस्था ती उन्मनी असें ह्मणावयाचें. ९० त्वंपदार्थ शोधनाचें येथें सार्थक झालें. हे

त्वंपदार्थाची शोधणूक ॥ ते येथें झाली सार्थक ॥ तदात्मा तो शिष्यटिळक ॥ बुजसी उत्तरार्धीं ॥९१॥ असो ही अवस्था तुर्या ॥ आणि शरीर मायामय ॥ तेथींचा अभिमानी निश्चय ॥ तो प्रत्यगात्मा ॥९२॥ हेच तुर्या गा मैत्रा ॥ प्रणवींची अर्धमात्रा ॥ यांचें स्थान पवित्रा ॥ ब्रह्मरंध्र ॥९३॥ आनंदाभास भोग ॥ या साहांचा समयोग ॥ ऐसा निपजला प्रसंग ॥ शुद्धसत्त्वें ॥ ९४ ॥ या समस्तांचा गुण ॥ तो प्रणवाचा चतुर्थ चरण ॥ स्वरूपीं निर्गुण ॥ नादात्मक तो ॥ ९५ ॥ प्रणवाचेनि चतुर्थ चरणें ॥ हें सर्व कैसेनि होणें ॥ ऐशा आक्षेपीं शाहाणें ॥ आईक तूं ॥ ९६ ॥ गुणसाम्य व्यतिरेकें ॥ महामाया आत्मज्ञानाची नावचि देखे ॥ तरी सर्वसाक्षित्व

---

शिष्यतिलका ! तोच तदात्मा हें तुला उत्तरार्धीं समजेल. ९१ असो. तर ही तुर्यावस्था; आणि येथें माया हेंच शरीर होय. येथचा अभिमानी निश्चयेंकरून प्रत्यगात्मा हा होय. ९२ मित्रा ! हीच तुर्या प्रणवाची अर्धमात्रा होय. ह्याचें पवित्रस्थान ब्रह्मरंध्र होय. ९३ शुद्ध सत्वानें आनंद आभास, व भोग, [ द्विगुणित ] ह्या सहांचा संयोग होई असा प्रकार झाला. ९४ ह्या सर्वांचा गुण तोच प्रणवाचा चवथा चरण होय. तो निर्गुण स्वरूपामध्यें नादरूपानें असतो. ९५ प्रणवाच्या चतुर्थ चरणीं हें सर्व घडतें. ह्या प्रश्नाचें समर्पक उत्तर तूं ऐकून घे. ९६ हें पहा गुणसाम्यव्यतिरेकानें महामाया ही आत्मज्ञानाची नावच आहे. तर सर्वसाक्षित्व तुर्यालक्षणेंकरून दोन अवस्था झाल्या

तुर्या कें ॥ अवस्थाद्वय गा ॥ ९७ ॥ या अवस्थेचेनि संबंधें ॥ अभिमानी येणें शब्दें ॥ परमात्मा प्रत्यगात्मा ऐसीं द्विविधें ॥ नांवें ब्रह्मासचि कीं ॥ ९८ ॥ न भासे जैं महामाया ॥ तैं कैंचें साक्षित्व आणि तुर्या ॥ तीवीण परमात्मप्रत्यगात्मया ॥ अभिमानित्व कैंचें ॥ ९९ ॥ येणें पूर्वोक्तेंविण ॥ कवणाचें मूर्ध्निस्थान ॥ आनंदाभास भोग कवण ॥ बोलेचि गा ॥ १०० ॥ येणें शुद्धपंचकेंविण ॥ शुद्धसत्वाचा विस्तार तो कवण ॥ ह्मणून हें सर्व चतुर्थ चरण ॥ प्रणवाचा पैं ॥ ॥ १ ॥ जेथें वर्णाचा नाहीं उच्चार ॥ ध्वनिमात्राचा व्यवहार ॥ ह्मणूनि अर्धमात्रा ऐसा निर्धार ॥ जाणिजस तूंचि ॥ २ ॥ तथापि चतुर्थ चरण ॥ येणें शब्दें बोले योगिजन ॥

---

आहेत. ९७ ह्या अवस्थांमुळें अभिमानी या शब्दांनीं परमात्मा व प्रत्यगात्मा अशीं दोन नांवें ब्रह्मासच पडलीं आहेत. ९८ मायेचा भास जर नाहींसाच झाला तर मग कोठचें साक्षित्व आणि कोठची तुर्या! तिच्याशिवाय परमात्मा व प्रत्यगात्मा त्यांस तरी अभिमानित्व कसलें? ९९ ह्या पूर्वोक्तावांचून मूर्ध्निस्थान तें कोणाचें? आनंदाभास भोग तो कशाचा? सांग बरें. १०० ह्या शुद्धपंचकावांचून शुद्ध सत्वाची गोष्ट कसली? म्हणून हा सर्व प्रणवाचा चतुर्थ चरण होय. १ जेथें वर्णाचा उच्चार नाहीं, केवळ ध्वनि मात्र असतो म्हणून अर्धमात्रा निश्चयानें तीच. असा निश्चय तुझा तूंच कर. २ तथापि योगीजन ह्मणतात कीं चतुर्थ चरण ह्या शब्दानें तेथें

नेथें परमात्माचि सगुण ॥ निरूपिजे पें ॥ ३ ॥ मग नादासी होय विश्रांती ॥ मायेसी होय उपशांति ॥ उरे केवळ ज्ञप्ती ॥ ब्रह्म सत्तामात्र जें ॥ ४ ॥ असो या महाकारणव्यतिरिक्त ॥ कांहींच नाहीं कार्यजात ॥ ह्मणूनि प्रपंचासी भिन्नत्व ॥ नाहीं परब्रह्मीं ॥ ५ ॥ परब्रह्माचिया सत्ता ॥ कारणप्रपंचासी अस्तिता ॥ तेणें होय विद्यमानता ॥ सूक्ष्म प्रपंचासी ॥ ॥ ६ ॥ सूक्ष्मप्रपंचाविण ॥ स्थूलप्रपंचासी नाहीं वर्तन ॥ ह्मणूनि कार्यचि कारण ॥ जाण येणें न्यायें ॥ ७ ॥ ह्मणूनि अकार तोचि उकार ॥ उकार तोचि मकार ॥ मकार तोचि अनाक्षर ॥ परमात्मा पैं ॥८॥ ऐसें आपणया आपण बुझे ॥ तो जीव शुद्ध बोलिजे ॥ ब्रह्मसाक्षात्कार पाविजे ॥ तेणेंचि पैं॥९॥

---

सगुण परमात्माच घेतला पाहिजे. ३ मग नादही विश्रांति घेतो, मायाही थंड होते, मग केवळ ज्ञप्ति ह्मणजे केवळ सत्ता मात्र ब्रह्म तेवढेंच राहतें. ४ असो. त्या महाकारणावेगळें कार्यजात ह्मणून कांहीं नाहींच ह्मणून परब्रह्माच्या ठिकाणीं प्रपंचाला वेगळे-पणा नाहीं. ५ परब्रह्माच्या सत्तेनें कारण प्रपंचाला अस्तित्व येतें आणि त्यामुळेंच सूक्ष्म प्रपंचालाही अस्तित्व येतें. ६ सूक्ष्म प्रपंचाशिवाय स्थूल प्रपंचही नाहीं. म्हणून कार्यच कारण हा न्याय ध्यानांत आण. ७ ह्मणून आकार तोच उकार, उकार तोच मकार, व मकार तोच अनाक्षर ( वर्णरहित ) परमात्मा होय. ८ त्याप्रमाणें आपणच आपल्याला जाणतो, तो जीव शुद्ध असें ह्मणतात. ब्रह्म साक्षात्कार घ्यावा, असा त्यानेंच. ९ असो. त्या

असो हे ईश्वरोपाधि समष्टि ॥ जीवोपाधि बोलिजे व्यष्टि ॥ ऐसी व्यष्टीसमष्टीची गोष्टी ॥ ते पादत्रय पैं ॥ १० ॥ एवं शवल त्वंपदार्थ ॥ प्रणवाचे पादत्रय यथार्थ ॥ अर्धमात्रा शोधिजीया ऐक्यार्थ ॥ होती असि पदीं ॥ ११ ॥ तो शोधनक्रम कैसा ॥ ऐसें ह्मणसी गा वत्सा ॥ तरी उत्तरार्धी स्वेच्छा ॥ बुझसी तूं ॥ १२ ॥ ऐसी श्रीगुरूची वाणी ॥ ऐकोनि शिष्यशिरोमणी ॥ करितां झाला विनवणी ॥ श्रीमुकुंदराज ह्मणे ॥ १३ ॥ इति श्रीमत्विवेकासिंधौ सृष्टिक्रमे गुरुशिष्यसंवादे स्थूलदेहकथनं नाम षष्ठप्रकरणं समाप्तं ॥

---

ईश्वरोपाधीला समष्टी व जीवाच्या उपाधीला व्यष्टि ह्मणतात. हे व्यष्टिसमष्टीचे प्रकार हेच तीन पाद होत. १० अशा प्रकारें शबल त्वं पदार्थ, प्रणवाचें यथापादत्रय, आणि अर्धमात्रेचा विचार पाहिला ह्मणजे असिपदाचे ठिकाणीं ऐक्यार्थ होतो. ११ आतां तो अर्धमात्रेचा शोधन ( विचार ) क्रम कसा आहे ह्मणशील तर हे वत्सा ! तें तूं उत्तरार्धी हवें तसें समजून घे. १२ श्रीमुकुंदराज ह्मणतात. " अशी श्रीगुरूंची वाणी ऐकून शिष्यशिरोमणि विनंति करूं लागला. " १३

# प्रकरण सातवें.

विषयः—'सर्व ब्रह्ममिति' विवरण.

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजया जी श्रीगुरुनाथा ॥ माझि-या प्रश्नाची कथा ॥ राउळें निरूपिली समस्ता ॥ अनुक्रमें ॥ ॥१॥ माया अविद्या ते आरिसे ॥ तेथें ब्रह्म प्रतिबिंबे आपैसें ॥ ते जीवेश्वर ऐसें ॥ वेदांतीं बोलिले ॥ २ ॥ परब्रह्म स्व-संवेद्य ॥ जें जीवेश्वरां वंद्य ॥ तेथूनि उठती माया अविद्या ॥ विवर्तरूपें ॥ ३ ॥ येथें आक्षेप असे थोरु ॥ मुख्य बिंबा होय आकारु ॥ तरी प्रतिबिंबाचा ओडंबरु ॥ दिसे रसदर्पणीं ॥ ४ ॥ निराकार ब्रह्मासी ॥ प्रतिबिंबाची कुटी कायसी ॥

---

श्रीगणेशायनमः—श्रीगुरुनाथा! आपला जयजयकार असो. देवांनीं माझ्या प्रश्नाच्या गोष्टी सर्व कांहीं अनुक्रमानें सांगितल्या. १ माया अविद्या हे आरसे होत. तेथें ब्रह्म हें आपोआपच प्रतिबिंबित होतें आणि वेदांतांत त्यालाच (ब्रह्मप्रतिबिंबालाच) जीवेश्वर ह्मटलेलें आहे. २ परब्रह्म हें स्वसंवेद्य (आपलें आपल्यासच जाणलें जाणारें) आहे. जें जीवेश्वराला वंद्य आहे. तेथून माया अविद्या विवर्तरूपानें उद्भवतात. ३ तेथें एक मोठी शंका अशी येते कीं, मुख्य बिंबाला जर आकार असेल तरच प्रतिबिंबाचा ओडंबर ह्मणजे गारुडी खेळ (रस?) आरशांत दिसूं लागतो. ४ निराकार ब्रह्मा-

तरी या आक्षेपासी ॥ उत्तर दीजे स्वामियां ॥ ५ ॥ ऐसा शिष्याचा संदेह ॥ ऐकूनि उठिला स्नेह ॥ मग सर्वज्ञाचा राव ॥ बोले श्रीगुरुनाथ ॥ ६ ॥ बिंबप्रतिबिंब न्याय ॥ तेथींचा बुझसी अभिप्राय ॥ तेवेळीं तुझा आक्षेप वाय ॥ तूंचि ह्मणसी ॥ ७ ॥ निराकार निराभासे ॥ बिंब प्रतिबिंब कायसें हें वाक्य तुझें अनारिसें ॥ केवीं ह्मणावें॥ ८॥तथापि माया ते साभास ॥ अविद्या तेही तदंश ॥ उभयांचें लक्षण अनादृश्य ॥ नव्हे स्फूर्तिवीण ॥९॥ आपणापें अवलोकितां॥ ब्रह्मीं स्फुरे पूर्ण अहंता ॥ ह्मणूनि मायेसी साभासता ॥ असेचि कीं ॥ १० ॥ अज्ञानपूर्वक अन्यथाज्ञान ॥ ऐसें अविद्येचें ल-

---

ला हा प्रतिबिंबाचा आळ आला कोठून ? तर स्वामींनीं त्या शंकेचें समाधान करावें. ५ हा शिष्यास पडलेला संशय ऐकून (सहजच) करुणा आली आणि मग सर्वज्ञांचे राजे श्रीगुरुनाथ बोलूं लागले. ६ तर बाबा! बिंबप्रतिबिंबन्याय जो आहे, त्याचा भावार्थ जेव्हां तुला बरोबर कळेल तेव्हां आपली शंका व्यर्थ आहे, असें तुझें तूंच ह्मणशील. ७ जें निराकार व निराभास, तेथें बिंबप्रतिबिंब हें कशाचें ? ही तुझी शंका भलतीच कांहींतरी आहे असें कसें ह्मणावें ? ८ तथापि माया ही साभास आहे; अविद्याही सुद्धां तिचाच अंश होय. स्फूर्तीवांचून त्या उभयतांचेंही लक्षण स्पष्ट होत नाहीं. ९ आपण कोण हें पाहूं गेलें तों ब्रह्माच्या ठिकाणीं पूर्ण अहंता स्फुरण पावली. ह्मणून मायेला साभासता आहेच. १० अज्ञानपूर्वक अन्यथा (विपरीत ज्ञान) ज्ञान हेंच अविद्येचें लक्षण होय. ह्मणून वेदांतांत

क्षण ॥ ह्मणूनि तेही साभास खूण ॥ बोलिजे वेदांतीं ॥ ११ ॥
पांचही दर्शनें जंबुकें ॥ वेदांतसिंहाचे हाकें ॥ ऐकूनि ह्मणती
राखे ॥ भाजलों जी ॥ १२ ॥ पांचही दर्शनें ॥ परस्परें क-
रिती साजणें ॥ वेदांताचेनि भ्यालेपणें ॥ ऐसें गमे ॥ १३ ॥
पांचही दर्शनांशीं झुंजार ॥ हा वेदांतासी साजे बडिवार ॥
जो एकांगवीर ॥ ख्यातिवादियां ॥ १४ ॥ ह्मणोनि वेदांतें
बोलावें ॥ तेंचि साच मानावें ॥ येर तें सोडावें ॥ पाषांडमत
॥ १५ ॥ वेदांताच्या एकदेशीं ॥ वर्तन नैय्यायिक वैशेषिकासी
तीं पूर्वपक्ष वेदांतासी ॥ ह्मणूनि सांडावीं ॥ १६ ॥ वेदांता-
चिया पूर्व भागातें ॥ भाट्ट प्राभाकर बोलते ॥ चित्तशुद्धीसी

---

तीही साभास असल्याचें सांगितलें आहे. ११ पांचही दर्शनें हीं कोल्हीं होत. तीं वेदांतसिंहाची गर्जना ऐकून ह्मणूं लागलीं महाराज चरणीं लागलों. शरणागताचें रक्षण करावें. १२ वेदांताच्या धाका-नेंच पांचही दर्शनें एकमेकांची साजिलवारकी करितात, असें वाटतें. १३ पांचही दर्शनांबरोबर झुंज खेळणारा ही प्रौढी फक्त एका वेदांतालाच शोभते. मोठमोठ्या वाद खेळणारांमध्यें तर हा एकांगवीर होय. १४ ह्मणून वेदांतांत जें सांगितलेलें आहे तेंच खरें मानावें. बाकीचें मत तें पांखाड मत होय. तें टाकून द्यावें. १५ नैय्यायिक व वैशेषिक वेदांताची एकच बाजू धरतात. तीं वेदांताचा पूर्वपक्ष होत. ह्मणून तीं सोडून द्यावीं. १६ भाट्ट प्राभाक-रामध्यें वेदांताच्या पूर्वभागाचें निरूपण आहे. तें फक्त चित्तशुद्धीस कारणभूत आहे. परंतु तें कांहीं पर--श्रेष्ठ--परब्रह्मसंबंधी सिद्धांत

हेतुभूतें ॥ परी सिद्धांत नव्हती ॥ १७ ॥ वेदांगत्व प्रमाणें ॥ होती कीर हीं दर्शनें ॥ परी साधनेंचि साध्य कवणें ॥ बोलिजेल ॥ १८ ॥ जैसें बहिरंग साधन ॥ नव्हे तृप्तीसी कारण ॥ तैसें मुक्तीविषयीं अप्रमाण ॥ कर्मकांड हें ॥ १९ ॥ येरें दर्शनें समस्तें ॥ वेदबाह्य ह्मणौनि कुमतें ॥ वेदार्थाचा तत्त्वार्थ वेदांतें ॥ बोलावागा ॥ २० ॥ असो हें मायाअविद्येचें लक्षण ॥ जेथें नाहीं साचारपण ॥ परी साभासपणाची खूण ॥ ते अनारिसी नव्हे ॥ २१ ॥ एक स्वरूपोन्मुख स्फुरण ॥ दुसरी ते विपरीत कल्पना जाण ॥ तरी वेद्यत्वें साभासपण ॥ ते बोलूंचि नये ॥ २२ ॥ ब्रह्म कीर निराभास ॥ परी माया

---

नव्हत. १७ दर्शनें हीं खरोखरी वेदांताचीं प्रमाणें होत. परंतु साधनें तींच साध्य असें कोण बरें ह्मणेल? १८ जसें बहिरंगसाधन बाह्योपचार हे देवाच्या तृप्तीला कारण होत नाहींत, तसेंच हें कर्म कांडही मुक्तीला प्रमाण ह्मणतां येत नाहीं. १९ बाकीचीं सर्व दर्शनें हीं वेदबाह्य होत ह्मणून कुमतें ह्मणजे ग्राह्य मतें नव्हत. अरे! वेदांचा तत्त्वार्थ वेदांतानेंच सांगावा. २० असो. तर हें माया अविद्येचें लक्षण होय. येथें खरेपणा—शाश्वती—ह्मणून नाहींच. परंतु मिथ्याभासाचें लक्षण कांहीं याहून वेगळें नाहीं. २१ एक स्वरूपोन्मुख झालेलं स्फुरण, व दुसरी ती विपरीत कल्पना हें खरें, तरी साभासपण—ह्मणजे मिथ्याभास हा वेद्य ह्मणजे जाणलें जाणण्यास योग्य जें परब्रह्मस्वरूप त्याचा धर्म असें मुळींच समजूं नये. २२ ब्रह्म हें खरोखरी निराभास आहे. परंतु माया अविद्या ह्यांस भास

अविद्या साभास ॥ ह्मणूनि तेथें उठती प्रतिभास ॥ परब्रह्मींचे ॥ २३ ॥ शुद्ध चैतन्येंवीण ॥ नाहीं माया अविद्येचें स्फुरण ॥ ह्मणूनि त्यासी अधिष्ठान ॥ चैतन्यचि कीं ॥२४॥ जेथें माया अविद्या स्फुरे ॥ तेथें चैतन्य आधीं संचरे ॥ तेणेंवीण यातें वारे ॥ कवण दाखवी पां ॥२५॥ माया अविद्येचिया अवभासा ॥ चैतन्यांश उठे सरिसा ॥ तेथें प्रतिबिंब ऐसा ॥ शब्द बोलिजे ॥ २६ ॥ घटमठा सरिसें ॥ निरालंब गगन प्रवेशे ॥ तें घटाकाश मठाकाश ऐसें ॥ नांव ठेविलें ॥ २७ ॥ हां गा तुझिया वासना ॥ स्फूर्तीये तत्क्षणीं अधिष्ठिजे चैतन्या ॥ तैसें माया अविद्या जाणा ॥ ब्रह्म अधिष्ठी ॥२८॥

---

आहे. ह्मणून तेथें परब्रह्मींच्या प्रतिभासांची परंपरा लागते. २३ शुद्धचैतन्यावांचून मायाअविद्येचें स्फुरण नाहीं. ह्मणून त्यास चैतन्य हेंच अधिष्ठान आहे. २४ मायाअविद्येचें स्फुरण झालें कीं, त्यांच्या आधींच तेथें चैतन्याचा प्रवेश झालेला असतो. त्याच्याशिवाय त्यांना व्यक्त दशेस आणणारा दुसरा कोण आहे! २५ माया अविद्येचा भास होतांक्षणींच चैतन्याचा अंश उद्भवतो. त्यालाच बिंब अशी संज्ञा आहे. २६ घटमठांबरोबर निरालंब आकाश प्रवेश करतें त्याला घटाकाश व मठाकाश अशीं नावें देतात. २७ अरे असें पहा कीं, तुझ्या वासनाची स्फूर्ति होताक्षणींच चैतन्य अधिष्ठित होतें, तसेंच माया अविद्या ह्यांच्याबरोबरच ब्रह्म अधिष्ठित होतें, असें समज. २८ माया अविद्या हीं मिथ्या भास आहेत. येथें निराभास ब्रह्माचा अनुभव घेतला कीं तेणेंकरून हें

माया अविद्या कीर साभास ॥ तेथें अनुभविजे ब्रह्म निराभास ॥ जेणें वसविजे वोस ॥ वासनात्मक हें ॥२९॥ अगा परब्रह्म नव्हे तें शून्य ॥ तें जाण शुद्धचैतन्य ॥ ह्मणूनि जाणती ते धन्य ॥ निराभास जरी ॥३०॥ बिंबस्थानीं ब्रह्म उपमिजे ॥ प्रतिबिंब जीवेश्वर बोलिजे ॥ हा बिंब प्रतिबिंब न्याय जाणिजे ॥ वेदांतशास्त्रीं ॥३१॥ परब्रह्मीं नाहीं बिंब ॥ तेथें कायसें प्रतिबिंब ॥ तथापि जो दृष्टांतडिंब ॥ बुझावया देणें ॥ ३२ ॥ जो साम्याचि परी विकळ ॥ तो दृष्टांत नव्हे निर्मळ ॥ अहो प्रासाद कैसा धवळ ॥ कृष्णकाग जैसा ॥३३॥ एवं मायीक दोष ॥ दृष्टांतासी ओळख ॥ इहीं वर्जित दूषित

जें वासनामय आहे तें सारें ओस पडतें. २९ अरे! परब्रह्म ह्मणजे कांहीं शून्य नव्हे. तें शुद्ध चैतन्य असें समज. ह्मणजे तें जरी भासरहित आहे तरी तें जाणतात ते धन्य होत. ३० ब्रह्म हें बिंबस्थानीं कल्पावें, आणि जीवेश्वर तें प्रतिबिंब समजावें. हाच वेदांत शास्त्रांत बिंबप्रतिबिंब न्याय होय. ३१ परब्रह्माच्या ठिकाणीं बिंबच नाहीं मग तेथें प्रतिबिंब कोठचें? परंतु समजूत पटण्याकरितां बिंब हा दृष्टांत द्यावयाचा एवढेंच! ३२ उपमा ह्मणूनच दिलेली खरी परंतु ती उणास्र असेल तर तो कांहीं निर्मळ दृष्टांत नव्हें. “ अहो! वाडा काय पण सफेत दिसतो आहे, की जसा कांहीं काळा कुळकुळीत कावळाच! ” ३३ एवंच दृष्टांतामध्यें मायिक दोष हा आहेच. तरी पण ते ज्यांनीं टाकिले किंवा दूषित ह्मटले ते शास्त्रबहिर्मुख ( शास्त्रें कधींही न पाहणारे ), मूर्ख होत.

तें मूर्ख ॥ शास्त्रबहिर्मुख पैं ॥ ३४ ॥ शास्त्रबाह्य दूषण ॥ दृष्टांतासी देती मूर्ख जन ॥ तया दृष्टांता खंडन ॥ तेणेंचि न्यायें ॥ ३५ ॥ मुख श्लेष्म्यानें जडलें ॥ अस्थिमांसें सकळ भरलें ॥ तथापि चंद्रासी उपमिलें ॥ तें दूषण काई ॥ ३६ ॥ पूर्णचंद्रासी वर्तुळता ॥ आणि असे निर्मळता ॥ ह्मणूनि उपमिजे वक्त्रा ॥ पूर्ण चंद्रेंसी ॥ ३७ ॥ अगा एकदेशी दृष्टांत ॥ दृष्टींत कीर असे वर्तत ॥ ह्मणूनि शास्त्रबाह्य वितर्क ॥ तूं न करी पां ॥३८॥ कवण प्रमाणासी आंत ॥ शास्त्रें बोलिजे दृष्टांत ॥ ऐसी जे नेणती मात ॥ ते दूषितु काय ॥३९॥ ॥ ३९ ॥ कवणें भूषणें दूषणें ॥ दृष्टांतासी जो नेणे ॥

---

३४ मूर्खलोक दृष्टांत हे शास्त्रबाह्य ह्मणून दूषण देतात. तेव्हां त्या दृष्टांताचें खंडन त्याच न्यायानें करावयाचें. ( वरच्या ओवींत शास्त्रबहिर्मुख ह्मटलेंच आहे. ) ३५ श्लेष्म्यानें जडलेलें, हाडें मांस ह्यांनीं सारें भरलेलें, असें मुख असून त्याला चंद्राची उपमा दिली तर तें दूषण होतें काय ? ३६ पूर्ण चंद्राचे ठिकाणीं गोलाकार व स्वच्छ प्रकाश ( तेज ) हीं असतात. ह्मणूनच बोलणारा पूर्ण चंद्राची उपमा देतो. ३७ अरे ! एक पक्षी दृष्टांत हें खरोखरी दृष्टींत वागत असतात. ह्मणूनच तूं भलतेंच शास्त्रबाह्य कुतर्क काढूं नकोस. ३८ किती प्रमाणाच्या आंत शास्त्रानें दृष्टांत द्यावा, हें ज्यांना माहीत नाहीं, ते दूषण देणारे कसले ! ३९ दृष्टांताला भूषणें कोणतीं व दूषणें कोणतीं ? हींच ज्यांना ठाऊक नाहींत, त्यांच्याशीं बोलणें

तेणेंसीं बोलणें ॥ ते विटंबनाच कीं ॥ ४० ॥ असो हे मायाअविद्यासंबंधें ॥ तूंचि जीवेश्वरभेदें ॥ जाहलासी पूर्ण विनोदें ॥ विश्वाकारगा ॥ ४१ ॥ हें तुझेंचि ऐश्वर्य ॥ तें अनादि माया कार्य ॥ ते माया तूंचि हें आश्चर्य ॥ नवल तुझें ॥४२॥ राणे हो आपुल्या सखा ॥ तुह्मीच झालेति अशेखा॥ हें तुह्मीच नोळखा ॥ यासी कवणें काय कीजे ॥४३॥ तुझियाचि माये गुंतले ॥ अनादिलाघव हें नाथिलें ॥ हें तुज बंधन पडलें ॥ वज्ररूप ॥ ४४ ॥ जैसें गगनीं आभाळ ॥ ना तरी तरणीं मृगजळ ॥ तैसें नाथिलें आडजाळ ॥ तुज पडिलें हें ॥४५॥ व्याघ्र निजच्छायेसी उफाडे॥जैसें भ्याड भ्याड वापुडें॥

---

ह्मणजे विटंबनाच ती ! ४० असो. ह्या मायाअविद्येसंबंधानें बाबा ! तूंच जीवेश्वर भेदानें पूर्ण गमतीखातर विश्वरूप झाला आहेस. ४१ हें तुझेंच ऐश्वर्य होय, तें अनादि मायेचें कार्य आहे आणि ती मायाही तूंच. हा तुझा विलक्षण चमत्कार आहे ४२ अहा ! महाराज! आपल्या सुखासाठीं तुह्मीच सर्व कांहीं झालां आहां. हें तुमचें तुह्मांलाच समजत नाहीं, ह्याला कोणी काय करावें ? ४३ तुझ्याच मायेनें गुरफटलेलें हें अनादि मिथ्या लाघव ( हातचलाखी ) आहे. हें बंधन तुला वज्ररूप झालें आहे. ४४ आकाशांत ज्याप्रमाणें आभाळ उठावें, किंवा सूर्यप्रकाशात ज्याप्रमाणें मृगजळ भासावें, त्याचप्रमाणें तूं ह्या नसत्याच जाळ्यांत सांपडला आहेस. ४५ वाघ खरा; पण त्यानें आपल्याच छायेला दचकून तीन ताड उडावें आणि बिचारा अगदीं भेदरून जावा त्याचप्रमाणें ह्या संसारानें तुला

तेसें केलेंसे वेडें ॥ संसारें तुज ॥ ४६ ॥ तरंगाचेनि आटोपें ॥ समुद्र जरी वाशिपे ॥ नातरी शेष हा कांपे ॥ निज फूत्कारीं ॥ ४७ ॥ आपुलीये हाके॥ सिंह जैसा वचके ॥ नातरी जलधर धाके ॥ निज गर्जनें ॥ ४८ ॥ निजशक्तीचेनि ओडंबरें ॥ तैसा तूं भुललासी वा रे ॥ येरवीं सकलही कीर रे ॥ तूंचि ब्रह्म ॥ ४९ ॥ तरंगाचेनि बडिवारें ॥समुद्रचि कीर स्फुरे ॥ परी तरंगाचेनि आकारें ॥ समुद्राचि कीं ॥ ५० ॥ तरंग आपणपें योजी ॥ तरी तोचि कीं समुद्र गाजी ॥ ह्मणूनि देहा एवढेपणाची वाजी ॥ तुज नलवी पा तूं ॥ ५१ ॥ देहाएवढेपण॥ हें आत्मयासी बंधन ॥ ह्मणूनि बुझ परिपूर्ण ॥ परब्रह्म तूं ॥ ५२ ॥

---

अगदीं वेडें पिसें करून सोडलें आहे. ४६ लाटा आटपल्याबरोबर समुद्र जसा कोरडा ठणठणीत पडावा; किंवा आपल्याच फूत्कारानें शेषाला कंप सुटावा; ४७ अथवा आपल्याच गर्जनेनें सिंहाला जशी धडकी भरावी; किंवा आपल्याच गडगडाटानें मेघाला धाक बसावा. ४८ त्याचप्रमाणें तुझ्याच शक्तीच्या गारुडानें तुला भूल पडली आहे. बाकी पाहू गेलें तर हें सर्वही तूंच ब्रह्म आहेस. ४९ खरोखर मोठमोठ्या लाटांनीं समुद्रच उसळत असतो. परंतु लाटांचा आकारही समुद्रच असतो. ५० लाट आपण होऊनच उठली तरी तो सुप्रसिद्ध समुद्रच होय. ह्मणून देहाएवढेपणाचा ( मी देहच आहें असा ) आरोप तूं आपणांस लावून घेऊं नको. ५१ मी देहच आहें असें मानणें हेंच आत्म्याचें बंधन आहे. ह्मणून तूंच परिपूर्ण ब्रह्म आहेस, हें ध्यानांत आण. ५२ देहाच्या मिथ्या आरो-

देहाचेनि अभ्यासें ॥ आत्मया मीपणाचें पिसें ॥ लागलें अनादि ऐसें ॥ ह्मणोनि सांडावें ॥ ५३ ॥ अगा सर्वेही आपण व्हावें ॥ अथवा कांहींच न व्हावें ॥ कांहींच न होऊन असावें ॥ नेणूं काई जें ॥ ५४ ॥ कांहींच न व्हावया पासाव ॥ सर्वेही होणें हें बरव ॥ जेथें सुखदुःखासी वेगळीव ॥ आथीचना ॥ ५५ ॥ आदि अंतीं साळी देखिली ॥ मध्यें तृणाकार विस्तारिली ॥ परी साळी येणें शब्दें बोलिली ॥ विबुधजनीं ॥ ५६ ॥ तैसें आदिअंतीं ब्रह्मचि असे ॥ मध्यें प्रपंचाकार भासे ॥ परी सर्वेही ब्रह्मचि असें ॥ वेदीं बोलिजे ॥ ५७ ॥ जो आपण ब्रह्म झाला ॥ तो प्रपंचातें वि-

पानें आत्म्याला मीपणाचें वेड प्रथमच लागलें आहे. ह्मणून तें टाकून द्यावें. ५३ अरे, सर्वच आपण होऊन रहावें किंवा कांहींच न व्हावें. परंतु कांहींच न होऊन असावें. ह्मणजे काय तें कोण जाणे ! ५४ ह्मणून कांहींच न होण्यापेक्षां सर्वच कांहीं होऊन असावें तें उत्तम ! कारण, सुखदुःखाची भिन्नता ह्मणून तेथें नसतेच. ५५ आरंभीं ( पेरतांना ) व शेवटीं [ धान्य काढून झाल्यानंतर ] ही साळी [ एक धान्य ] च पाहिली, परंतु मध्येंच [ पेरल्यानंतर ] तृणाच्या रूपानें विस्तार पावली. परंतु शाहण्यांनीं तिलाही साळी असेंच नांव दिलें ५६ तसेंच आदि अंतीं ब्रह्मच आहे, परंतु मध्यें मात्र प्रपंचरूपानें भासमान झालें आहे. परंतु वेदांनीं सर्वच ब्रह्म असें ह्मटलें आहे. ५७ जो स्वतः ब्रह्मस्वरूपच झाला, तो प्रपंचाचा जो विचार करावयास जातो,तो समूळ प्रपंचच ब्रह्मरूप झालेला त्याच्या

चारूं गेला ॥ तंव ब्रह्मचि प्रपंच देखिला ॥ समूळ हा ॥५८॥ ब्रह्मवृक्षाचे पोटीं ॥ प्रपंच फळ उठियेलें देठीं ॥ तेथें ब्रह्मत्वाची तुटी ॥ कां आणावी गा ॥५९॥ हां गा साचेविण ॥ लटिकें नाहीं ऐसें जाण ॥ तरी तेंचि तें शाहाणे ॥ जाणावें कीं ॥ ६० ॥ तत्त्वता तूं निराकार ॥ जगज्जीव ईश्वर ॥ ते तुझेचि अंकुर ॥ आनंदकंदाचे ॥ ६१ ॥ जया बीजाचा अंकुर ॥ आणि तेथून जो विस्तार ॥ सर्वही एक हा निर्धार॥ विश्वविद तूं ॥६२॥ अहो अंगासी संलग्नें ॥ केश नखें अचेतनपणें ॥ तीं चैतन्यासी वेगळीं कवणें ॥ निवडावीं पां ॥ ६३ ॥ तैसें अचेतन हें निखिल ॥ चैतन्यासी नाहीं वेगळ ॥ ह्मणूनि ब्रह्मचि केवळ ॥ तूंचि एक ॥ ६४ ॥ तंव शिष्यें वि-

---

दृष्टीस पडला. ५८ ब्रह्मरूप वृक्षाचे पोटीं प्रपंचरूप फळ देठाला धरलेलें आहे. मग तेथें ब्रह्मपणाची तूट काय ह्मणून आणावी? ५९ अरे! असें पहा खोटें हें खऱ्यावांचून नाहीं. ह्मणून शहाण्यानें तेंच तें असें समजावें- ६० तत्त्वतः तूं निराकार आहेस. जगज्जीव व ईश्वर हे तुझेच आनंदकंदाचे अंकूर होत. ६१ ज्या बीजाचा अंकूर आणि त्यापासून झालेला जो विस्तार तो सर्वही एकच, हें अगदीं निश्चित आहे. तूं साऱ्या विश्वाला जाणणारा आहेस. ६२ अहो! अंगालाच चिकटून वाढलेलीं केश व नखें जरी अचेतन असतात, तरी आंतील चैतन्याहून वेगळीं ह्मणून तीं कशीं बरें ह्मणतां येईल! ६३ त्याचप्रमाणें हें दरोबस्त सर्व अचेतन आहे. तरी तें चैतन्याहून भिन्न नाहीं. ह्मणून तूं तें एक ब्रह्मच आहेस. ६४ तेव्हां शिष्य विनंति करूं लागला कीं

नविजे ॥ सर्व ब्रह्म श्रुती बोलिजे ॥ तरी विषयसंगें कां बुडिजे ॥ भवसागरीं ॥६५॥ ऐशा आक्षेपीं उत्तर ॥ बोलिजेल सुंदर ॥ तें एक तूं चतुर ॥ अधिकारभेदें ॥६६ अद्वैतबोधाविण ॥ विषयसंगें पडे बंधन ॥ जैसें निजशस्त्रें मरण ॥ भ्रमितासि गा ॥ ६७ ॥ जैसी पंथींची सिदोरी ॥ वेगळी विटाळे नानापरी ॥ एकत्व झालिया कुसरी ॥ काय विटाळाची ॥६८॥ देहादिक विषयजात ॥ ब्रह्मचि कीर समस्त ॥ तथापि त्यजिती विरक्त ॥ नेति नेति मुखें ॥ ६९ ॥ जे जे वस्तु अनात्मा ॥ ते ते त्यजावी महात्मा ॥ तरी स्वयंप्रकाशात्मा ॥ सहजचि भेटे ॥ ७० ॥ लवण पाणीयाचा बांध ॥ हा कीर

---

' सर्व ब्रह्म असें श्रुति ह्मणते. तर ह्या भवसमुद्रांत विषयसंगानें बुडावयाला कां होतें? ६५ ह्या आक्षेपावर सुंदर उत्तर देण्यांत येईल. हे चतुरा! तें तूं अधिकाराच्या पायरीप्रमाणें एक. ६६ अद्वैताचा बोध झाला नाहीं तोंपर्यंत भ्रमिष्टाला जसें आपल्याच शस्त्रानें मरण यावें तसेंच विषयसंगानें बंधन घडावयाचेंच. ६७ जशी प्रवासातील शिदोरी वेगवेगळी असली ह्मणजे ती निरनिराळ्या प्रकारें विटाळते. परंतु ती एक झाल्यावर मग विटाळाची गोष्ट कशाची? ६८ खरोखर देहादिक सर्व कांहीं विषयजात ब्रह्मरूपच आहेत, तथापि ते ' नेति नेति ' च्या द्वारानें विरक्त जन टाकून देतात. ६९ जी जी वस्तु नाशिवंत—(अनात्मा)—ती ती हे महात्म्या टाकून द्यावी. ह्मणजे स्वयंप्रकाश आत्मा सहजच भेटतो. ७० मीठ ह्मणजे पाण्याचें बनलेलें, हें तर खरोखर जगामध्यें मह-

जगीं प्रसिद्ध ॥ परी तृषार्थी सेवितां शुद्ध ॥ मरणचि कीं ॥ ७१ ॥ जैसें रायेणाचें भातुकें ॥ आरोगिती कौतुकें ॥ परी भीतरील कडूपण तितुकें ॥ सांडिती कीं ॥ ७२ ॥ जें पाणियाचें लवण ॥ तृषार्थी करी सेवन ॥ तरी तृषेनिमित्त मरण ॥ न चुकेचि कीं ॥ ७३ ॥ जयाची तृषा वोळे ॥ उदकें सुशीतळें ॥ मग लवण अतिरसाळ ॥ जिव्हेंद्रियासी ॥ ७४ ॥ जे महारोगें सदोष ॥ तया मिष्टान्नचि विष ॥ तैसें भवरोगियां अशेष ॥ कुपथ्य हें ॥७५॥ ह्मणूनि सर्वस्व सांडावें ॥ उत्तम विरक्त व्हावें ॥ ईश्वरातें धरावें ॥ अनन्यभावें ॥ ७६ ॥ करावा विषयाचा त्याग ॥ धरावा साधूचा संग ॥

---

शूर आहे. परंतु तान्हेला तें सेवन करूं लागला तर त्याला शुद्ध मरणाचीच पाळी ठेविलेली! ७१ जसें कडूवृंदावनाचें फळही मोठ्या आवडीनें खातात, पण आंतला कडूभाग असल तेवढा मात्र टाकून देतात. ७२ तसेंच केलें ह्मणजे बरें, नाहींतर मिठाचें पाणी जर तान्हेला पिऊं लागला तर मरण कांहीं चुकवावयाचें नाहींच! ७३ ज्याची तहान गार पाण्यानें शमली त्याला मग मीठ हें जिभेला अतिशयच रसाळ लागतें. ७४ महारोगानें दूषित झालेल्यांस जसें मिष्टान्न विषाप्रमाणें आहे, तसें भवरोग्यास विषयासक्त असणें हें कुपथ्य आहे. ७५ ह्मणून सर्वस्व–टाकून–द्यावें; उत्तम विरक्त व्हावें; आणि अनन्य भावानें ईश्वराच्या चरणीं लागावें. ७६ विषयाचा त्याग करावा; साधूंची संगति धरावी; रागद्वेषाचें तर

रागद्वेषाचा प्रसंग ॥ घडूंचि न द्यावा ॥ ७७ ॥ वेद शास्त्र पुराण ॥ साधुमुखें निरूपण ॥ तें करावें श्रवण ॥ विवेकदृष्टी ॥ ७८ ॥ विविकवित्पत्तीस कारण ॥ अन्यथा नाहीं साधन ॥ जें वेदांतश्रवण ॥ साधुमुखें ॥ ७९ ॥ नित्य तो परमात्मा ॥ अनित्य प्रपंच अनात्मा ॥ हा विवेक बोलिजे महात्मा ॥ वेदांतशास्त्रीं ॥ ८० ॥ भक्ति ज्ञान वैराग्य ॥ हें श्रवणाचें सौभाग्य ॥ भवरोगियासी आरोग्य ॥ येणेंचि कीं ॥ ८१ ॥ ह्मणूनि साधूचेनि मुखें ॥ श्रवण करावें विशेषें ॥ आणि हित प्रौढी न देखे ॥ विवेकार्थी पैं ॥ ८२ ॥ द्रव्य स्त्रीचे अभिलाषें ॥ साधू नेणों काय धुंके ॥ ह्मणूनि तयाचेनि मुखें ॥

नांवच सोडून द्यावें. ७७ वेद, शास्त्रें, पुराणें ह्यांचें साधुमुखानें निरूपण विवेकपूर्वक ऐकत जावें. ७८ विवेक हाच व्युत्पत्तीला ( आत्मज्ञानविवरणाला ) कारण आहे, आणि साधुमुखानें वेदांतश्रवण करण्यावांचून त्याला दुसरें साधनच नाहीं. ७९ परमात्मा हा नित्य आहे. प्रपंच हा अनात्मा असून अनित्य आहे. हा विवेक महात्म्या वेदांतशास्त्रांत सांगितला आहे. ८० भक्ति, ज्ञान, आणि वैराग्य हेंच श्रवणाचें सौभाग्य होय. ह्यानेंच संसारव्याधिग्रस्तांना आरोग्य प्राप्त होतें. ८१ म्हणून विशेषेंकरून साधूच्या मुखानेंच श्रवण करावें. आणि जो विवेकार्थी असतो तो ह्यांत अभिमान असा ठेवीत नाहीं. ८२ अरे! द्रव्य व स्त्री ह्यांच्या अभिलाषानें साधु कसकसा बहकूं लागेल तें सांगतां येत नाहीं. म्हणून अशांच्या मु-

श्रवण न करावें गा ।। ८३ ॥ जया रसाची आवडी ॥ श्रोतयांचे चित्तीं फुडी ॥ वक्ता तोंचि वडबडी ॥ अभिलाषें पै ॥८४॥ रसरंगीं बोलते ॥ अभिलाषती जे वक्ते ॥ महारसाळातें ॥ ते वहिर्मुख कीं ॥ ८५ ॥ श्रोतयाचें चित्त बावरे ॥ तेउतेंचि तो व्यापारे ॥ तयाचें बालणें वारे ॥ काय करावें ॥ ८६ ॥ वैषयीक बोलते ॥ घरोघरीं बोलती वृत्तें ॥ भाट नागरीक ऐसे ते ॥ ओळखावे गा ॥ ८७ ॥ एकाचें निरूपण ऐकिजे ॥ थितिया स्वानुभवा मुकिजे ॥ संदेहसागरीं बुडाविजे ॥ तें ऐकूं नको ॥ ८८ ॥ साधू होय भीडखोर ॥ तोचि तयासी अपराध थोर ॥ यथार्थ सांडूनि उच्चार ॥ जरी बोलेल तो ॥८९॥

---

त्यानें श्रवण करीत जाऊं नये हो ! ८३ श्रोत्याच्या चित्तांत ज्या रसाची खरोखर आवड असते तेंच अभिलाषानें वक्ता बडबडत असतो. ८४ जे आशाळभूत वक्ते रसाचा आविर्भाव आणून अत्यंत रसाळ भाषणें करितात, ते बहिर्मुख होत. ८५ श्रोत्याच्या चित्तवृत्ति हलून जातील एवढेंच कर्तव्य तो करीत असतो. अरे बाबा ! आशाचें भाषण काय कामाचें बरें ? ८६ विषयपर भाषणें करणारे ह्मणजे घरोघरीं जाऊन भाकितें सांगणारे भाट नागरिकच ते होत असें समजावें. ८७ कोणाचें निरूपण ऐकावयाला जावें तों आपण तेवढेंच स्वानुभवाला मुकतों, आणि संशयसमुद्रांत बुडतों. ह्मणून तें कानांवर पडूं देऊं नको. ८८ यथार्थ बोलावयाचें तें टाकून जर भलताच उच्चार करील तर साधू भिडस्त असणें हाच त्याचा मोठा अपराध होय. ८९ रोग्याला अपथ्याची हौस असतेच. आणखी त्यांत

रोगियासी अपथ्याची चाड ॥ वरी वैद्य करी भीड ॥ तेथें रोगनिवृत्तीचें कोड ॥ काय करूं येईल ॥९०॥ ह्मणोनि भक्ति ज्ञान विरक्ती ॥ जिये शास्त्रीं उपपादिती ॥ तियें बोलावीं संतीं ॥ यथार्थ वादें ॥ ९१ ॥ अगा शास्त्रें अनेकें ॥ असती संदेहकारकें ॥ परी अद्वैत प्रतिपादकें ॥ एकावीं पां ॥ ९२ ॥ अद्वत शास्त्रश्रवणें ॥ इंद्रियें होतीं प्रवीणें ॥ तरी ज्ञानाधिकार पावणें ॥ अनायासें ॥ ९३ ॥ तत्वतः अद्वैतचि असे ॥ द्वैत नाथिलेंच आभासे ॥ तें मूढजनासी साच ऐसें॥ वाटतसें पैं ॥ ॥ ९४ ॥ मी अनंतु अभिन्न ॥ तो तेणेंसीं मानितसे भिन्न॥ऐसें अज्ञानवश मूढ जन॥उपदेशित असे ॥ ९५॥

वैद्यही जर भीड घालूं लागला तर मग व्याधिनिवारणाचें कौतुक काय विचारावें? ९० ह्मणून ज्या शास्त्रांमध्यें भक्ति, ज्ञान, व विरक्ति ह्यांचें प्रतिपादन केलें आहे, त्यांचें-च संतांनीं यथार्थ भाषणें करून निरूपण करावें. ९१ अरे! संशय उत्पन्न करणारीं अनेक शास्त्रें आहेत. परंतु अद्वैताचें प्रतिपादन करणारीं जेवढीं असतील तेवढींच आपण ऐकावीं. ९२ अद्वैत शास्त्रांच्या श्रवणानें इंद्रियें तरबेज होतात आणि मग आपोआपच ज्ञानाच्या अधिकारास पोंचतात. ९३ तत्वतः सारें अद्वैतच आहे. द्वैत हा नसताच भास आहे. परंतु काय पहा, तें मूढजनांना खरेंच आहे असें वाटत आहे. ९४ मी अनंत अभिन्न खरा, परंतु तोच त्याच्यायोगानें भिन्न मानतात. अज्ञानवश मूढजन जे आहेत ते असा उपदेश करीत सुटतात ९५ श्वान (कुत्रा) सूकर (डुकर)

श्वानसूकराचिया दृष्टी ॥ भिन्नपरस्परें सृष्टी ॥ परी जाणतयाची हेचि गोष्टी ॥ हा विस्मय पैं ॥ ९६ ॥ आधींची अनुचित मती ॥ तेंचि गुरु उपदेशिती ॥ उभयतांसी एकचि गति ॥ हें प्रसिद्ध कीं ॥ ९७ ॥ तथापि पूर्वाभ्यास ॥ अन्यत्र होऊं नेदी विश्वास ॥ तरी अद्वैतीं प्रवेश ॥ तयाशी केवीं घडे ॥ ९८ ॥ पूर्वाभ्यास बळें ॥ देखून याची दृष्टी मावळे ॥ ते राजपंथ सांडूनि आंधळे ॥ जाती अन्यमार्गें ॥ ९९ ॥ ह्मणूनि तयाचे अनुचिता ॥ न मानावें जाणतां ॥ पूर्वकर्मे स्वतंत्रता ॥ हरितली कीं ॥ १००॥ द्वितीयाद्भयं भवति ॥ ऐसी ही बृहदारण्यक श्रुती ॥ द्वैतातें असे निंदिती ॥

ह्यांच्या दृष्टीनें ( सृष्टि ) परस्पर भिन्न आहे, परंतु जाणत्याचीही तीच गत पाहून विस्मय होतो. ९६ आधींच बुद्धि खोटसाळ असते, आणि त्याचाच उपदेश गुरु करतात, मग काय? दोघांनाही एकच गति मिळवयाची हें उघडच आहे. ९७ मग पूर्वीचाच असा अभ्यास असला आणि इतरत्र विश्वास ठेविला नाहीं तर तेथें अद्वैताचा शिरकाव कसा व्हावा! ९८ पहिल्या अभ्यासाच्या योगानें डोळस असून त्याची दृष्टि नाहींशी होते. अशी मंडळी ह्मणजे राजमार्ग सोडून आडमार्गानें जाणारे आंधळेच ह्मटले पाहिजेत. ९९ ह्मणून त्याच्या खोटसाळपणाकडे शहाण्यानें मुळींच पाहूं नये. त्याच्या पूर्वकर्मांनीच त्याची स्वतंत्रता नाहींशी केली ( ह्मणजे तो पूर्ण बंधन पावला. ) १०० " द्वितीयाद्भयं भवति " अशी बृहदारण्यक श्रुति आहे. तिनें द्वैताचा धिक्कार निषेध केला आहे. ह्मणून तें टा-

ह्मणूनि सांडावें तें ॥ १ ॥ पूर्वपुण्याचेनि लवलाहें ॥ ईश्वराचेनि अनुग्रहें ॥ तुज लाधलें अकस्मात हें ॥ ब्रह्मज्ञान गा ॥ २ ॥ कवण एक उद्यमेंविण ॥ सहसा देखे निधान ॥ तयाचे दैवास कवण ॥ हेवा करी ॥ ३ ॥ अगा तुझेनि दैवें ॥ कवणासी उपमावें ॥ हें सर्वज्ञ तें व्हावें ॥ तुजचि साजे ॥ ४ ॥ पूर्वजन्मींचा योगभ्रष्ट ॥ आतां जगीं तूंचि एकनिष्ठ ॥ योगसाम्राज्य शेष पाट ॥ तुजचि साजे ॥ ५ ॥ जैसा कस्तूरियेचा निकरा ॥ तेथें परिमळाचा उबारा ॥ तैसा ज्ञानी शिष्य वरा ॥ जन्मलासि तूं ॥ ६ ॥ हां गा सूर्याचा प्रकाश ॥ कवणेंसी न करी सहवास ॥ परी सूर्यकांतामी

---

कून द्यावें. १ अरे पूर्वपुण्याच्या जोरानें, व परमेश्वराच्या कृपाप्रसादानें तुला ह्या ब्रह्मज्ञानाचा अकस्मात् लाभ घडला. २ कांहीं एक खटपट केल्यावांचूनच अकस्मात् ठेवा हातास आला. तर त्याच्या दैवाचा हेवा कोण बरें करील. ३ अरे! तुझ्या भाग्याला कशाची उपमा द्यावी. ही सर्वज्ञता प्राप्त व्हावी, हें तुलाच शोभतें! ४ पूर्व जन्मांतला तूं योगभ्रष्ट योग अर्धाच राहिलेला, आहेस. आतां जगामध्यें तूंच एक एकनिष्ठ योगरूप साम्राज्याच्या शेषाची गादी एक तुलाच शोभते. ५ जसा कस्तुरीचा खडा असला की तेथें सुवासाची मजा ही असावयाचीच! त्याचप्रमाणें तूंही फार उत्तम ज्ञानवंत शिष्य जन्मला आहेस. ६ अरे! असें पहा! सूर्यप्रकाशाचा सहवास कोणाला ह्मणून नाहीं? सर्वांसच आहे. परंतु तो सूर्यकांताच्या

बहुवस ॥ प्रगटेचि कीं ॥७॥ असो चंद्राचे अमृत कर ॥ विश्वातें निववितो कीर ॥ परी अमृताचे पाझर ॥ चंद्रकांतीचीं ॥ ८ ॥ श्रीगुरूचिया कृपादृष्टी ॥ तुज स्वरूपासी झाली भेटी ॥ ह्मणूनि तुझी गोष्टी ॥ नवल पैं ॥ ९ ॥ देहादीक हा प्रपंच ॥ जीवासी मानला साच ॥ तो मुमुक्षें उंच नीच ॥ निरसावा गा ॥ १० ॥ क्षीरामध्यें गत ॥ जैसें निवडिजे घृत ॥ तैसें चैतन्य सर्वगत ॥ निवडावें पैं ॥११॥ तंव शिष्यांचा राणा ॥ लागुनि श्रीगुरुचरणा ॥ मग काय विज्ञापना ॥ करिता झाला ॥ १२ ॥ गज कमलतंतुवें बांधला ॥ कीं वायु वचकें धरिला ॥ तैसा आत्मा आवरला ॥ प्रपंचें हा ॥ १३ ॥ सूर्ये

---

ठिकाणीं फारच दिसून येतो. ७ असो. चंद्राचे अमृतमय किरण सर्व विश्वाला गार करतात हें खरें, परंतु अमृताचे पाझर फुटतात ते चंद्रकांताच्याच ठिकाणीं. ८ श्रीगुरूंच्या कृपादृष्टीनें तुला स्वरूपाची भेट झाली. ह्मणून तुझी गोष्ट मोठी विलक्षण आहे. ९ देहादिक हा जो प्रपंच तो जीवाला खरासा वाटतो आहे ह्मणून तो मुमुक्षूनें श्रेष्ठ आहे कीं, कनिष्ठ आहे, ह्याचा संशय फेडावा. १० दुधामध्यें असलेलें तूप जसें घुसळून काढावें लागतें, त्याप्रमाणें सर्वगत चैतन्यही निवडून कढावें. ११ नंतर शिष्यराजानें श्रीगुरूंचे पाय धरून विनंति केली. १२ कमलतंतूंनीं ज्याप्रमाणें हत्तीला बांधावा, किंवा वायु वचकेंत धरावा, त्याचप्रमाणें ह्या प्रपंचानें आत्म्यास बंधन केलें आहे. १३ महाराज, सूर्यापासून अंधार झाला, आणि त्या अंधारानेंच सूर्याला झाकून

तमातें ग्याला ॥ तेणेंचि तो आवरला ॥ तैसा प्रसंग घडला ॥ आत्मयासी जी ॥ १४ ॥ भिरुड लागे मणिस्तंभा ॥ कीं अग्नीसी वोळंबा ॥ तैसी आत्मयासी भांबा ॥ अज्ञानाची ॥ १५ ॥ आत्मा स्वयंप्रकाश ॥ जेणें जन होय डोळस ॥ तया डोळयां डोळवस ॥ हें आश्चर्य जी ॥ १६ ॥ परी राउळें जें निरूपिलें ॥ तें अनुभवासी आलें ॥ अज्ञान वृथाचि उठिलें ॥ नमूनि हें ॥ १७ ॥ स्वरूपीं दुश्चितपण ॥ तेंचि कूढलें अज्ञान ॥ जेणें आत्मा स्वतंत्रपण ॥ निज विसरे ॥ १८ ॥ राज्याचेनि गाहाळें ॥ जैसा राव हारंबळे ॥ तेथें राणिवेचे सोहळे ॥ ते अन्यमुखें ॥ १९ ॥ तैसें निजसुखें निवालेपणें ॥

टाकावें, अशापैकींच ही आत्म्याची गोष्ट झाली. १४ रत्नखचित खांबाला वाळवी लागली, किंवा अग्नीला ओल आली, अशापैकींच आत्म्याला ही अज्ञानाची भ्रांति आहे. १५ आत्मा हा स्वयंप्रकाश आहे ह्मणजे त्याच्यायोगानें सर्वजन डोळस होतात. मग महाराज त्या डोळसाला डोळसपणा हें मोठेंच आश्चर्य आहे. १६ परंतु स्वामींनीं मला सांगितलें तें प्रत्ययास उतरलें हें अज्ञान खरोखर नसून मिथ्याच उद्भवलें आहे. १७ स्वरूपाच्या ठिकाणीं चित्त चळलें ह्मणजे तोच अज्ञानानें तळ दिला ह्मणून समजावें. त्याच्यामुळें आत्मा आपलें स्वतंत्रपण विसरून जातो. १८ जसें हातचें राज्य गेलें ह्मणजे राजा हाय! हाय! करूं लागतो.तेथें राज्यसुखाचे सोहळे ऐकावयाचे ह्मणजे दुसऱ्याच्या तोंडून! १९ त्याचप्रमाणें निजसुखाची आठवण बुजली ह्मणजे आत्मा आपणच आपल्याला विसरतो, आणि

आत्मयासी स्वयेंचि भुलणें ॥ तेणेंचि अज्ञानें ॥ आवरला तो ॥ २० ॥ जैसें बाबुळेचें मूळ ॥ उदकाचि निर्मळ ॥ तेथील गोडी हिरूनि खडुळ ॥ करी तयांतें ॥ २१ ॥ तैसी आत्मयाच्या आंगीं ॥ अज्ञानशक्ति तन्वंगी ॥ उठूनि तयातें आळंगी ॥ तो न सुटेचि जैसा ॥ २२ ॥ तयेचेनि आळेंवें ॥ तो तयासी न विसंवे ॥ आपणपें करी उभें ॥ तयेसी तो ॥ २३ ॥ तयेच्या गुणीं भुलला ॥ आपण तोचि झाला ॥ ऐसा घराचार मांडला ॥ दोघांतयां ॥२४॥ ते सगुण वनिता ॥ तो निर्गुण भर्ता ॥ परी दोघांची एकोपजीविता ॥ नवल हें पें ॥ २५ ॥ ते ना तो ओळखिजे ॥ येरयेरां होऊनि असिजे ॥ आतां कैसें सु-

त्याच अज्ञानाचें त्याला आवरण घडतें. २० जसें निर्मळ पाणी हेंच शेवाळाला मूळ आहे खरें, परंतु तें तेथची गोडी कमी करून त्याला अगदीं खडूळ करून सोडतें! २१ त्याचप्रमाणें आत्म्याच्या अंगीं अज्ञानरूप शक्ति सुंदरी उत्पन्न होऊन ती त्याला असें घट्ट आलिंगन देते कीं, त्यांतून त्याला सुटतांच येऊं नये. २२ तिच्या नादानें तो तिला मुळींच विसंबत नाहीं. ( ती जात असली तर ) तो तिला आपण होऊनच उभी करतो. २३ तिच्या नादानें अगदीं वेडावला, आपणही तन्मयच होऊन राहिला. असा त्या दोघांनीं घराचार आरंभिला. २४ ती सगुण स्त्री, व तो निर्गुण भर्ता होय. ( अशी हीं विजाती असतां ) तीं उभयतांही अगदीं एकजीव झालेलीं आहेत हें मोठें आश्चर्य आहे २५ ती का तो हें मुळींच ओळखतां येत नाहीं. एकमेकांस एकमेक होऊन राहिलीं आहेत. आतां आत्म्याला

टिजे ॥ आत्मयासी ॥ २६ ॥ पुरुषाचेनि संगें सुंदर ॥ जाहली ते गरोदर ॥ पंचवीस कुमर ॥ प्रसवती झाली॥२७॥ प्रकृतीया मिथ्या दृष्टी ॥ रचून विविध देहकुटी ॥ तो घररिघवणी परीपाठी ॥ करिता झाला ॥ २८ ॥ पुत्राचेनि स्नेहें मोठें ॥ आपुलें कांहींच नवटे ॥ तयेसी जें गोमटें ॥ तेंचि करी ॥२९॥ ते जेथें जेथें जाय ॥ तो तियवीण नराहे॥ ऐसा पुत्रकलत्राचेनि मोहें ॥ वेष्टला जी ॥ ३० ॥ तयांचें भरण पोषण ॥ करितां संभवे दूषण ॥ तेणें पावे जन्ममरण ॥ नाथिलेंची ॥ ३१ ॥ मग स्वर्गनरक हिंडे ॥ मागुतां गर्भवासीं पडे ॥ प्रकृतिसंगें पवाडे ॥ जीवात्मयासी ॥ ३२ ॥ असतें

ती कशी सुटणार? २६ पुरुषा ( आत्मा ) च्या संगानें ती सुंदरी गरोदर झाली. आणि पंचवीस पुत्र प्रसवली. २७ प्रकृतीच्या मिथ्या दृष्टीखालीं ( नजरेखालीं ) नानाप्रकारच्या देहरूप ओपड्या तयार करून घरांत राहून घरचा कारभार पाहूं लागली. २८ मुलांच्या ममतेनें लाडकौतुक करण्यापुढें आपलें कांहींच पटत नाहीं. तिला जें गोड दिसेल तेंच करित सुटतो. २९ ती जेथें जाईल तेथें तेथें हा तिच्या मागून जातो. तिच्यावेगळा एक पळभरही राहत नाहीं. अशाप्रकारें हा बायकामुलांच्या मोहपाशांत गुरफटला आहे. ३० त्यांचें लाळन पालन करतां करतां दोष उद्भवतात, त्यामुळें नसतेंच जन्ममरण प्राप्त होतें. ३१ मग स्वर्गांत व नरकांत फेरी घेऊन येतो व फिरून गर्भवासांत पडतो. अहो! त्या प्रकृतीच्या संगानें ह्या जीवात्म्याचे असे पवाडे होतात. ३२ असलेलें शिवपण गेलें, आणि नसतेंच

शिवत्व गेलें ॥ नाथिलें जीवत्व आलें ॥ यापरी राणे हो बुडाले ॥ भवसागरीं ॥ ३३ ॥ मेलाचि मरूं न लाहे ॥ गेलाचि जाऊं न साहे ॥ जियालाचि जीऊं न लाहे ॥ कर्मवशें ॥ ३४ ॥ ऐसा परवशता पावला ॥ दुःखानळें पोळला॥ संसारिया झाला ॥ प्रकृतिसंगें ॥ ३५ ॥ ऐसिया जीवाचिया कोटी॥ असती संक्षारबांदवडीं ॥ त्याचिये सुटिकेची मौढी ॥ देवेंचि दाखवावी ॥ ३६ ॥ हा संगत्याग करावा ॥ संन्यास उपदेशावा ॥ बंधमोक्ष करावा ॥ जीवासि जी ॥ ३७ ॥ बाह्य कीर कुटुंब सांडे ॥ परी अभ्यंतरीं घराचार मांडे ॥ तरी मी संन्यासी येणें बंडें ॥ संन्यास न घडे ॥ ३८ ॥

---

जीवपण अंगास लागलें. ह्याप्रमाणें महाराज ! संसारसमुद्रांत बुडावें लागलें. ३३ पूर्वकर्मांच्या योगानें असें होऊन जातें कीं मेला तरी मरतां येत नाहीं; गेला तरी जातां येत नाहीं, आणि जिवंत झाला तरी जिवंत राहतां येत नाहीं? ३४ अशाप्रकारें ह्या प्रकृतिसंगानें हा परतंत्र झाला, दुःखाग्नीनें होरपळला, आणि संसार ह्याच्या पाठीस लागला. ३५ह्या संसाररूप बंदिशाळेंत असे कोटीच्या कोटि जीव आडकून पडले आहेत. त्यांच्या सुटकेचा उत्तम उपाय देवानेंच दाखवावा. ३६ हा संग त्याग करून संन्यासाचाच उपदेश करावा, आणि जीवांस बंधनांतून मुक्त करावें. ३७ बाह्य-कुटुंब खरोखर सोडून दिलें, परंतु अंतरांतला प्रपंच चाललाच आहे. आणि " मी संन्यासी " " मी संन्यासी " ह्मणून बंड माजविलें तर तो कांहीं संन्यास नव्हे. ३८ जेथें स्थूलदेह गेला

जेथें स्थूळ देह न संडे ॥ तेथें अंतरत्याग न घडे ॥ तो सं-
न्यासु नावडे ॥ चतुरांशीं ॥ ३९ ॥ बाह्य कुटुंब संहारे ॥
तयाचा स्थूल देह मरे ॥ परी अंतरकुटुंब न संहारे ॥ विवेका-
विण ॥ ४० ॥ कुटुंब फिर विघडे ॥ एतावता संन्यास घडे ॥
ह्मणूनि असतांचि हें सांडे ॥ तो संन्यासी गा ॥ ४१ ॥
तरी सर्वही न्यासावें ॥ महावाक्या उपदेशावें ॥ जीवातें ब्रह्म
करावें ॥ तदात्मबोधें ॥ ४२ ॥ तत्त्वतः जो शिव ॥ वृथाचि
झाला जीव ॥ तयासी त्याचा उगव ॥ दाखवावा ॥ ४३ ॥
प्रपंच वैरी मारावा ॥ अथवा आपुलासा करावा ॥ सुकाळ

---

नाहीं तेथं अंतरत्यागही होत नाहीं. तो संन्यास कांहीं शहाण्यांना रुचणारा नव्हे. ३९ बाह्यकुटुंब ( प्रपंच ) संहार पावलें कीं, त्याचा स्थूल देहच पडला ह्मणावयाचा ! ) कारण स्थूलदेह आहे तोंपर्यंत बाह्यप्रपंच आहेच. ) परंतु अंतर कुटुंब ( अंतर प्रपंच ) जें आहे तें विवेकावांचून नाशास जात नाहीं. ४० कुटुंब गेल्यावर खरोखर कसा तरी संन्यास घडतोच पण तो संन्यास का ? नव्हे. ह्मणून सर्व कांहीं असतांनाच मनानें जो हें सर्व सोडील तोच संन्यासी होय. ४१ तर सर्वांचाही ( मनानें ) न्यास करावा; महावाक्याचा बोध घ्यावा; आणि तदात्मबोधानें जीवाला ब्रह्म करून सोडावें. ४२ तत्त्वतः जो शिव असून मिथ्याच जीवपणास आला आहे, त्याला त्याचा उगम दाखवून द्यावा. ४३ प्रपंचरूप शत्रूचें निर्दाळण करा- वें, किंवा त्याला आपल्या कबजांत घ्यावा; आणि ( मग ) ब्रह्मवि-

होऊं द्यावा ॥ ब्रह्मविद्येचा ॥ ४४ ॥ ऐसें शिष्यें विनविलें ॥ तेथें पूर्वार्ध संपलें ॥ श्रीमुकुंदमुनि बोले ॥ राजयोगी ॥४५॥ प्रणवपंचीकृत्यें ॥ येथें विस्तारिली सविश्रुतें ॥ महावाक्य उपदेश ग्रंथें ॥ उत्तरार्धीं ॥ ४६ ॥ शंकरोक्ती वरी ॥ मी बोलिलों मराठी वैखरी ॥ ह्मणूनि निर्धारावी चतुरीं ॥ शास्त्रबुद्धी ॥४७॥ असो युक्तीचेनि प्रसंगें ॥ शास्त्रातें ह्मणती उगें॥ तरी माझे बोल वाउगे ॥ कां होतील ॥ ४८ ॥ जैसें आपुलेनि पवित्रपणें ॥ लक्ष्मीसी आणिलें उणें ॥ ह्मणूनि मस्तकीं नारायणें ॥ तुळसी वंदिजे ॥ ४९ ॥ विवेकसिंधुभीतरीं ॥ जो मुमुक्षु अवगाहन करी ॥ तयासी भेटे श्रीहरी ॥ साक्षात्कारें

द्येचा सुकाळ करून सोडावा. ४४ह्याप्रमाणें शिष्यानें विनंति केली. श्रीमुकुंदमुनी राजयोगी ह्मणतात, येथें पूर्वार्धाचा भाग संपला. ४५ प्रणवासह पंचीकरणाचा ह्या पूर्वार्धामध्यें उत्तम विस्तार केला आहे. तत्त्वमस्यादि महावाक्याचा विस्तार उत्तरार्धांत केला जाईल. ४६ श्रीशंकराच्या भाषणावर मी मराठी भाषेंत बोललों. ह्मणून शाहण्यांनीं शास्त्रबुद्धीचा पडताळा पहावा. ४७ असो. युक्तीच्या प्रसंगांनीं शास्त्रांना जर चूप बसवूं लागलें तर माझे बोल व्यर्थ कां होतील बरें? ४८ जशी आपल्या पवित्रपणानें लक्ष्मीलाही उणेपणा आणला ह्मणून श्रीनारायणांनीं तुळशीला शिरसा वंद्य केली. ४९ त्याचप्रमाणें—' विवेकसिंधूनें शास्त्रांनाही उणेपणा आणला ह्मणून— जो ह्या विवेकसिंधूमध्यें बुडी मारील, त्याला श्रीहरि साक्षात्कारेंक-

करूनी ॥ ५० ॥ विवेकसिंधूचीं शब्दरत्नें ॥ कंठीं धरिजे प्रयत्नें ॥ तरी जनकाचेनि महिमानें ॥ श्लाघ्यता पावे ॥ ५१॥ लवणसमुद्रींचीं मुक्तें ॥ भूषणें कीर होती समस्तें ॥ तरी मुक्तत्व भूषितयातें ॥ विवेकसिंधूचेनी ॥ ५२ ॥ विवेकसिंधूचें पूर्वार्ध ॥ क्षीरसिंधूपासूनि अगाध ॥ तेथें निर्गुण निजबोध ॥ भेटी विष्णुरूपें ॥ ५३ ॥ मज श्वासनिमेषाचा श्रम ॥ तेथें कायसा या ग्रंथाचा उद्यम ॥ परी फळला मनोधर्म ॥ सदैवांचा ॥ ५४ ॥ नृसिंहाचा बल्लाळ ॥ त्याचा कुमर जयंतपाळ ॥ तेणें करविला गदारोळ ॥ ग्रंथरचनेचा ॥ ५५ ॥ भगीरथाचेनि दैवयोगें ॥ विश्व सुस्नात गंगे ॥ तसें जयंतपाळा-

रून भेट देतील. ५० विवेकसिंधूंतील शब्दरत्नें जो कोणी प्रयत्न करून कंठीं धारण करील त्याला जनकाच्या बरोबरीनें योग्यता प्राप्त होईल. ५१ खाऱ्या समुद्रांतील सर्व मुक्तें—ह्मणजे मोत्यें जर खरोखरी भूषणें होतात, तर भूषितांना ( ह्मणजे ह्या ग्रंथानें जे ज्ञानभूषित झाले आहेत त्यांना ) ह्या विवेकसिंधूच्या योगानेंही मुक्तत्व ( मुक्तत्व पक्षीं मोत्याचें भूषण किंवा येथें बंधनमोक्ष ) प्राप्त झालेंच पाहिजे. ५२ हें विवेकसिंधूचें पूर्वार्ध क्षीरसिंधुहूनही खोल आहे. कारण येथें विष्णुरूपानें निर्गुण निजबोधाची भेट होते. ५३ मला हा श्रम ह्मणजे केवळ श्वासनिमेषाइतका आहे. तेथें ह्या ग्रंथाचे सायास ते काय ? परंतु हा भाग्यवंतांचा मनोधर्मच फळास आला आहे. ५४ नृसिंह राजाचा बल्लाळ, व बल्लाळाचा पुत्र जयंतपाळ राजा त्यानें हा ग्रंथरचनेचा गदारोळ—भीम गर्जना—करविला. ५५ भगीरथाच्या

चेनि प्रसंगें ॥ जग सुखिया होय ॥ ५६ ॥ म्यां आपुली निजवाणी ॥ पवित्र केली इहीं वचनीं ॥ ते प्रीति पावो पिनाकपाणी ॥ श्रीमुकुंदराज ह्मणे ॥ ५७ ॥ इति श्रीमद्विवेकासिंधौ सृष्टिक्रमे गुरुशिष्यसंवादे सर्वब्रह्म इति विवरणं नाम सप्तमप्रकरणं समाप्तं ॥ श्रीमत्सच्चिदानंदगुरुचरणारविंदार्पणमस्तु ॥

दैवयोगानें विश्व गंगेंत न्हालें, त्याचप्रमाणें जयंतपाळाच्या–भाषणप्रसंगानें जग सुखी झालें आहे. ५६ मुकुंदराज ह्मणतात, मी आपली निजवाणी ह्या वचनांनीं पवित्र केली. त्याच्या योगानें पिनाकपाणी शंकर संतोष पावोत. १५७



# सार्थ विवेकसिंधु.

## उत्तरार्ध.

### प्रकरण पहिलें संहारक्रम.

विषयः—स्थूलदेह निरसन.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीमत्सच्चिदानंदगुरवे नमः ॥ सांगितलें ग्रंथाचें पूर्वार्ध ॥ जो अर्थ पाहतां महाअगाध ॥ जेथें निरुपिलें विशुद्ध ॥ ब्रह्मचि विश्वाकारें ॥ १ ॥ बोलिले प्रपंचरचन ॥ तें उकललीयाविण ॥ नपाविजे परम निर्वाण ॥ केवळ ब्रह्म जें ॥ २ ॥ आतां म्हणों उत्तरार्ध ॥ विवेकसिंधू·

---

श्रीगणेशाय नमः—( आतांपर्यंत ) ग्रंथाचें पूर्वार्ध सांगितलें. तथचा अर्थ पाहूं गेलें तर फारच खोल. कारण तेथें विश्वाच्या रूपानें परमपवित्र अशा ब्रह्माचेंच निरूपण केलें आहे. १ ( तेथें ) जी प्रपंचरचना सांगितली, ती उकलल्यावांचून केवळ ब्रह्म असें जें परम निर्वाण तें प्राप्त व्हावयाचें नाहीं. २ आतां विवेकसिंधूचा प्रसिद्ध उत्तरार्ध सांगावयाचा तो सांगण्यांत येईल. तर चित्त सावधान

चें प्रसिद्ध ॥ सांगिजेल तरी सावध ॥ करी अंतःकरण ॥ ३॥ वेदांतशास्त्र त्रिपदाव्याख्यान ॥ महावाक्यविवरण ॥ श्रीमुकुंदमुनीकरण ॥ विवेकसिंधु ॥ ४ ॥ जो श्रद्धापूर्वक ऐकतां ॥ निःशेष फिटे भवव्यथा ॥ आणि मुक्ती सायुज्यता ॥ पाविजे रोकडी ॥५॥ जेथें महावाक्याचा विचार ॥ बोलिजेल स्वरूपाचा निर्धार ॥ प्रपंचाचा उपसंहार ॥ जेथें अत्यंतिकु ॥६॥ तेंचि त्रिपदामहावाक्य ॥ जेणें जीवेश्वराचें ऐक्य ॥ तया पदत्रयाची व्याख्य ॥ आतां निरूपिजेल ॥ ७॥ तत्पदार्थ तो परमात्मा ॥ त्वंपदार्थ जीवात्मा ॥ उभयांसी तदात्मा ॥ बोलिजे असिपदीं ॥ ८ ॥ तोचि तत्पदार्थ द्विविध ॥ शबल आणि शुद्ध ॥ त्वं-

करावें. ३ श्रीमुकुंदमुनी कृत वेदांतशास्त्रांतील—तत्, त्वम्, असि.ह्या तीन पदांवरील व्याख्यान, व महावाक्याचें विवरण ज्यांत आहे तो हा विवेकसिंधु होय. ४ हा श्रद्धापूर्वक ऐकला असतां संसारव्याधीचें अगदीं निर्मूलन होतें, आणि मूर्तिमंत सायुज्यमुक्ति हातास येते. ५ येथें महावाक्याचा विचार आणि स्वरूपाचा निश्चय सांगण्यांत येईल. येथें प्रपंचाचें तर अगदीं परिपूर्ण निरसन केलें आहे. ६ जेणेंकरून जीवाचें व ईश्वराचें ऐक्य घडतें; तेंच पदत्रय व तेंच महावाक्य होय. त्या पदत्रयाची व्याख्या आतां सांगण्यांत येईल. ७ तर तत्पदार्थ तो परमात्मा व त्वंपदार्थ जीवात्मा होय. आणि ह्या उभयतांनाही असिपदाच्या ठिकाणीं तदात्मा असें ह्मणतात. ८ तोच तत्पदार्थ दोन प्रकारचा आहे. एक शबल, आणि दुसरा शुद्ध. त्याचप्रमाणें शबल व शुद्ध ह्याच भेदांनीं त्वंपदार्थही दोन प्रकारचा

पदार्थ तोही तथाविध ॥ शबलशुद्धभेदें ॥ ९ ॥ जेथें माया-
शक्तिचक्रांचा अंगीकार ॥ जो करी सृष्ट्यादिव्यापार
तो परमात्मा सर्वेश्वर ॥ शबल तत्पदार्थ ॥ १० ॥
मायोपाधींसी वेगळ ॥ निःप्रपंच निर्मळ ॥ तें परब्रह्म केवळ॥
शुद्ध तत्पदार्थ ॥ ११ ॥ शरीरत्रयासीं वर्तत ॥ अविद्या काम
कर्म वेष्टित॥ जें चैतन्य तापत्रयें संतप्त ॥ तो शबल त्वंपदार्थ
॥ १२ ॥ देहत्रयासी अतीत ॥ अविद्या काम कर्म विनिर्मुक्त ॥
जें प्रत्यक् चैतन्य तत्वता ॥ तो शुद्ध त्वंपदार्थ ॥१३ ॥ शबल
तो वाच्य बोलिजे ॥ शुद्ध तो लक्ष्य ह्मणिजे ॥ दोहींचा शबलांश
सांडिजे ॥घेइजे शुद्ध ॥१४॥ जो शुद्ध तत्पदार्थ॥ तोचि शुद्ध त्वंप-

आहे. ९ जेथें मायारूप शक्तिचक्राचा अंगीकार केला आहे, जो
सृष्टि आदिकरून व्यापार करतो तो परमात्मा सर्वेश्वर शबल तत्प-
दार्थ होय. १० मायोपाधिरहित, प्रपंचाहून वेगळें, ( अत्यंत )
निर्मळ असें जें केवळ परब्रह्म तो शुद्ध तत्पदार्थ होय. ११ देह-
त्रयानें असणारें अविद्या, वासना व कर्म ह्यांनीं वेढलेलें त्रिविधता-
पानें ताप पावलेलें, जें चैतन्य तो शबल त्वंपदार्थ होय. १२ दे-
हत्रयांहून निराळें; अविद्या, वासना. कर्म ह्यांपासून मुक्त असें जें
तत्त्वतःच प्रत्यक् चैतन्य तो शुद्ध त्वंपदार्थ होय. १३ शबल तो
वाच्य होय. शुद्धाला लक्ष्य ह्मणतात. ह्या दोहोंपैकीं शबलांश तेवढा
टाकून द्यावा. आणि शुद्ध तेवढा घ्यावा. १४ जो शुद्ध तत्पदार्थ
तोच शुद्ध त्वंपदार्थ होय. उभयतांच्या ऐक्यानें असिपदाच्या ठिकाणीं
परमार्थ होतो. ( परम अर्थ—तिन्ही पदांच्या अर्थाचा शेवट—

दार्थ॥उभयांचे ऐक्यीं परमार्थ॥ होय असिपदीं॥१५ ॥एवं तत्त्वं पदार्थ शोधितां ॥ सिद्धचि जीवेश्वरासी ऐक्यता ॥ घटमठ-भंगें केवळता ॥ जैसी गगनासी ॥ १६ ॥ येथ वाक्यार्थ नव्हे संसर्ग ॥ विशिष्ट नम्हणिजे चांग ॥ अखंड वाक्यार्थाचा संसर्ग ॥ बोलिजे महावाक्यें ॥ १७ ॥ वाक्यार्थाची अखंडता ॥ तोचि ब्रह्मीं एकरसता ॥ एवं महावाक्यर्थ तत्वता ॥ तुज निरूपिला ॥ १८ ॥ हे अखंड कडासिता ॥ तोंचि बुझ गा तत्वता ॥ जो त्वंपदार्थाचें तत्वता ॥ जाणे परिशोधन ॥ १९ ॥ तत्त्वंपदार्थाचें शोधन ॥ तेथील विस्तारविवरण ॥ सांगिजेल तरी मन ॥ एकाग्र कीजे ॥ २० ॥ तत्पदार्थ तो आत्माराम ॥ तो

परब्रह्म—होतो. ) १५ अशाप्रकारें त्वंपदार्थाचें शोधन केलें असतां जीवेश्वराचें ऐक्य सिद्धच आहे. घटमठ नाहींसे झाले म्हणजे केवळ आकाशच राहतें, तसेंच हें होय. १६ येथें वाक्यार्थ ( महावाक्याचा अर्थ ) म्हणजे नुसता संबंध नव्हे- किंवा विशेष प्रकारचा अथवा चांगला संबंध असेंही म्हणावयाचें नाहीं. तर येथें महावाक्यानें वाक्यार्थाचा अखंड संबंध असें समजावें, १७ वाक्यार्थाचा अखंडपणा तेंच ब्रह्मामध्यें एकरस—लीन ( पूर्ण लीन )—होणें होय. असो, अशाप्रकारें महावाक्याचा अर्थ तुला तत्त्वतः निरूपण केला. १८ ह्या अखंडाचा विचार करणारा तोच तूं तत्त्वतः लक्ष्यांत आण. तोच तत्त्वतः त्वंपदार्थाचें परिशोधन म्हणजे विचार जाणतो. १९ ( आतां ) तत्त्वंपदार्थाचें विस्तारपूर्वक विवरण करण्यांत येईल, तर मन एकाग्र करावें. २० तत्पदार्थ तो आत्माराम होय.

शोधितां न लगे श्रम ॥ ह्मणोनि आधीं शोधन क्रम ॥ एक त्वंपदार्थाचा ॥ २१ ॥ जीव अज्ञानें भ्रमला ॥ लिंगशरीरें बांधिला ॥ स्थूळदेह आपण झाला ॥ पराधीन ॥ २२ ॥ तया अधिकारिया जीवातें ॥ गुरू ह्मणती शिष्यातें ॥ स्थूलदेह नव्हसी ऐसें आपणातें ॥ जाण स्वानुभवें ॥२३॥ स्थूलदेहातें देखता ॥ तो तूं नव्हेसी सर्वथा ॥ जैसा घटातें पाहतां॥ चक्षु घट कैसेनी ॥२४ ॥ द्रष्टा दृश्याचा जाण ॥ तो तयापासूनि विलक्षण ॥ हे प्रसिद्ध उपपत्ती नेणे कवण ॥ स्वानुभवें ॥२५॥ तूं ऐसें ह्मणसी ॥ चक्षुपासूनि भिन्नत्व घटासी ॥ हें द्रष्टादृश्याचें वैलक्षण्य चित्तासी ॥ मनीं प्रत्यक्ष सिद्ध ॥ २६ ॥

त्याचा विचार करावयाला फारसे श्रम नकोत. ह्मणून आधीं त्वंपदार्थाचा विचार एक. २१ जीव अज्ञानानें भ्रम पावला, लिंगशरीरानें बद्ध झाला आणि स्थूलदेहाप्रत येऊन पराधीन होऊन बसला. २२ त्या अधिकारी जीवाला–शिष्याला गुरु ह्मणाले तूं स्थूल देह नव्हेस अशी तूं आपली स्वानुभवानें खात्री करून घे. २३ ज्याप्रमाणें घटाला पाहणारा चक्षु कांहीं घट होत नाहीं, तसाच जड देहाला पाहणारा तूं बिलकुल तो ( देह ) नव्हेस. २४ दृश्याचा द्रष्टा असतो तो त्याच्या ( दृश्याहून ) लक्षणांनीं भिन्न असतो. ही प्रसिद्ध उपपत्ति स्वानुभवानें कोणांस बरें समजत नाहीं! २५ तूं चक्षुहून घट हा भिन्न आहे असें ह्मटलेंस ह्मणजे द्रष्टादृश्याचा जो भिन्नपणा चित्तास भासला तो मनामध्यें प्रत्यक्ष सिद्धच आहे, असें समजावें. २६ आत्मा तर देहावेगळा दिसत नाहीं, मग तो भिन्न

आत्मा तंव देहावेगळा न दिसे ॥ तरी तो विलक्षण कैसा असे॥ हें बुझ हां आपैसें ॥ दृष्टांतमुखें ॥ २७ ॥ काष्ठीं असतां दाहक ॥ दृश्य काष्ठा जेवीं प्रकाशक ॥ काष्ठ व्याप्य तो व्यापक ॥ ह्मणोनि विलक्षण जाणणें ॥ २८ ॥ तेवीं दृश्यदेहामाजीं असतां ॥ द्रष्ट्या आत्मया विलक्षणता ॥ हें स्वानुभवें बुझतां ॥ सायास नलगे ॥ २९ ॥ देह तंव साकार ॥ तेथें असती षड्विकार ॥ आत्मस्वरूप निर्विकार ॥ तो देह कैसेनी ॥ ३० ॥ निद्रा मरणावस्था ॥ देह कांहीं जरी जाणता ॥ तरी आत्मा ह्मणों येता ॥ कांहीं एक ॥ ३१ ॥ निद्रामरणातें जाणत ॥ आत्मा स्वयंबोधें असे वर्तत ॥ ह्मणूनि देहीं असूनि देहातीत ॥ तो जाणावा ॥ ३२ ॥ जन्म-

कसा ? हें तूं दृष्टांत-द्वारा आपोआप समजून घे. २७ काष्ठाच्या-ठिकाणीं अग्नि असतां तो जसा काष्ठाचा प्रकाशक असतो. ह्मणजे काष्ठ हें व्याप्य व अग्नि व्यापक असतो, हें ध्यानांत आण. २८ तसाच दृश्य देहामध्यें असतांना, द्रष्टा आत्मा हाही भिन्न लक्षण आहे, हें तुला स्वानुभवानें समजून घ्यावयास फारसे प्रयास नकोत. २९ देहाला तर आकार आहे, आणि तेथें षड्विकारही आहेत. आत्मस्वरूप निर्विकार आहे. मग तो देह कसा होणार. ३० निद्रा मरण वगैरे अवस्थांपैकीं देहानें जर कांहीं जाणलें असतें तर त्याला कांहीं तरी आत्मा ह्मणतां आलें असतें. ३१ निद्रा व मरण हें जाणणारा, आत्मा स्वयंबोधानेंच वर्ततो आहे. ह्मणून तो देहांत असून देहाहून निराळा आहे असें समज. ३२ जन्मकाळीं जन्म, स्थिति काळीं स्थिति,

काळीं जन्मातें ॥ स्थितिकाळीं स्थितीतें ॥ मरणकाळीं मरणातें ॥ जडदेह कैंवि जाणे ॥ ३३ ॥ दृश्यासि द्रष्टेपण ॥ द्रष्ट्यासी दृश्य कैसेनि होणें ॥ म्हणूनि देहचि आत्मा बोलणें ॥ सांडी भ्रांति ॥ ३४ ॥ स्थूळासी आत्मत्व मानित ॥ उठिला जो चार्वाक सिद्धांत ॥ तयाची प्रतीति निभ्रांत ॥ तुवां जिंकिलेसी ॥ ३५ ॥ देहचि आत्मा बोलती ॥ प्रत्यक्षासी प्रमाण मानिती ॥ मरणचि मोक्ष म्हणती ॥ हीनविवेकी ॥ ३६ ॥ वेद शास्त्रं पुराणें ॥ जे न मानिती प्रमाणें ॥ तया धीट पाषांडियांची उक्ती कवणें ॥ सत्य मानावी ॥ ३७ ॥ स्थूलदेह जरी आत्मा ॥ तरी देह व्हावा ऐसें कवणें केलें कर्मा ॥ देहपातानंतर सुखदुःखधर्मा ॥ भोगितो कवण ॥ ३८ ॥ म्हणोनि

व मरणकाळीं मरण ह्या जड देहाला कसें समजणार! ३३ दृश्याला द्रष्टेपणा द्रष्ट्याचें दृश्य कसें बरें होणार! म्हणून देह हाच आत्मा मानणें हा जो भ्रम तो टाकून दे. ३४ जडालाच आत्मा मानणारा जो चार्वाकाचा सिद्धांत प्रगट झाला आहे, तो तूं स्वानुभवेंकरून निःसंशय हाणून पाडलास. ३५ विवेकशून्य जे आहेत ते देह हाच आत्मा म्हणतात; प्रत्यक्षालाच प्रमाण समजतात; आणि मरण तोच मोक्ष असें मानतात ३६ वेद, शास्त्रें, पुराणें, ह्यांस जे प्रमाण मानीत नाहींत ते धीट पाखांडी होत. त्यांची बोलणी कोणी जमेस धरावी! ३७ जड देह हाच जर आत्मा, तर देह व्हावा हें कर्म कोणी केलें म्हणावयाचें आणि मग देहावसान आल्यानंतर सुखदुःख तरी कोण भोगतो समजावयाचें! ३८ म्हणून आत्म्याला तूं देहाचें वेड

आत्मया न लावी पिसें देहाचें ॥ तरी स्थूलदेह कवण दळवाडियाचें ॥ तें पंचीकृत पंचभूतांचें ॥ ऐसें जाण तूं ॥३९॥ तीं पंचीकृत पंचभूतें कैसीं ॥ तुज सृष्टिक्रमीं निरूपिलीं जैसीं ॥ जयाचे पंचवीस अंशांसी ॥ देह ऐसें नांव झालें ॥ ४० ॥ तीं तंव पंचभूतें जडें ॥ तदंश आत्मा हें सर्वथा न घडे ॥ तयाचा देह हें दळवाडें ॥ तो आत्मा कैसेनि ॥ ४१ ॥ हा पिंड विचारितां ॥ आत्मा नव्हे सर्वथा ॥ तेथींची जागृती अवस्था ॥ तो आत्मा कैसेनी ॥४२॥ देहाभिमान पुरस्कारें ॥ ज्ञानेंद्रियाचेनि द्वारें ॥ बुद्धीसी बाह्यविषयाचें ज्ञान स्फुरे ॥ ते जागृती जाणावी ॥४३॥ स्थूल देह जागृती अवस्था ॥ या दोहीं-

नकोस. तर मग जड देह हा काय काय मिळून झाला ? तर तो पंच भूतांच्या पंचिकरणानें झाला असें समज. ३९ आतां तीं पंचीकृत पंचभूतें कशीं आहेत ह्मणशील तर सृष्टिक्रमाच्या प्रकरणांत सांगितलीं आहेत तींच. त्यांच्या पंचवीस अंशांना देह ही संज्ञा आली. ४० तीं पंचभूतें तर जड होत. त्यांचाच अंश आत्मा हें कधींही होणें नाहीं. आणि त्याच अंशापासून देह हें स्थूलरूप झालें आहे, तर तोच आत्मा कसा होईल! ४१ ह्या पिंडाचा विचार केला असतां तो आत्मा मुळींच नव्हे. जागृति ही तेथील अवस्था होय. तेव्हां तो आत्मा कसा होणार! ४२ देहाभिमानपूर्वक ज्ञानेंद्रियांच्या द्वारानें बुद्धीला बाह्यविषयाच्या ज्ञानाचें स्फुरण होत असतें, तीच जागृति होय. ४३ जड देह आणि जागृति अवस्था ह्या दोहोंचा अभिमानी विचार करूं गेलें तर विश्व हा आहे.

चा अभिमानी विश्व विचारिता ॥ आत्मा नव्हे येथें उपपत्ती अनंता ॥ असती वेदांतशास्त्रीं ॥ ४४ ॥ स्थूल देह जागृती विश्व ॥ हा रजोगुणाचा प्रपंच तुज दृश्य ॥ नेत्रस्थान स्थूल-भोग हें अदृश्य ॥ केवीं होसी ॥ ४५ ॥ या स्थूलप्रपंचातें ॥ तूं जाणत अससी निरुतें ॥ ह्मणूनि अवलंबन साक्षी तूतें ॥ बोलिजे वेदांतीं ॥ ४६ ॥ एक तत्त्व व्यापक ह्मणती ॥ देहा-मध्यें एकस्थानीं लक्षिती ॥ तें एक कांहींच नेणती ॥ खंड-ज्ञानिये ॥ ४७ ॥ गुह्यस्थानीं आधार कमळ ॥ तें रक्तवर्ण च-तुर्दळ ॥ वंशंषंसं वर्णीं अतिसोज्ज्वळ ॥ एक चिंतिती ॥ ४८ ॥

---

आत्मा कांहीं नव्हे, अशाविषयीं वेदांतशास्त्रांत अनंत उपपत्ति आहेत. ४४ जड देह, जागृति, आणि विश्व हा जो रजोगुणात्मक प्रपंच तो तुला दृश्य होय. आणि नेत्रस्थान, स्थूलभोग हें अदृश्य होय. तेव्हां तें तूं कसें असशील! ४५ ह्या स्थूलप्रपंचाला तूं निश्चयानें जाणत आहेस, म्हणून वेदांताच्या भाषेत तूं अवलंबन साक्षी होस. ४६ कोणी कोणी तत्त्व व्यापक आहे म्हणतात; देहामधील एकाच स्थानावर लक्ष्य लावतात; त्यांना एक असें कांहींच कळत नाहीं. ते खंडज्ञानी होत. ४७ गुह्यस्थानीं 'आधार' नांवाचें कमळ आहे; तें रक्तवर्ण असून चतुर्दळ–चार पाकळ्यांचें आहे; आणि वं शं षं सं ह्या वर्णांनीं तें अत्यंत सोज्ज्वळ–प्रकाशमान– लेलें आहे. त्याचेंच कोणी चिंतन करतात. ४८ लिंगस्थानीं धिष्ठान ' नांवाचें कमळ आहे. तें षड्दळ म्हणजे सहा पा असून पीतवर्ण–पिंवळें आहे. बं भं मं यं रं लं ह्या अक्षरांनीं

लिंगस्थानीं स्वाधिष्ठान ॥ तें षट्दळ पीतवर्ण ॥ वंभंमंयंरंलं अक्षरीं भूशुद्धींत जाण ॥ एक ध्यानी ॥ ४९ ॥ नाभिस्थानीं मणिपुर कमळ ॥ तें नीलवर्ण दशदळ ॥ डंपासूनि फांकित दे मोक्षफळ ॥ एक चिंतिती ॥५०॥ हृदयीं अनाहत कमळ ॥ तें अग्निवर्ण द्वादशदळ ॥ कंपासूनि ठंबीजीं करी झळाळ ॥ प्रतिपत्रीं ॥ ५१ ॥ कंठीं जाणिजे विशुद्ध चक्र ॥ तें षोडश दळ अतिशुभ्र ॥ तेथें प्रतिपत्रीं षोडश स्वर ॥ अकारादिक ॥ ५२ ॥ भ्रूमध्यें अग्नि कमळ ॥ तें विद्युद्वर्ण द्विदळ ॥ तेथें हंक्षं

आहे. कोणी कोणी स्थानमात्राचा निश्चय करून त्याचेंच ध्यान करतात. ४९ नाभिस्थानीं ( बेंबीच्या जागीं ) 'मणिपुर' नांवाचें कमळ आहे. व तें नीलवर्ण ( निळें ) असून त्यास दशदळें म्हणजे दहा पाकळ्या आहेत. तेथें डं पासून फं पर्यंत अक्षरें असून तें मोक्षफळ देणार आहे, म्हणून कोणी कोणी त्याचेंच चिंतन करतात. ५० हृदयामध्यें 'अनाहत' नामक कमल आहे. तें वर्णानें अग्नीसारखें असून बारा पाकळ्यांचें आहे. कं पासून ठं पर्यंत तेथें बीजाक्षरें प्रत्येक दळावर प्रकाशमान झालेलीं असतात. ५१ कंठामध्यें जें चक्र( कमळ ) आहे तें 'विशुद्ध' समजावें. तें सोळा पाकळ्यांचें अत्यंत शुभ्र असें आहे. तेथें अकारादि सोळा स्वर प्रत्येक पत्रावर झळकत असतात. ५२ भुंवयांच्या मध्यभागीं 'अग्नि' म्हणून कमळ आहे, त्याला दोनच पाकळ्या असून तें विद्युत् ( वीज ) वर्ण आहे. तेथें हं क्षं हीं बीज चिन्हें ( वर्ण ) असून तें मोक्षफळदातें आहे,

बीजीं अंकित दे मोक्षफळ ॥ एक म्हणती ॥ ५३ ॥ सबिंदु मातृकाक्षरीं अंकितें ॥ ऐसिया षट्चक्रें मिरवतें ॥ तेंचि परम तत्त्व बोलती ते ॥ हीनविवेकी ॥ ५४ ॥ षट्चक्रांवरतें ॥ सहस्रदळा आंतौतें ॥ नानावर्ण प्रकाशातें ॥ एक चिंतिती ॥ ५५ ॥ सप्तचक्राचें अंतराळ ॥ तेंचि परमतत्त्व निर्मळ ॥ ऐसें बोलती बरळ ॥ ते ज्ञानहीन ॥ ५६ ॥ एक आधारीं बंद घालिती ॥ प्रसुप्त कुंडलिनीतें पवनें चेतविती ॥ षट्चक्रें भेदूनि नेती ॥ ब्रह्मरंध्रासी ॥ ५७ ॥ तेथें अनाहत ध्वनीचेनि विकाशें ॥ चित्त महाशून्यीं समरसे ॥ तेथें परमकळा प्रकाशे॥ स्वयंज्योति ॥ ५८ ॥ एक मनपवनाचा ग्रास करिती ॥ ते

असेंही कोणी कोणी म्हणतात. ५३ ह्या बिंदुसहवर्तमान मातृाक्षरांनीं युक्त अशा षट्चक्रांनीं ( कमळांनीं ) शोभणारें तेंच तें परमतत्त्व होय,असें म्हणणारे ते विवेकहीन-मूर्ख होत.५४ ह्या षट्चक्रांच्याही वरतीं एक ' सहस्रार ' म्हणून एक हजार पाकळ्यांचें कमळ आहे. त्या मध्येंच कोणी कोणी निराळ्या वर्णाच्या प्रकाशाचें चिंतन करितात. ५५ सप्तचक्रांचें अंतराळ—आकाश—तेंच निर्मळ परम तत्त्व होय,असें कांहीं-जण बडबडतात, पण ते ज्ञानशून्य होत. ५६ कोणी कोणी आधारांत कोंडून घेतात, आणि प्राणायामानें निजलेल्या कुंडलिनीला जागृत करितात व षट्चक्रें भेदून ब्रह्मरंध्राला नेऊन पोहोंचवितात.५७तेथें ' अनाहत ' नांवाचा ध्वनि प्रगट होतो व चित्त महाशून्यामध्यें समरस पावतें ( पूर्ण लीन होतें-मिळून जातें. ) तेथें परमकळा-स्वयंज्योति प्रकाशमान होते. ५८ कोणी कोणी मनाचा व वायूचाच ग्रास क-

तितकेनीच आनंदें स्फुंजती ॥ परी शुद्धि नेणती ॥ परत-
त्त्वाची ॥ ५९ ॥ तूं उड्डियान ना जालंधरू ॥ कावरु ना
सूक्ष्म विवरू ॥ पूर्णगिरि ना ब्रह्मरंध्रू ॥ नव्हेसि तूं ॥ ६० ॥
तूं मेरू ना त्रिकुट ॥ भ्रमरगुंफा ना गोल्हाट ॥ तीन ग्रंथि
ना श्रीहट ॥ कैसेनि तूं ॥ ६१ ॥ तूं भाटि ना ताळी ॥ उन्मनी
ना आगियाळी ॥ नाद विंदु रोळीं ॥ नव्हेसि तूं ॥ ६२ ॥ तूं
रेचक ना पूरक ॥ कुंभक ना त्राहाटक ॥ ययांसी तूं प्रवर्तक ॥
तरी तेचि तूं कैसेनी ॥ ६३ ॥ तूं मंत्र ना अनुष्ठान ॥ धारणा

---

रितात, आणि ते तेवढ्यानेंच आनंदानें स्फुंजूं लागतात. परंतु त्यां-
ना परतत्त्वाची शुद्धीच राहत नाहीं. ५९ तूं उडियान नव्हेस कीं
जालंधर नव्हेस; कावर नव्हेस कीं सूक्ष्म विवर ह्मणतात तेंही नव्हे-
स; तूं पूर्णगिरि किंवा ब्रह्मरंध्रही नव्हेस. ६० तूं मेरू नव्हेस कीं
त्रिकूटही नव्हेस; भ्रमरगुंफा नव्हेस कीं गोल्हाट नव्हेस; तीन ग्रंथि
नव्हेस कीं श्रीहटही नव्हेस. तो तूं कशीं बरें होशील? ६१ तूं
भाटि नव्हेस कीं ताळीही नव्हेस; तूं उन्मनी नव्हेस कीं आगिया-
ळीही नव्हेस; किंवा नादविंदूच्या रोळांतही तूं नाहींस. ६२ तूं
रेचक नव्हेस कीं पूरक नव्हेस; कुंभक नव्हेस कीं त्राहाटक नव्हे-
स. उलट, तूं तर ह्यांचा प्रवर्तक आहेस. मग तेंच तूं कसा
बरें होशील? ६३ तूं मंत्रही नव्हेस कीं अनुष्ठानही नव्हेस; धारणा

ना ध्यान ॥ समाधी ना आसन ॥ तेंही तूं नव्हसी ॥६४॥ हें देहाचें स्थान मान ॥ तें सकळही खंडज्ञान ॥ या दृश्याचें जरी तुज ज्ञान ॥ तरी तेंचि तूं केवीं होसी ॥ ६५ ॥ जेथें देहचि अनित्य ॥ तेथींचें लय लक्ष्य केवीं सत्य ॥ ह्मणूनि सकळही मिथ्यात्व ॥ खंडज्ञान ॥६६॥ जें जें मनें जाणिजे ॥ तें दृश्य आत्मा केवीं होईजे ॥ हें सकळही सांडूनि स्वयें अनुभविजे ॥ परमत्त्व ॥ ६७ ॥ देहादिप्रपंचानि साक्षित्वें ॥ सांडूनि देहसंबंधी सकळ तत्वें ॥ सुखिया होई स्वप्रकाशत्वें ॥ स्वस्वरूपीं ॥ ६८ ॥ तुझें स्वरूप नीर्वीकार ॥ तेथें नाहीं देहाचे षड्विकार ॥ आणि वर्णाश्रम कुळाचार ॥ तो केवीं

---

नव्हेस कीं ध्यानही नव्हेस; समाधि किंवा आसन ह्यांपैकीं तूं नव्हेस. ६४ हें देहाचें स्थानमान हें सारेंच खंडज्ञान होय. ह्या दृश्याचें जर तुला ज्ञान आहे तर तेंच तूं कसं होशील ? ६५ मुळीं देहच जेथें अनित्य आहे, तेथचा लय व लक्ष्य सत्य कसें मानावें ? ह्मणून सर्वच मिथ्या भास खंडज्ञान होय. ६६ जें जें मनानें जाणलें जातें तें तें सारें दृश्य हाय. तेव्हां तें आत्मा कसें होईल? तेव्हां हें सर्वही टाकून देऊन आपण होऊन त्या परमतत्त्वाचा अनुभव घ्यावा. ६७ देहादि प्रपंचाच्या साक्षित्वानें देहसंबंधीं तत्वें टाकून देऊन स्वात्मबोधानें स्वस्वरूपीं सुखी होऊन रहा. ६८ तुझें स्वरूप निर्विकार आहे तेथें देहाचे षड्विकार नाहींत मग वर्णाश्रम कुळाचार वगैरेंचें

कल्पावा ॥ ६९ ॥ ऐसें निरर्थकरूप जाणूनी ॥ सत्य बोलिलों वचनीं ॥ चित्त देईजे मुनिजनीं ॥ श्रीमुकुंदराज ह्मणे ॥७० ॥ इति श्रीमद्विवेकसिंधौ संहारक्रमे गुरुशिष्यसंवादे स्थूलदेहनिरसनं नाम प्रथमप्रकरणं समाप्तं ॥

---

नांव तेथें कसें काढावें ? ६९ श्रीमुकुंदराज ह्मणतात:—अशाप्रकारें हें निरर्थकच आहे हें जाणून सत्य तेच शब्द बोललों. तर मुनिजनांनीं इकडे चित्त द्यावें. ७०

# प्रकरण दुसरें.

विषय:— लिंगदेह निरसन.

श्रीगणेशाय नमः ॥ तंव शिष्यशिरोमणि बोलिले ॥ वंदूनि श्रीगुरूचीं पाऊलें ॥ जें स्थूलदेह बंधन तोडिलें ॥ निकियापरी ॥१॥ स्थूलदेह बंदिशाळेपासूनि सुटलों॥ देहादिप्रपंचसाक्षित्व पावलों ॥ आतां कृतार्थ झालों ॥ श्रीचरणप्रसादें ॥२॥ तंव बोले श्रीगुरुनाथ ॥ जंव नव्हसी लिंगदेहातीत ॥ तंव न चुके संसृतिपंथ ॥ कदाचि पैं गा ॥ ३ ॥ जंव लिंगदेह आवरण असे ॥ तंव स्वस्वरूप न प्रकाशे ॥ नाथिलें अहंतेचें पिसें ॥ शुद्ध चैतन्यासी ॥ ४ ॥ घटावच्छिन्न घटा-

श्रीगणेशाय नमः—नंतर श्रीगुरूंचे पाय नमून शिष्यशिरोमणि ह्मणाले कीं, ह्या जडदेहाचें बंधन उत्तम प्रकारें तोडल्यासारखें झालें. १ ह्या जडदेहाच्या बंदिशाळेंतून सुटलों. देहादि प्रपंचाच्या साक्षित्वास पोंचलों. महाराज! श्रीच्या चरणाच्या प्रसादेंकरून आतां कृतार्थ झालों. २ तेव्हां श्रीगुरुनाथ ह्मणाले कीं, जोंपर्यंत तूं लिंग देहातीत—कर्मवासनेहून वेगळा—झाला नाहींस तोंपर्यंत संसारमार्गांतून कधींच सुटका नाहीं. ३ जोंपर्यंत लिंगदेहाचें आवरण आहे, तोंपर्यंत स्वस्वरूपाचा बोध व्हावयाचा नाहीं. शुद्ध चैतन्याला अहंतेचें नसतेंच वेड लागलें आहे. ४ घटांत व्यापून राहिलेलें घटाकाश

काश ॥ घटासरिसें हिंडे दाही दिशा ॥ तेवीं आत्मा याता-
याती गर्भवास ॥ पावे लिंग देहासवें ॥ ५ ॥ जेवीं सविता
जळीं बिंबत ॥ तरंगे चांचल्य दशे पावत ॥ तेवीं आत्मा
असे सुखदुःख भोगित ॥ लिंगदेहवशें ॥ ६ ॥ अग्नि लोहाचे
संसर्गे जैसा ॥ घणाचे घाई पिटे तैसा ॥ आत्मा जन्ममरण
पावे आपैसा ॥ आवर्ते लिंग देहीं ॥ ७ ॥ शुभाशुभ कर्मीं
वेष्टित ॥ चौऱ्यायशीं लक्ष योनी भ्रमत ॥ जंव न होसी लिंग-
देहातीत ॥ तंव मोक्ष कैंचा ॥ ८ ॥ तरी तें लिंग देह ह्मणसी
कैसें ॥ तुज पूर्वी निरोपिलें जैसें ॥ तयाचे निरासें प्रकाशे ॥
स्वस्वरूप ॥ ९ ॥ जो सूक्ष्म भूतांचा ॥ पंचविसां कळांचा ॥

---

घटाबरोबर दाहिदिशांस फिरतें, त्याचप्रमाणें लिंगदेहाबरोबर आत्मा-
ही गर्भवासांच्या यातायातींत पडत असतो. ५ ज्याप्रमाणें पाण्या-
तील सूर्यबिंब लाटांबरोबर चांचल्याच्या अवस्थेला पोंचतें ( हालूं
लागतें. ),त्याचप्रमाणें आत्माही लिंगदेहाच्या संगतीनें सुखदुःखें
भोगीत असतो. ६ अग्नि हा जसा लोखंडाच्या संसर्गानें घणाच्या
घावांखालीं पिटला जातो, तसाच लिंगदेहानें वेष्टिलेला आत्माही
आपोआप जन्ममरणादि पावत असतो. ७ शुभ व अशुभ कर्मांनीं
वेष्टिलेला, चौऱ्यांशीं लक्ष योनींचे फेरे फिरत असलेला जो तूं, त्या
तुला लिंगदेहाहून वेगळा झाला नाहींस तोंपर्यंत मोक्ष कोठून प्राप्त
होणार ! ८ आतां तो लिंगदेह कसा आहे ह्मणशील तर तुला पूर्वी
सांगितला आहे तसाच तो आहे. त्याचा निरास झाला कीं, स्वस्वरूप
प्रकाशमान झालेंच ! ९ जो सूक्ष्म भूतांचा, पंचवीस कळांचा बन-

वासनामय जीवाचा ॥ लिंगदेह ॥ १० ॥ निर्विकल्प प्रथम स्फुरण ॥ जें मागा निरूपिलें अंतःकरण ॥ तेंचि जरी तूं तत्साक्षी कवण ॥ तुजवांचूनियां ॥ ११ ॥ संकल्पविकल्पांसी आपणयातें ॥ करणें नाहीं निरुतें ॥ तद्रूप मनातें जाणतें ॥ तेंचि तूं कैसेनी ॥ १२ ॥ निश्चय न करी निश्चयातें ॥ आत्मा प्रकाशी तयातें ॥ तद्रूप दृश्य जाणे बुद्धीतें ॥ ते बुद्धि तूं कैसेनी ॥ १३ ॥ बुद्धीच आत्मा मानित ॥ उठिलें तें बौद्धमत ॥ ते बुद्धि साक्षित्वें निर्जित ॥ केली तुवांची ॥ १४ ॥ पूर्वानुभूताचें अनुसंधान ॥ तें चित्ताचें चेतव्य लक्षण ॥ चित्तातें चेतवितो कवण ॥ तुजवांचूनिया ॥ १५ ॥ देहाकारें आपणातें

---

लेला, वासनामय तोच जीवाचा लिंगदेह होय. १० पहिलें निर्विकल्प स्फुरण तेंच अंतःकरण ह्मणून जें मागें सांगितलें तेंच जर तूं असशील तर तुझ्यावांचून त्याचा साक्षी कोण बरें असावा! ११ संकल्प विकल्प कांहीं आपणच आपल्याला करीत नाहींत, तर त्यांचें रूप मनाला समजतें. तेव्हां तेंच तूं कसें होशील! १२ निश्चय कांहीं निश्चयाला करीत नाहीं. तर आत्मा हा त्याला प्रकाश देणारा आहे. आणि त्याचें रूप जें दृश्य तें बुद्धीला कळतें. ती बुद्धि तूं कसा बरें होशील! १३ बुद्धीलाच आत्मा मानणारें तें बौद्धमत अस्तित्वांत आलेलें आहे. तें बुद्धिसाक्षित्वानें तूंच जीत केलेंस. १४ पूर्वी जें काय अनुभवलें असेल त्याचें अनुसंधान तेंच चित्ताचें चेतव्य लक्षण होय. त्या चित्ताला चेतविणारा तुझ्याशिवाय दुसरा कोण आहे बरें? १५ देहरूपानें आपणच तो मानणें हीं अभिमानाचीं लक्षणें

ऐसें मानित ॥अभिमानलक्षणें अहंकार उठवित॥ तयांत असूनि तयातें जाणत ॥ तेचि तूं केवीं होसी ॥ १६ ॥ अहं सुखी अहं दुःखी येणें आकारें ॥ अहंता लक्षण वृत्ति स्फुरे ॥ तेसे विकार तुझेनि आधारें ॥ उठती जडती देहग्रंथी ॥ १७ ॥ उत्पत्तिकाळीं उत्पत्तीतें आभासकाळीं आभासातें ॥ विनाशकाळीं विनाशातें ॥ जाणता तो तूं वेगळाचि ॥ १८ ॥ जैसा पुष्पांचा परिमळ ॥ पुष्पीं असूनि पुष्पा वेगळ ॥ अहंकृतिसाक्षी आत्मा निर्मळ ॥ तैसा जाणावा ॥ १९ ॥ अहंकारातें आत्मत्वें मानितु ॥ उठिला जो नैय्यायिक सिद्धांतु ॥ तयातें साक्षित्वेंचि तूं ॥ जाणतोसि ॥ २० ॥ कवण ऐसें ह्मणेल ॥ अहंकारें आत्मा प्रकाशेल ॥ तरी दृश्यानें द्रष्ट्यातें जाणिजेल॥

---

अहंकार उत्पन्न करतो. त्यांत असून त्याला जाणणारा जो तूं तो तोच कसा होशील ? १६ ' मी सुखी ' मी दुःखी ' ह्या रूपानें अहंतेच्या लक्षणांची वृत्ति स्फुरण पावतें; आणि तसेच तुझ्या आश्रयानें विकार उद्भवतात व ह्या देहरूप बंधाला खिळून राहतात. १७ उत्पत्तिकालांत उत्पत्ति, आभासकाळीं ( स्थितिकाळीं ) आभास (स्थिति,) आणि नाशकाली नाश जाणणारा तो तूं वेगळाच आहेस. १८ ज्याप्रमाणें फुलांतील सुवास फुलांत असून फुलाहून वेगळा आहे, असें दिसून येतें, त्याचप्रमाणें अहंकाराचा निर्मळ आत्मा हा साक्षी आहे, असें समजावें. १९ अहंकार हाच आत्मा मानणारा नैय्यायिकांचा सिद्धांत उद्भवला आहे. त्याला तर तूं साक्षित्वानेंच जाणतोस. २० [ आतां ] कोणी असें ह्मणतील कीं, अहंकारानें

हें केविं घडे ॥ २१ ॥ एवं अंतःकरणपंचकाचे द्रष्टे ॥ तत्साक्षित्वेंचि भेटे ॥ तें आत्मस्वरूप नेटें वोटें ॥ तेंचि तें तूं ॥ २२ ॥ प्राण असतां देहासि जिणें ॥ कां तेणेंचि वीण मरणें ॥ ह्मणनि प्राणचि आत्मा बोलणें ॥ मूढजनासी ॥ २३ ॥ आत्मा प्राणाचा द्रष्टा ॥ तो प्राण आत्मा मानिती निकटा ॥ तयाचा थोर वाटे वोखटा ॥ योगियांसी ॥ २४ ॥ जरी प्राणचि आत्मा ह्मणणें ॥ तरी सुषुप्त्यवस्थेंत यासी कां नाहीं जाणणें ॥ चोरीं चोरितां वस्त्र भूषणें ॥ कां नेणेचि तो ॥ २५ ॥ जागृती आणि स्वप्नदशे ॥ प्राण जाणता ऐसें दिसे ॥ परी

आत्मा प्रकाशतो ( आत्म्याचा बोध होतो. ) तर दृश्यानें द्रष्ट्याला जाणिलें असें कसें होईल? २१ एवंच अंतःकरणपंचकाचें द्रष्टें जें आत्मस्वरूप तें त्याच्या साक्षित्वानेंच भेट देतें तेंच तूं निश्चयेंकरून होस. २२ प्राण असे तोंपर्यंतच देह जिवंत आहे, तो गेला कीं, तेंच त्याचें मरण होय. ह्मणून प्राण हाच आत्मा असें मूर्ख लोकांस वाटत असतें. २३ आत्मा हा ( खरोखर)प्राणाचा द्रष्टा आहे. पण ( इतर लोक ) प्राण व आत्मा अगदीं एक आहे, असें मानितात. ( तथापि )योग्यांना मात्र त्याची ( प्राणाची )तितकीशी मानठबरी वाटत नाहीं. २४ प्राणालाच जर आत्मा ह्मणावयाचें तर झोंपेमध्यें त्याला ज्ञान कां असूं नये? त्यावेळीं चोरांनीं दागदागिने व कपडेलत्ते चोरून नेले तर तें त्याला मुळींच कळत नाहीं, असें कां? २५ जागेपणीं आणि स्वप्नांत प्राण हा जाणता आहे असें वाटतें. परंतु तिन्ही अवस्थांमध्यें प्राण हा आपण होऊनच कांहीं

आपणया आपण न प्रकाशे ॥ अवस्थात्रयीं ॥ २६ ॥ मी असें पिंगले कां इडे ॥ ऐसें आपणयांत नेणे फुडें ॥ म्हणूनि प्राणचि हें आत्मा हें नघडे ॥ निभ्रांत पैं ॥ २७ ॥ अपानासी अधोगती ॥ उदानासी कंठीं स्थिती ॥ समानासी नाभिकमळीं वस्ती ॥ तेथूनि पसरे सर्व संधी ॥ २८ ॥ व्यान सर्वांगीं व्यापक ॥ आत्मा पंचप्राणांसी प्रकाशक ॥ म्हणूनि अवस्थात्रयीं तूंचि एक ॥ प्राणसाक्षी ॥ २९ ॥ एवं प्राणपंचकातें जाणता ॥ तूं प्राणपंचक नव्हेसी सर्वथा ॥ म्हणूनि असो हें आतां ॥ इंद्रियेंही नव्हेसी ॥ ३० ॥ शब्दोन्मुख अंतःकरणवृत्ती ॥ तें श्रोत्रेंद्रिय तुजाचि आहे प्रतीती ॥ श्रोत्र द्रष्टा

आपणाला प्रकाशित करूं शकत नाहीं. २६ मी पिंगला नाडीच्या ठिकाणीं आहें कां इडेच्या ठिकाणीं आहें, हें त्याला स्वतःला कांहीं खरोखर कळत नाहीं. म्हणून प्राण हाच आत्मा निःसंशय नव्हे. २७ अपान हा अधोभागीं असतो; उदान हा कंठामध्यें असतो; आणि सामानाचें वास्तव्य नाभिकमळीं असून तेथून तो सर्व संधींत पसरतो. २८ व्यान हा सर्वांग व्यापून असतो. आणि आत्मा हा पंचप्राणांनाही प्रकाश देणारा आहे. म्हणून तिन्ही अवस्थांमध्यें तूंच एक प्राणाचा साक्षी आहेस. प्राण २९ एवंच तूं प्राणपंचकास जाणणारा आहेस. तें प्राणपंचक मात्र तूं बिलकुल नव्हेस. आतां हें असो. म्हणून तूं इंद्रियेंही नव्हस. ३० शब्दाकडे वळलेली जी अंतःकरणाची वृत्ति तें श्रोत्रेंद्रिय होय. त्याचा तुझा तुलाच अनुभव आहे. तेव्हां श्रोत्र हाच द्रष्टा ही गोष्ट कशी

हे स्थिती ॥ केवीं घडे ॥ ३१ ॥ स्पर्शाचे ग्रहणीं उन्मुख ॥ तेंचि मन त्वगिंद्रिय वोळख ॥ तें दृश्य तूं द्रष्टा देख ॥ एक कैसेनि होसी ॥ ३२ ॥ रूपातें निवडिती ॥ जे चक्षु बुद्धीची वृत्ती ॥ तयातें जाणे ते ज्ञप्ती ॥ तें तूं चक्षु इंद्रिय कैसेनी ॥३३ जिव्हेंद्रियाची वृत्ती ॥ जे षड्रसातें चाखिती ॥ तयेसी साक्षी-भूत संविती ॥ तें रसनेंद्रिय नव्हसी तूं ॥३४॥ अहंकाराची वृत्ति विशेष ॥ जो गंधग्रहणोन्मुख ॥ तया घ्राणेंद्रियाचा अव-भासक ॥ तूं घ्राणेंद्रिय कैसेनी ॥ ३५ ॥ शब्द स्पर्श रूप रस गंध ॥ यांसी जाणता तूं चैतन्य शुद्ध ॥ हें विषयपंचक जड तूं शुद्धबुद्ध ॥ विषयातीत ॥ ३६ ॥ शब्दातें बोलूं पाहत ॥

---

होईल ? ३१ स्पर्शग्रहणाकडे वळलेली जी मनोवृत्ति तेंच त्वगिंद्रिय हें ध्यानांत आण. तें दृश्य आणि तूं द्रष्टा होस. मग दोन्ही एक कशीं होतील ३२ रूपाची शहानिशा करणारें जें चक्षु ती बुद्धीची वृत्ति होय. त्यांना जाणणारी ज्ञानकळा होय. तेव्हां तें चक्षु इंद्रिय तूं कसें होशील ३३ षड्रसांना चाखणारी जी जिव्हेंद्रियाची वृत्ति तिला ज्ञान हें साक्षीभूत असतें. तेव्हां तें रसनेंद्रियही तूं नव्हेस. ३४ वास घेण्याकडे वळलेली जी अहंकाराची विशेष प्रकारची वृत्ति तें घ्राणेंद्रिय होय. त्याचा अवभासक-प्रकाशक तो तूं होस. तेव्हां घ्राणेंद्रिय तें तूं कसा होशील ? ३५ शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध ह्यांस जाणणारें शुद्ध ? चैतन्य तूं होस. विषयपंचक हें जड आहे, आणि तूं शुद्ध बुद्ध (पूर्णज्ञानी) व विषयांहून निराळा आहेस. ३६ अंतःकरणांतील जी गोष्ट शब्द उच्चारूं पाहते,

जो अंतःकरणाचा वृत्तांत ॥ या क्रियात्मक वाचे आणित ॥ तूं द्रष्टेपणेंची ॥ ३७ ॥ ते वदनीं स्तुती करी ॥ मग बोले मातृकाक्षरीं ॥ ते तुज दृश्य वैखरी । द्रष्टेपणेंची ॥ ३८ ॥ वैखरी निरास प्रसंगें ॥ मध्यमाही निरसावी लागे ॥ ते उद्भवे बुद्धीचेनि संगें ॥ नादरूप ॥३९॥ मनाचेनि आकारें ॥ ध्वनिरूप पश्यंती स्फुरे ॥ पाहातां तत्वनिर्धारें ॥ तिये वेगळाचि तूं ॥४०॥ जीवात्मयाचें प्रथम स्फुरण ॥ तें परेवाचेचें लक्षण ॥ निरूपिलें जें अंतःकरण ॥ तेचि ते जाणावी ॥ ४१ ॥ ऐसा चतुर्विध वाचेतें देखता ॥ तूं वाचा नव्हेसी सर्वथा ॥ तीतेंही प्रकाशिता ॥ तूंचि एक ॥ ४२ ॥ मनाचा वृत्त्यंकुर ॥ करूं

ह्या क्रियात्मक वाचेला तूंच द्रष्टेपणानें उदयास आणितोस. ३७ ती तोंडानें स्तुति करते. मग मात्रा व अक्षरें यांहींकरून बोलूं लागते. ती वैखरी तुला द्रष्टेपणानेंच दृश्य झालेली असते. ३८ वैखरीचा निवास करतेवेळीं मध्यमेचाही निरास करावा लागतो. ती बुद्धीच्या योगानें नादरूपानें प्रगट होते ३९. मनाच्या रूपानें ध्वनिरूप पश्यंती ( वाणीचा दुसरा प्रकार ) स्फुरण पावते. तत्वनिश्चयेंकरून पाहूं गेलें तर तूं तिच्याहूनही वेगळाच आहेस ४० जीवात्म्याचें पहिलें स्फुरण तें परावाचेचें लक्षण होय. मागें अंतःकरण ह्मणून जें सांगितलें तेंच तें समजावें. ४१ असा ह्या चारी वाणींचा विचार केला ह्मणजे तूं वाचा तर बिलकुल नव्हेस. पण तूंच केवळ तिचाही प्रकाशकच आहेस. ४२ मनोवृत्तीचा जो अंकुर स्पर्शविषय व्यापार करावयास पाहतो त्या हस्तादि अवयवां-

पाहे स्पर्शविषय व्यापार ॥ तया पाणींद्रियाचा दातार ॥ तें तूं केवीं होसी ॥ ४३ ॥ बुद्धिवृत्तीचा फांटा ॥ धावों पाहे रूपाचा वांटा ॥ तया पदेंद्रियांचा द्रष्टा ॥ तया वेगळाचि तूं ॥४४॥ चित्ताचा वृत्त्यंकुर ॥ करूं पाहे रतिविषय व्यापार ॥ तया शिश्नेंद्रियाचा द्रष्टा निर्विकार ॥ तो तूं वेगळाची ॥४५॥ अहंकाराचा वृत्तिविभाग ॥ करूं पाहे मळोत्सर्ग ॥ तया पायुरिंद्रियाचा साक्षी निःसंग ॥ तद्विलक्षण तूं ॥ ४६ ॥ ऐसे अवयव पंचवीस ॥ लिंगदेहाचे साभास ॥ ते दृश्य तूं द्रष्टा निराभास ॥ वस्तु लिंगदेहातीत ॥४७॥ स्वप्नावस्थेचें लक्षण ॥ ऐक तुज सांगेन ॥ जेणें बुझसी वेगळेपण ॥ स्वस्वरूपाचें ४८ जागृती दश मनें भोगिलें ॥ ते विषय जड सरले ॥ परी

चा दाता तूंच होस. तेव्हां तेच तूं कसे होशील ? ४३ बुद्धीच्या वृत्तीची एक शाखा रूपाच्या वाटेकडे धावावयास पाहते, त्या पद इंद्रियाचा द्रष्टा तूं असून त्याहून वेगळाच आहेस. ४४ चित्तवृत्तीचा जो अंकुर रतिविषयव्यापार करूं पाहतो, त्या शिश्नेंद्रियाचा तूं द्रष्टा असून निर्विकार व वेगळाच आहेस. ४५ अहंकाराची एक वृत्ति मलोत्सर्ग करूं पाहते, त्या पायुइंद्रियाचा तूं निःसंग साक्षी असून त्याहून अगदीं भिन्न आहेस. ४६ अशाप्रकारें लिंगदेहाचे पंचवीस अवयव असून ते साभास आहेत. ते दृश्य होत. तूं द्रष्टा असून निराभास आहेस. तूं लिंगदेहाहून पलीकडची वस्तु होस. ४७ आतां तुला स्वप्नदशेचें लक्षण सांगतों तें एक. तेणेंकरून स्वस्वरूपाचें वेगळेपण तुझ्या ध्यानांत येईल. ४८ जागपणीं जे मनानें भोगले ते जड विषय

अध्यासरूप ठसावले ॥ तें स्वप्न बोलिजे ॥ ४९ ॥ द्रष्ट्या दृश्याचा अध्यासु ॥ साचाचि सारिखा आभासु ॥ फुल सरे परी उरे वासु ॥ डाहाळिये जेवीं ॥ ५० ॥ कां कापूर करंडाचा वेंचे ॥ परंतु तेथील वास न वेंचे ॥ ऐसें स्वप्नावस्थेचें ॥ जाणिजे सुख ॥ ५१ ॥ निद्राकाळीं बुद्धीचा माथां ॥ वैसे जागृतीचा उलथा ॥ ते वासनामय स्वप्नावस्था ॥ तुज दृश्य पैं ॥ ५२ ॥ जरी लिंग देह नव्हसी ॥ तरी स्वप्नावस्था केवीं होसी ॥ तियेतेंही प्रकाशितोसी ॥ निजप्रकाशें ॥ ५३ ॥ लिंगदेह स्वप्नावस्था ॥ या दोहींचा अभिमानी तैजस भोक्ता ॥ तया सात्विक अहंकारातें जाणता ॥ तया वेगळाचि तूं ॥ ५४ ॥

---

नाहींसे होतात खरे, परंतु भासरूपानें जो मनावर ठसा बसला तेंच स्वप्न होय. ४९ द्रष्टयाला दृश्याचा भास ह्मणजे खऱ्याप्रमाणेंच भ्रम होतो. फूल जातें पण फांदीला जसा त्याचा वास उरतो. ५० किंवा करंड्यांतला कापूर जातो पण त्याचा वास जसा जात नाहीं, अशाच पैकीं स्वप्नदशेंतील सुख आहे, असें समज. ५१ झोंपेंत असतांना बुद्धीच्या डोकीवर जागृतीचा लहानसा टोला बसतो, तीच वासनामय स्वप्नदशा होय. ती तुला दृश्य आहेच. ५२ तूं लिंगदेहच जर मुळीं नव्हेस, तर तूं स्वप्नदशा कोठून असणार? तूं निजप्रकाशानें तिचाही प्रकाशक आहेस. ५३ लिंगदेह आणि स्वप्नावस्था ह्या दोहोंचा अभिमानी व भोक्ता तैजस होय. त्या सात्विक अहंकाराला तूं जाणणारा व त्याहून अगदीं वेगळाच आहेस. ५४ कंठस्थान व प्रविविक्त ह्मणजे सूक्ष्म भोग ह्या दो-

कंठस्थान भोग प्रविविक्त ॥ या दोहोंसी तूं व्यतिरिक्त ॥ या सत्वकार्या पंचविधातीत ॥ तत्साक्षित्वेंची ॥ ५५ ॥ जैसा कां प्रसिद्ध दाहक ॥ लोहीं असूनि लोह-प्रकाशक ॥ तैसा तूं लिंगदेहा आभासक ॥ निजप्रकाशें ॥ ५६ ॥ चुंबकसन्निधानमात्रें ॥ लोह भ्रमतसे विचित्रें ॥ तसा तूं आकर्तेन स्वतंत्रें ॥ चेष्टे जड लिंगदेह ॥ ५७॥ श्रवणीं शब्द ऐकणें ॥ त्वचेसी स्पर्श घेणें ॥ नेत्रीं रूपातें देखणें ॥ तुझेनि परी तुज नाहीं ॥ ५८॥ जिव्हे रसातें चाखणें ॥ घ्राणें परिमळ घेणें ॥ तुझेनि परी तुज नाहीं करणें ॥ इंद्रियव्यापार ॥ ५९ ॥ वाचेसी बोलणें ॥ हातांसी देणें घेणें ॥ पायांसी चालणें ॥

होंहूनही तूं व्यतिरिक्त म्हणजे वेगळा आहेस. हें जें सत्त्वाचें पंचविध कार्य त्याहून तूं त्याच्या साक्षित्वानेंच वेगळा आहे. ५५ जसा प्रसिद्ध अग्नि हा लोखंडांत असून लोखंडाचा प्रकाशक आहे, तसाच तूंही निजप्रकाशानें लिंगदेहाचा प्रकाशक आहेस. ५६ लोहचुंबकाच्या सान्निध्यानें—लोहचुंबक जवळ येतांच लोह जसें विलक्षण रीतीनें—हवें तिकडे फिरूं लागतें, तसाच अकर्ता व स्वतंत्र असा जो तूं, त्या तुझ्यामुळें जड व लिंगदेहही हवा तसा फिरत असतो. ५७ कानांनीं शब्द ऐकणें, त्वचेनें स्पर्श समजणें, डोळ्यांनीं रूप पाहणें हें तुझ्यामुळें होतें खरें पण तें तुला मात्र लागूं नाहीं.५८ जिभेनें रुचि घेणें, नाकानें वास घेणें, हें सगळें तुझ्यामुळें होतें खरें,परंतु तुला मात्र इंद्रियांचे व्यापार नाहीत.५९वाणीनें बोलणें,

होय तुझेनी ॥ ६०॥ शिश्नासी रति सुख भोगणें॥ पायूसी मलोत्सर्ग करणें ॥ तूं अकर्ता व्यापारें येणें ॥ केवीं लिपसी ॥ ६१ ॥ मनासी मंतव्य ॥ बुद्धीसी बोद्धव्य ॥ अहंतेसी अहंतव्य ॥ अकर्तेन तुवांची ॥६२ ॥चेतव्य चित्ताचें॥ निर्विकल्प स्फुरण अंतःकरणाचें ॥ हें सन्निधान फल आत्मयाचें ॥ परी तो अतीत ॥ ६३ ॥ जंव तुज नाहीं स्वरूपाचा निर्धार ॥ तंव आपण पा कल्पिसी इंद्रियव्यापार ॥ शुभाशुभ कर्मीं वेष्टिला संसार ॥ तुज नाथिलाची ॥ ६४ ॥ आतां तुवां द्रष्टेन आपणपें जाणितलें ॥ तंव देहद्वय निरसलें॥ वेद्यत्व अ-

---

हातानें देणें व घेणें, पायांनीं चालणें, सारें तुझ्यामुळेंच ! ६० शिश्नानें रतिसुख भोगणें, पायनें मलोत्सर्ग करणें, तूं अकर्ता आहेस, तेव्हां अशा व्यापारांनीं तुला आत्म्याला मळ कसा लागणार? ६१ मनाला मनपणा, बुद्धीला बुद्धित्व, अहंतेला अहंकृति, हीं तूं जो अकर्ता त्या तुझ्यामुळेंच आहेत. ६२ चित्ताचा चित्तपणा, अंतःकरणाचें निर्विकल्प स्फुरण हें आत्म्याच्या सान्निध्याचें फळ आहे. पण तो मात्र वेगळा आहे. ६३ जोंपर्यंत स्वरूपाचा निश्चय तुला झाला नाहीं, तोंपर्यंत तूं आपण होऊनच इंद्रियांचा व्यापार कल्पित आहेस, आणि शुभ व अशुभ कर्मांनीं व्यापिलेला हा नसताच संसार तुझ्या मागें लागला आहे. ६४ आतां तूं द्रष्टेपणानें आपणाला जाणलेंस, तेव्हां उभय देहांचा निरास झाला आणि म्हणूनच ज्ञेय म्हणून जें आहे

विद्यामय देखिलें ॥ ह्मणवोनीची ॥ ६५ ॥ अविद्येसी असतां अनादित्व ॥ पूर्वीच इयेसी मिथ्यात्व ॥ तत्कार्य देहद्वया अनित्यत्व ॥ तें सांगावेंचि नलगे ॥६६॥ स्वप्नेंद्रियाचेनि द्वारें ॥ जीवीं पुण्यपाप विस्तारे ॥तयासी प्रबोधेंचि प्रायश्चित्त बारे ॥ येरें काज नाहीं ॥ ६७ ॥ तेसें देहद्वयाचे निमित्तें ॥ कर्में घडती सदसतें ॥ तीं जळती समस्तें ॥ तत्साक्षित्वेंची ॥६८॥ आतां असो हा युक्तिप्रसंग ॥ जाहलीया लिंगदेहाचा भंग ॥ चुके स्वर्गनरकाचा मार्ग ॥ स्वभावेंची ॥ ६९ ॥ देहद्वयाचा द्रष्टा ॥ नवचे शुभाशुभ कर्मांचिया वाटा ॥ ह्मणूनि विलक्षण

---

तें अविद्यामय (आभासमात्र) आहे असें अनुभवास आलें.६५अविद्या ही अनादि आहे, आणि ती मुळचीच मिथ्या आहे. तेव्हां तिचें कार्य जे हे उभय देह त्यांना अनित्यपणा असणार हें सांगावयाला नकोच! ६६ स्वप्नेंद्रियांच्या द्वारानें जीवाच्या ठायीं जें पापपुण्य फैलावतें त्याला हें पहा! जागृति हेंच प्रायश्चित्त. दुसऱ्याचें कारण नाहीं. ६७ त्याचप्रमाणें उभय देहांच्या निमित्तानें बरीं वाईट कर्में घडत असतात, तीं सर्व त्यांच्या साक्षित्वानेंच भस्म होऊन जातात. ६८ आतां हा युक्तिवाद पुरे. लिंगदेहाचा नाश झाला ह्मणजे आपोआपच स्वर्गाची व नरकाची वाट खुंटते.६९उभय देहांचा द्रष्टा, शुभ व अशुभ कर्मांच्या वाटेलाही न जाणारा ह्मणून हे उत्तम पुरुषा! तुला विलक्षण ( भिन्नलक्षण वेगळा ) व साक्षी ह्म-

साक्षी सुभटा ॥ तूतें ह्मणिपे ॥ ७० ॥ यापरी लिंगदेह नि-
रासु ॥ झालिया चुके गर्भवासु ॥ आत्मा भेटे स्वयंप्रकाशु ॥
ह्मणे मुकुंदराजु ॥ ७१ ॥ इति श्रीमद्विवेकसिंधौ संहारक्रमे
गुरुशिष्यसंवादे लिंगदेहकथनं नाम द्वितीयप्रकरणं समाप्तं ॥

---

टलें पाहिजे. ७० मुकुंदराज ह्मणतात:—ह्याप्रमाणें लिंगदेहाचा नाश झाला ह्मणजे गर्भवास टळतो आणि स्वयंप्रकाश आत्म्याची भेट होते. ७१

---

# प्रकरण तिसरें.

विषयः—कारणदेह निरसन.

श्रीगणेशाय नमः ॥ देहद्वयातें देखतां ॥ देहद्वय नव्हसी सर्वथा ॥ तेणें तुझें निरसलें तत्त्वतां ॥ विपरीतज्ञान ॥१॥ जें देहद्वयातें व्यालें ॥ देहद्वय मी ऐसें जेणें भुलविलें ॥ तें अन्यथाज्ञान निरसलें ॥ विलक्षण साक्षित्वें ॥ २ ॥ निरसलें अन्यथाज्ञान ॥ तेथींचे निरसले नव गुण ॥ तेचि कैसे कवण ॥ सांगिजेल ॥ ३ ॥ बुद्धि सुख दुःख प्रयत्न ॥ इच्छा द्वेष संस्कारण ॥ पुण्य पाप हे नव गुण ॥ बोलिजेती ॥४॥ यांचा विनाश हाचि मोक्ष ॥ ऐसा वैशेषिकाचा पक्ष ॥ परी अज्ञान-

श्रीगणेशाय नमः—दोन्ही देह पाहूं गेलें असतां दोन्ही देह तूं मुळींच नव्हेस. तेणेंकरून तुझें विपरीत ज्ञान ( भ्रम ) तत्त्वतः नाहींसें झालें! १ जें दोन्ही देहांना प्रसवलें, आणि तें मी असें ज्यानें वेड लाविलें, तें विपरीत ज्ञान विलक्षण ( वेगळेंच ) साक्षित्वानें नाश पावलें. २ विपरीत ज्ञान नाश पावलें ह्मणजे तेथले नऊही गुण नाश पावले. आतां ते नऊ गुणच कोणकोणते व कसे तें सांगण्यांत येईल. ३ बुद्धि, सुख, दुःख, प्रयत्न, इच्छा, द्वेष, संस्कार पुण्य व पाप ह्यांना नऊ गुण असें ह्मणतात. ४ ह्यांचा नाश तोच मोक्ष, असा वैशेषिकांचा पक्ष आहे. परंतु अज्ञानाचा नाश

निरासेंवीण नव्हे अपरोक्ष ॥ आत्मसाक्षात्कार॥ ५ ॥ आत्म-
यासी देहद्वयबंधन ॥ तया अज्ञानचि मूळकारण ॥ ह्मणूनि
अज्ञाननिवृत्तीविण ॥ मोक्ष कैंचा ॥ ६ ॥ जंव अज्ञान न
फिटे ॥ तंव संसार निःशेष न तुटे ॥ विपरीतज्ञानाचा कोंब
फुटे ॥ मागुता ह्मणुनी ॥ ७ ॥ तया आत्मयाचें अज्ञान ॥
फिटावया नाहीं साधन ॥ एक स्वस्वरूपपरिज्ञाना ॥ वां-
चूनियां ॥ ८ ॥ जेणें स्वरूपज्ञान न प्रकाशे ॥ तेंचि अज्ञान-
जाणिजे कैसें ॥ ऐसें ह्मणसी तरी पुसों प्रसंगवशें ॥ तें
सांग पा तूं ॥९॥ देहद्वयासी विलक्षण ॥ तो तूं सांगपा आ-
पण कवण ॥ जो स्थूलसूक्ष्मप्रपंचाचा जाण ॥ तूंचि एक

---

झाल्यावांचून अपरोक्ष आत्मसाक्षात्कार होत नाहीं. ५ आत्म्याला दोन्ही देहांचें बंधन असून त्याला मूळकारण अज्ञान हेंच आहे. ह्मणून अज्ञानाची निवृत्ती झाल्याशिवाय मोक्ष कोठून आणावा. ६ जोंपर्यंत अज्ञान नाहींसें झालें नाहीं तोंपर्यंत संसार अगदीं सुटला असें होत नाहीं. कारण, विपरीत ज्ञानाचा फिरून तेथें अंकुर फुटतो. ७ त्या आत्म्याचें अज्ञान नाहींसें व्हावयाला एका स्वस्वरूपाच्या ज्ञानावांचून दुसरें साधन नाहीं. ८ ज्यानें स्वस्वरूपाच्या ज्ञानाचा प्रकाश पडत नाहीं तेंच अज्ञान हें कसें समजावें? असें ह्मणशील तर ओघानुसार मी एक तुला विचारतों तें सांग पाहूं? ९ दोन्ही देहांहून भिन्न, स्थूल व सूक्ष्म प्रपंच जाणणारा जो

॥ १० ॥ देहद्वयातीत मी हे जाणिव ॥ ते तुझिया प्रकाशाची वाटिव ॥ तरी अमुकाचि मी स्वयमेव ॥ तो सांग कवण तूं ॥ ११ ॥ ऐसें बोलिले श्रीगुरुनाथ ॥ तंव शिष्य झाला विचारस्थित ॥ ह्मणे देहद्वयातीत ॥ तो मी कवण ॥ १२ ॥ मी पृथ्वी ना जळ ॥ तेज ना अनिळ ॥ आकाश जें निर्मळ ॥ तेंही मी नव्हें ॥ १३ ॥ या स्थूलभूतांचे अंश ॥ निरूपिले जे दृश्य पंचवीस ॥ ते मी नव्हें अस्थिमांस ॥ रक्त भूतिक ॥ १४ ॥ सूक्ष्मभूताचें दळवाडें ॥ जेणें लिंगदेह अन्यथा घडे ॥ ते मी नव्हें फुडें ॥ तो मी कवण ॥१५॥ नव्हें

तूंच एक, तो तूं स्वतः कोण तें आधीं सांग पाहूं? १० दोन्ही देहांहून भिन्न तो मी हें नुसतें जाणीव झालें, तो तुझ्या प्रकाशाचाच अंश होय. तथापि अमकाच तो शुद्ध मी, तो तूं कोण, तें मला सांग. ११ असें जेव्हां श्रीगुरुनाथ ह्मणाले तेव्हां शिष्य विचारांत गढून गेला. आणि ह्मणूं लागला " दोन्ही देहांहून भिन्न, असा मी कोण बरें? १२ मी पृथ्वी नव्हें कीं पाणी नव्हें; तेज नव्हें कीं वायु नव्हें;बरें;निर्मळ असें जें आकाश तें म्हणावें तर तेंही मी नव्हें. १३ ह्या जड भूतांचे जे दृश्य पंचवीस अंश सांगण्यांत आले ते किंवा रक्तापासून झालेलें अस्थि मांस तेंही मी नव्हें. १४ ज्या सूक्ष्म भूतांच्या समुदायानें मिथ्याभूत लिंगदेह झाला तो भूतसमुदाय तर मी उघड उघड नव्हें. तर असा मी कोण? १५ मी पंचप्राण नव्हें. तसेंच दुसरें विषयपंचक तेंही मला दृश्य असून

मी पंचप्राण ॥ जे मज दृश्यमान ॥ विषयपंचक तें अन्य ॥ मजाचि पासाव ॥ १६ ॥ ज्ञानेंद्रियपंचक मज दृश्य ॥ कर्मेंद्रियें नव्हे मी अव... ॥ अंतःकरण पंचक तें प्रकाश्य ॥ मी प्रकाशक॥१७॥ मन ...नाचा व्यापार ॥ बुद्धि बुद्धीचा निर्धार ॥ चित्त चित्ताचा विचार ॥ तो मी नव्हे॥१८॥नव्हे मी अहंकार ॥ आणि अहंतेचा व्यापार ॥ तयाचाही ज्ञातार ॥ तो मी वेगळाची ॥ १९ ॥ स्थूलदेहाची साकारता ॥ लिंगदेहाची सत्ता ॥ या दोहींतें मी जाणता ॥ नव्हे मी विपरीतज्ञान ॥ २० ॥ मी साकार ना साभास ॥ देहद्वयाचा द्रष्टा मी उदास ॥ तो मी कवण हा नाहीं प्रकाश ॥ माझा मजची ॥ २१ ॥

---

माझ्याचमुळें आहे. १६ ज्ञानेंद्रियपंचक तर मला दृश्य आहे; कर्मेंद्रियें तर मी खास नव्हें; व अंतःकरणपंचक तें प्रकाशलें जाणारें आणि मी प्रकाशक आहें १७ मन व मनाचा व्यापार, बुद्धि व बुद्धीचा निश्चय, चित्त व चित्ताचा विचार, तो कांहीं मी नव्हें. १८ मी अहंकार नव्हें आणि अहंतेचा व्यापारही नव्हें. तर त्यांनाहीं जाणणरा असा मी वेगळाच आहें. १९ जड देहाचा साकारपणा आणि लिंगदेहाची सत्ता ह्या दोहोंनाही मी जाणणारा आहें. मी विपरीत ज्ञान नव्हें. २० मी साकार नव्हें कीं साभास नव्हें. दोन्ही देहांचा मी द्रष्टा असून उदास ( केवळ तटस्थ, अलिप्त ) आहें. असा मी कोण ह्याचा माझा मलाच बोध होत नाहीं. २१ असा विचार करून शिष्यानें श्रीगुरूंना विनंति केली कीं; स्वामी

ऐसें शिष्यें विचारिलें ॥ मग श्रीगुरूतें विनाविलें ॥ जी मजचि मीं चोरिलें ॥ तें प्रकाशिजे स्वामी ॥ २२ ॥ या सर्वांतें जाणें ॥ तो मी आपणयातें नेणें ॥ तो मातें मज भेटवणें ॥ श्रीगुरुराया ॥ २३ ॥ आतां श्रीगुरुनाथ बोले ॥ तुवां आपुलें देहद्वय जाणितलें ॥ परी अज्ञान नाहीं निरसलें ॥ आत्मविपर्यीचें ॥ २४ ॥ तूं आपणयातें जाणतचि नेणसी ॥ हेंचि लक्षण अज्ञानासी ॥ नाथिलें अज्ञान कां वाहतोसी ॥ निज मस्तकीं ॥ २५ ॥ मी नेणें आपणातें ॥ आहेसि त्या अज्ञानातें जाणतें ॥ म्हणोनि अज्ञानासी अधिष्ठान निरुतें ॥ जाणपणाचि ॥ २६ ॥ अज्ञानासी अधिष्ठान ॥ तूंचि प्रत्यक्

---

महाराज! माझें मलाच मीं चोरलेलें आहे, त्याचा मला बोध करून द्यावा. २२ ह्या सर्वांना मी जाणतों खरा, पण तोच मी माझा मलाच ठाऊक नाहीं. तर हे श्रीगुरुराया! त्या मला माझीच भेट करून द्यावी. २३ तेव्हां श्रीगुरुनाथ म्हणाले " बाबा! तूं आपलें देहद्वय जाणिलेंस खरें, परंतु तुझें आत्मविषयक अज्ञान कांहीं अद्याप नाश पावलें नाहीं २४ तूं आपल्याला जाणत असूनच जाणत नाहींस, हेंच अज्ञानाचें लक्षण आहे. अरे! हें नसतेंच अज्ञान आपल्या माथीं कां वाहात बसला आहेस! २५ मी स्वतःला कांहीं जाणत नाहीं. पण तें तूं अज्ञानाला जाणणारें आहेस. म्हणून अज्ञानाला जाणतेपणा हाच खरोखर अधिष्ठान आहे. २६ तूं प्रत्यक् चैतन्य तोच ( खरोखर ) अज्ञानाला अधिष्ठान आहेस. जड

चैतन्य ॥ अपरोक्षासी आश्रय अचेतन ॥ ऐसें बोलोंच नये ॥ २७ ॥ साचा रज्जु आश्रय सर्पासी ॥ परी लटिका सर्प आश्रय नव्हे रज्जूसी ॥ मिथ्याभूत अज्ञान तुज रूपासी ॥ आश्रय केवीं घडे ॥ २८ ॥ मी आपणयातें नेणें ॥ ऐसें अज्ञानासी नाहीं ह्मणणें ॥ ह्मणूनि सत्यरूपा तुज धरणें ॥ अज्ञानासीपैं ॥ २९ ॥ सांडूनि स्थूळ सूक्ष्म प्रपंचातें ॥ पाहूं गेलासी निःप्रपंच द्रष्ट्यातें ॥ तंव वर्णव्यक्तिरहित निरालंबातें ॥ पाहतां भांबावलासी ॥ ३० ॥ येरव्हीं कीर तूं तेथेंचि असमी ॥ नाथिलें अज्ञान जाणतचि कवळसी ॥ जें कां मी नेणें ऐसें जाणतोसी ॥ तो तूं सांग कवण ॥ ३१ ॥ जैसें

---

हें अपरोक्षाला आश्रय झालें आहे अशी गोष्टच काढूं नये. २७ रज्जु ( दोरी ) सर्पाला खरोखर आश्रय आहे. परंतु खोटा सर्प मात्र रज्जूला आश्रय नव्हे. ( तसेंच ) मिथ्याभूत अज्ञान तुला स्वरूपाला—आश्रय कसें होईल. २८ मी मला ठाऊक नाहीं, असें कांहीं अज्ञानाला ह्मणतां येणार नाहीं ह्मणून सत्यरूप जो तूं त्या तुझ्याच ठिकाणीं अज्ञान आहे ह्मटलें पाहिजे. २९ स्थूल व सूक्ष्म प्रपंच टाकून प्रपंचरहित द्रष्ट्याला जेव्हां शोधूं लागलास तेव्हां वर्णव्यक्तिरहित निरालंब स्वरूप पाहतांना गोंधळलास. ३१ बाकी तूं खरोखर तेथेंच आहेस. कळत असतांनाच नसतें अज्ञान घेऊन बसला आहेस. मला कळत नाहीं असें जें तूं जाणतोस तो तूं कोण हें सांग? ३० पाण्यानें शेवाळाला जन्म दिला खरा, पण त्यानें त्यालाच झांकून

उदक वाबुळीतें ग्यालें ॥ परी तयातेंचि कवळिलें ॥ तैसें अज्ञानें आवरिलें ॥ तुझें निजस्वरूप ॥ ३२ ॥ स्थूळसूक्ष्मदेहद्वयातें ॥ आणि विपरीत ज्ञानातें ॥ अज्ञानचि प्रसवलें तयातें ॥ ह्मणूनि कारण बोलिजे ॥ ३३ ॥ जें अज्ञान तुझें कारण देह ॥ तें तूं नव्हसी निःसंदेह ॥ तूं अज्ञानसाक्षी विदेह ॥ परमस्वरूप ॥ ३४॥ मी आपणयातें नेणें ह्मणत ॥ तया नेणण्यातें असरी जाणत ॥ ह्मणूनि द्रष्टा अज्ञानासी अतीत ॥ तूंचि निभ्रांत पैं ॥३५॥ मी नेणें ऐसें वायांचि मानिसी ॥ जें कां मी नेणें ऐसें जाणत कवळलासी ॥ तरी जाणणेंचि तूं होसी॥ नेणणें मिथ्यारूप ॥ ३६ ॥जाणणें तें ज्ञान ॥ नेणणें

टाकिलें. त्याचप्रमाणें तुझ्या आत्मस्वरूपाला अज्ञानानें झांकून टाकलें आहे. ३२ स्थूल व सूक्ष्म अशा दोन्ही देहांना आणि विपरीत ज्ञानाला अज्ञानच प्रसवलेलें आहे. ह्मणून त्याला ' कारण ' असें नांव आहे. ३३ अज्ञान जें आहे तें तुझा कारणदेह आहे. तेव्हां तें तूं निःसंशय नव्हेस. तूं अज्ञानाचा साक्षी व विदेह ( देहरहित ) —परमस्वरूप होस. ३४ मी स्वतःला जाणत नाहीं ह्मणणारा, त्या न जाणण्याला जाणणारा तूं आहेस. ह्मणून अज्ञानाहून वेगळा खचित तूंच आहेस. ३५ मी जाणत नाहीं असें उगाच ह्मणतोस. कारण, मी जाणत नाहीं असें ह्मणणारा तूं झांकून गेला आहेस. तर जाणणें हेंच तूं होस. न जाणणें हें मिथ्याभूत आहे. ३६ जाणणें तें ज्ञान व न जाणणें तें अज्ञान होय. ज्ञानाच्या तुलनेला

तें अंज्ञान ॥ ज्ञानाचे तूं लेसी अलंकरण ॥ मिथ्या अज्ञानाचें ॥३७॥ असो हें अज्ञान नव्हे सत्य ॥ तरी विपरीतज्ञान अशेष अनित्य ॥ तत्कार्य देहद्वय मिथ्याभूत ॥ सर्वथैव गा ॥ ३८ ॥ तुझें कारण देह अज्ञान ॥ तेथें सुषुप्तीचें अधिष्ठान ॥ तेचि सुषुप्ती किं लक्षण ॥ तें आइक पां तूं ॥ ३९ ॥ जागृती आणि स्वप्नदशे ॥ भोगिलें इंद्रियव्यापाराचेनि अध्यासें ॥ वेधिलें मन अज्ञानीं उपसंहारतसे ॥ ते सुषुप्ती बोलिजे ॥ ४० ॥ दशेंसहित इंद्रियासी ॥ आणि अंतःकरणचतुष्टयासी ॥ विपरीतज्ञानें लीन होय माजीं अज्ञानासी ॥ ते सुषुप्ती जाण ॥ ४१ ॥ सुषुप्तीमाजीं असोनि सुषुप्तीनें ॥ तूं जाणत आहेसी तयें नेणिवेतें ॥ प्रबोधें सांगतोसी तयातें ॥

अज्ञानाचें अलंकार मिथ्या होत. ३७ असो. तर हें अज्ञान कांहीं सत्य नव्हे. विपरीत ज्ञान तर मुळीं झाडून सारें अशाश्वत. आणि त्याचें कार्य जें दोन्ही देह तेही सर्वस्वीं मिथ्याच! ३८ तुझा कारण देह अज्ञान, त्याला सुषुप्ति हें अधिष्ठान आहे. आतां त्या सुषुप्तीचें लक्षण कोणतें तें ऐक. ३९ जागेपणीं आणि स्वप्न-अवस्थेंत भोगलेल्या इंद्रियव्यापाराच्या मिथ्याभासानें वेधून गेलेलें मन अज्ञानामध्यें लय पावतें त्यालाच सुषुप्ति (झोंप) असें ह्मणतात. ४० दहाही इंद्रियें आणि अंतःकरण चतुष्टय ह्यांसहवर्तमान विपरीत ज्ञान हें अज्ञानामध्यें लीन होतें. तीच सुषुप्ती हें ध्यानांत ठेव. ४१ झोंपेंत असून झोंपेला —त्या नेणिवाला— तूं जागत असतोस. आणि जागृतीनंतर तें तूं

तत्साक्षित्वेंची ॥ ४२ ॥ ह्मणोनि सुपुप्ती ना तुज ॥ तियेतें जाणणें आपणया वेगळें बुझ ॥ अवस्थात्रय बुद्धीसी सहज ॥ तूं तया वेगळाची ॥ ४३ ॥ कारण देह सुपुप्त्यवस्था ॥ या दोहोंचा जो अभिमान धरिता ॥ तया प्राज्ञ अहंकरातें जाणता ॥ तो तूं वेगळाची ॥४४॥ प्राज्ञ आनंदभोग हृदय-स्थान ॥ याचें तुज आहे ज्ञान ॥ हे पंचविध तमोगुण ॥ तो तूं आत्मा कैसनी ॥ ४५ ॥ एवं स्थूल लिंग कारण यांतें ॥ जागृती स्वप्न सुपुप्ती अवस्थात्रयातें ॥ विश्व तैजस प्राज्ञ अ-भिमानत्रयातें ॥ जाणता आत्मा तूं ॥ ४६ ॥ स्थूल प्रविविक्त आनंद भोगत्रयातें ॥ नयन हृदय कंठ स्थानत्रयातें ॥ सत्व-

---

त्याच्या साक्षित्वानेंच सांगत असतोस. ४२ ह्मणून तुला सुपुप्ती नाहीं. तिला जाणणारा तूं स्वतः वेगळा आहेस, हें ध्यानांत आण. तिन्ही अवस्थांत बुद्धीला सहज–( इच्छाप्रमाणें करून ) आहेत. तूं त्यांहून वेगळाच आहेस.४३कारण देह सुपुप्तिदशा ह्या दोहोंचाही अभिमानी जो प्राज्ञ अहंकार त्यास जाणणारा तूं वेगळाच आहेस. ४४प्राज्ञ,आनंद भोग,व हृदयस्थान ह्याचें तुला ज्ञान आहे.हे पंचविध तमोगुण होत. तूं आत्मा तें कसें होशील. ४५ एवंच स्थूल, लिंग व कारण ह्या तिन्हा देहांना; जागृती, स्वप्न, व सुपुप्ति ह्या तिन्हीं अवस्थांना, विश्व, तैजस, आणि प्राज्ञ हे तीन जे अभिमानी त्यांना जाणणारा तूं आत्मा होस. ४६ स्थूल, प्रविविक्त, व आनंद ह्या तिन्ही भोगांना; नयन, हृदय, व कंठ ह्या तिन्ही स्थानांना;

रज तमो गुणत्रयातें ॥ जाणता आत्मा तूं ॥ ४७ ॥ अविद्येचिया गुणत्रयाचें ॥ दळवाडें निरूपिलें प्रपंचाचें ॥ तूं द्रष्टा अशेषाचें ॥ ह्मणूनि आश्रयसाक्षी ॥ ४८ ॥ अविद्येचिया गुणत्रयाची ॥ उभवणी उभवली प्रपंचाची ॥ हें नेणिजे तंव कांहींची ॥ संसृती न चुके ॥ ४९ ॥ आतां तुझें मलिनत्व फिटलें ॥ शुद्ध आत्मत्व लाधलें ॥ गुणत्रय बंधन चुकलें ॥ आश्रय साक्षीचें ॥५०॥ हें सर्व न होनी सर्वांतें ॥ निराकार निराभासातें जाणतें ॥ त्या निरालंबा आपणयातें ॥श्रीमुकुंद ह्मणे बुझलासि तूं ॥ ५१ ॥ इतिश्रीमद्विवेकसिंधौ संहारक्रमे गुरुशिष्यसंवादे कारणदेहनिरसनं नाम तृतीयप्रकरणं समाप्तं३

---

सत्व, रज, आणि तम ह्या आणि तिन्ही गुणांना जाणणारा तूंच आत्मा होस. ४७ अविद्येच्या तिन्ही गुणांचे—अर्थात् प्रपंचाचे समुदाय सांगितले, तूं ह्या सर्वांचा द्रष्टा आहेस. ह्मणून सर्वांचा आश्रय व साक्षी आहेस. ४८ अविद्येच्या तीन गुणांचीच प्रपंचाची उभारणी झाली. ह्याचें ज्ञान झालें नाहीं तोंपर्यंत संसार मुळींच सुटणें नाहीं. ४९ आतां तुझा मळ धुवून गेला; तुला शुद्ध आत्म्याचा लाभ झाला; आणि तूं जो आश्रय व साक्षी, त्याचें त्रिगुणात्मक बंधन नाश पावलें. ५० श्रीमुकुंदराज ह्मणतातः—अवघ्या निराकार निराभास स्वरूपाला हें कांहींच असत नाहीं. अशा त्या निरालंब ( सर्वतंत्रस्वतंत्र ) अशा आपणाला तूं जाणिलेंस. ५१

---

# प्रकरण चवथें.

विषयः—महाकारण देहनिरसन.

श्रीगणेशाय नमः ॥ मी निरामय निर्गुण ॥ रूपें साक्षी चैतन्यघन ॥ ऐसें स्वरूपाचें अनुसंधान ॥ तेंही तूं नव्हेसी ॥ १ ॥ तुज स्वरूपाचें अनुसंधान ॥ तो तुझा देह महाकारण ॥ तयाचा द्रष्टा कवण ॥ तुजवांचूनियां ॥२॥ तुझा देह महाकारण ॥ तेथें तुर्यावस्था ते जाण ॥ तियेचें सांगिजेल लक्षण ॥ तें एक पां तूं ॥ ३ ॥ त्रिविध देह त्रिविध अवस्था ॥ तिनी स्थानें त्रिविध भोग त्रिविध भोक्ता ॥ या प्रपंचाची तत्साक्षित्वें जाण अवस्था ॥ ते तुर्या जाणावी॥४॥ अविद्येचिया गुणत्रयातें ॥ तूं जाणतोसी निरुतें ॥ तये तत्सा-

श्रीगणेशाय नमः—मी निरामय (संसारव्याधिरहित), निर्गुण, साक्षीरूप, चैतन्यघन आहे. असें जें स्वरूपाचें अनुसंधान तेंही तूं नव्हेस. १ तुला स्वरूपाचें अनुसंधान तोच तुझा महाकारण देह होय. त्याचा द्रष्टा तरी तुझ्यावांचून कोण आहे? २ तुझ्या महाकारण देहाची अवस्था तुर्या होय. तिचें लक्षण सांगण्यांत येईल, तें तूं ऐक. ३ तीन देह, तीन अवस्था, तीन स्थानें, तीन भोग, व त्रिविध भोक्ते हा जो प्रपंच त्याच्या साक्षित्वाची अवस्था ती तुर्या समजावी. ४ अविद्येच्या तिन्ही गुणांना तूं निश्चयेंकरून

क्षित्व लक्षण तुर्येतें ॥ जाणता तूं तुर्या केवीं ॥ ५ ॥ महाकारण देह तुर्यावस्था ॥ या दोहोंचा अभिमानी प्रत्यगात्मा निरुता ॥ तेही सांगिजेल व्यवस्था ॥ ते ऐक तूं ॥ ६ ॥ अविद्यामय प्रपंच ॥ तो मिथ्या मी द्रष्टा साच ॥ ह्मणोनि प्रपंच नव्हे हा निर्वेच ॥ माझा मजची ॥ ७ ॥ जें नित्य निर्मळ ॥ परब्रह्म केवळ ॥ तें मी हे अभिमानी सकळ ॥ तो प्रत्यगात्मा ॥ ८ ॥ हा प्रत्यगात्मा अभिमानी ॥ तूं नव्हसी तुज दृश्य ह्मणूनी ॥ आनंदावभास भोग मूर्ध्नि स्थानीं ॥ नव्हसी तूं ॥ ९ ॥ जो शुद्ध सत्वगुण अविद्येचा ॥ हा पंचविध प्रपंच तमोगुणाचा ॥ तूं द्रष्टा या अशेषाचा ॥ स्वयंप्रकाश ॥ १० ॥

---

जाणतोस. तसाच त्या साक्षित्वलक्षणी तुर्येलाही तूंच जाणणारा आहेस. तेव्हां तूं तुर्या कसा होशील? ५ महाकारण देह व तुर्यावस्था या दोहोंचा अभिमानी खरोखर प्रत्यगात्मा होय. त्याचाही प्रकार सांगण्यांत येईल तो तूं ऐक. ६ अविद्यामय प्रपंच तो मिथ्या आहे, आणि मी खरोखर द्रष्टा आहें, ह्मणून प्रपंच हा माझा मलाच जमेस धरतां येत नाहीं. ७ नित्य आणि निर्मळ असें केवळ परब्रह्म तें मी हा सर्व अभिमान बाळगणारा तो प्रत्यगात्मा होय. ८ हा अभिमानी प्रत्यगात्मा तुला दृश्य आहे ह्मणून तो तूं नव्हेस. किंवा आनंदावभासभोग, तसेंच मूर्ध्निस्थान [ मस्तक ] ही तूं नव्हेस. ९ अविद्येचा शुद्ध सत्वगुण, हा तमोगुणाचा पंचविध प्रपंच ह्या सर्वांचा तूं द्रष्टा असून स्वयंप्रकाश आहेस. १० शुद्ध प्रपंचापासूनसुद्धां

शुद्धही प्रपंचापासाव ॥ वेगळा जालासी सर्वथैव ॥ निरालंब साक्षी स्वयमेव ॥ तोचि तूंपें ॥ ११ ॥ तूं निर्गुण निराकार॥ परब्रह्म निराधार ॥ जेथें नाहीं पारावार ॥ तें स्वरूप तूं ॥ १२ ॥ शून्यातें आत्मत्वें मानित ॥ उठिलें जें क्षपणकमत ॥ तें तुवां जिंकिलें निभ्रांत ॥ स्वानुभवेंची ॥ १३ ॥ अत्यंत जो अभाव ॥ तोचि शून्याचा स्वभाव ॥ म्हणोनि हें बोलणेंचि वाव ॥ खंडज्ञान ॥१४॥ कांहींच नाहीं तें शून्य ॥ तयातें जाणतें शुद्धचैतन्य ॥ तें सर्वकाळीं विद्यमान ॥ असतांचि असे ॥१५॥ शून्य नेणे शून्यातें ॥ आत्मा प्रकाशी तयातें ॥ जो देखे या अशेषातें ॥ तो शून्य कैसा गा ॥१६॥

तूं अगदीं वेगळा आहेस. शुद्ध निरालंब साक्षी तोच तूं आहेस. ११ निर्गुण, निराकार, निराधार ( अगदीं स्वतंत्र, आश्रयरहित ) असें परब्रह्म तूं होस. जें निःसीम स्वरूप तें तूं. १२ आत्मा म्हणजे शून्य असें मानणारें जें नास्तिक मत तें तूं स्वानुभवेंकरून निःसंशय जिंकलेंस. १३ अगदीं अभाव हें ( कांहींच नाहीं हें ) शून्याचें स्वरूप ( धर्म ) होय. म्हणून हें बोलणेंच व्यर्थ—खंडज्ञानापैकीं होय. १४ कांहींच नाहीं तें शून्य होय. त्याला शुद्ध चैतन्य जाणणारें असून तें सर्वकाळीं विद्यमान असतेंच असतें. १५ शून्य कांहीं शून्याला जाणत नाहीं. तर आत्मा हा त्याला प्रकाशणारा आहे. अरे! जो ह्या सर्वांना जाणणारा तो शून्य कसा होईल? १६ तो वरवर शून्यासारखा आहे खरा, परंतु

तो शून्यासारखें कीर असे ॥ परी शून्य नव्हे अनारिसें ॥ आपणपें आपण प्रकाशे ॥ स्वानुभवें ॥ १७ ॥ असो तनुचतुष्टया परी ॥ तूं सकळ जीवशरीरीं ॥ प्रकाशसी बाहेर भीतरीं ॥ देहचतुष्टयातें ॥१८॥ जीवाचें देहचतुष्टय ॥ द्रष्ट्यासी तुज ज्ञेय ॥ तूं शुद्धचैतन्य अप्रमेय ॥ तेंचि तूं केवीं होसी ॥ १९ ॥ जैशा तुझिया चारी अवस्था ॥ तयांची तूं जाणसी व्यवस्था ॥ तैसी सकळ जीवांचिया साम्यता ॥ जाणता आत्मा तूं ॥ २० ॥ तुझिया चौ अभिमानियांचे परी ॥ सकळ जीव अभिमानिया भीतरीं ॥ असूनि तत्त्वतां निर्धारीं॥ साक्षीभूत तूं ॥ २१ ॥ तुझिया अभिमानियांचें जैसें ॥ भोग चतुष्टय दृश्य ऐसें ॥ सकळ भोग जाणसी प्रकाशें ॥ आपु-

---

प्रक्षत्य शून्य कांहीं नव्हे. स्वानुभवानें आपणच आपणांस जाणणारा आहे. १७ असो. देहचतुष्टयाप्रमाणें तूं सर्व जीवांच्या शरीरांत वास करतोस, आणि चारी देहांच्या आंत व बाहेर प्रकाशतोस. १८ जीवांचें देहचतुष्टय तुला द्रष्ट्याला ज्ञेय–जाणण्यास योग्य–असें आहे. तूं तर अप्रमेय–अतर्क्य–शुद्धचैतन्य होस. तेव्हां तेंच (देहचतुष्टय) तूं कसें होशील ? १९ जशी तुझ्या चारी अवस्थांची व्यवस्था तूं जाणतोस. तशीच सर्व जीवांची साम्यस्थिति जाणणाराही तूंच आत्मा होस. २० तुझ्या चारी अभिमान्यांप्रमाणें सर्व जीवांच्या अभिमान्यांमध्यें तत्त्वतः तूं असून तूं निश्चयेंकरून साक्षीभूत आहेस. २१ तुझ्या अभिमान्यांचें भोगचतुष्टय जसें

लेनि पैं ॥ २२ ॥ जैशीं तुझिया अवस्थांचीं चारी स्थानें ॥ तूं जाणसी आपुलेनि ज्ञानें ॥ तैशीं सर्वा भूतांचीं स्थानमानें ॥ जाणता तूंचि एक ॥ २३ ॥ एवं सर्वभूतीं असूनी ॥ सकळ इंद्रियांतें अधिष्ठानी ॥ सर्वप्रकाशक आत्मा तुजवांचूनी ॥ कवण असे ॥२४॥ तंव विनवी शिष्यशिरोमणी ॥ सर्व आत्मा एक येथें उपपत्ति कवणी ॥ अन्याचें सुखदुःख अन्यीं ॥ देखूं येइजेना ॥ २५ ॥ मज सकल दृश्याचें साक्षित्व घडे ॥ भिन्नात्मयासी एकत्व न घडे ॥ जें अन्य स्थानींचा वृत्तांत जाणणें नाहीं फुडें ॥ ह्मणूनि स्वामी ॥ २६ ॥ मग श्रीगुरुनाथें

---

दृश्य आहे, त्याचप्रमाणें तूं आपल्या प्रकाशानें सर्व भोग जाणतोस. २२ ज्याप्रमाणें तुझ्या अवस्थांचीं चारी स्थानें तूं आपण ज्ञानानें जाणतोस, त्याचप्रमाणें सर्व भूतांचीं स्थानमानें (प्रमाणें) जाणणारा तूंच एक आहेस. २३ अशाप्रकारें सर्व भूतांमध्यें असून सर्व इंद्रियांना आश्रयभूत, सर्वप्रकाशक आत्मा जो तूं त्या तुझ्यावांचून दुसरा कोण आहे? २४ तेव्हां शिष्यशिरोमणि विनंति करूं लागले कीं सर्व आत्मा एक त्याविषयीं उपपत्ति काय? कारण इतरांचें सुख व दुःख कांहीं दुसऱ्याला कळत नाहीं. २५ मला सर्व दृश्याचें साक्षित्व घडतें ही गोष्ट खरी, परंतु भिन्न भिन्न आत्म्याशीं एकपण कांहीं होत नाहीं. कारण, महाराज! दुसऱ्याच्या ठिकाणीं काय विचार आहेत ते तर मला उघड उघड कळत नाहींत ह्मणून ह्मणतों. २६ तेव्हां श्रीगुरुनाथ ह्मणाले:--आकाश हें

बोलिजे ॥ अभिन्न आत्मया अनेकत्व आरोपिजे ॥ एक मुख्य गगन असिजे ॥ जेवीं अनेक घटीं ॥ २७ ॥ नातरी मुख्य एकचि सविता ॥ अनेक सरोवरीं प्रतिबिंबतां ॥ एकचि पावे अनेकता ॥ उपाधिभेदें ॥ २८ ॥ ते प्रतिबिंब दिनमणी अनेक ॥ जलचांचल्यें व्याकुळ कवण एक ॥ तयामध्यें निश्चल परी भिन्नात्मक ॥ नव्हती तत्त्वतां पैं ॥ २९ ॥ मुख्यबिंबीं चांचल्य असतें ॥ तरी सकळ प्रतिबिंबीं उमटतें ॥ ह्मणूनि उपाधिभेदें नाहीं तें ॥ आरोपिती प्रतिबिंबीं ॥ ३० ॥ तैसा एकचि गोसावी ॥ अविद्या लक्षणें माया अवयवी ॥

---

मुख्य एक असून अनेक घटांमुळें त्याला जसें अनेकत्व येतें तसेंच आत्म्याच्या ठायीं भिन्नता नसून त्यावर अनेकत्वाचा आरोप आलेला आहे. २७ किंवा मुख्य एकच सूर्य असून अनेक सरोवरांमध्यें त्याचीं प्रतिबिंबें पडलीं ह्मणजे उपाधिभेदानें एकाचींच अनेक होतात. २८ ते प्रतिबिंब सूर्य अनेक असतात. त्यांतील कांहीं पाण्याच्या हलण्यानें चंचल होतात. त्यामध्यें तत्त्वतः पाहूं गेलें तर निश्चल परंतु भिन्न भिन्न असे सुद्धां नसतात. २९ मुख्य बिंबांत जर चंचलपणा असता तर तो सर्व प्रतिबिंबांत उमटला असता. ह्मणून तो उपाधिभेदानें कांहीं तेथें नाहीं. तर त्याचा आरोप प्रतिबिंबाच्या ठिकाणीं आहे. ३० त्याचप्रमाणें हा एकच [ सर्व इंद्रियांचा स्वामी ] आत्मा अविद्यारूप मायेचे अवयव धारणकर्ता होऊन

आभासलेपणें जीवात्मभावीं ॥ दिसे अनेक रूपत्वें ॥३१॥ कर्मनिर्मित सुखदुःख ॥ हें लिंगदेहाचें वर्म देख ॥ लिंगोपाधि चैतन्यीं नाहीं ते असेख ॥ तया आरोपिती पैं ॥३२॥ जया जीवांचीं लिंगशरीरें ॥ कर्में अर्जित स्थूलदेहद्वारें ॥ तीं तदुपाधि जीव भोगिती निर्धारें ॥ सुखदुःखें पैं ॥३३॥ ह्मणूनि अन्याचें सुखदुःख॥ अन्यासि नाहीं निःशेष॥ तया बंध मोक्ष देख ॥ स्वार्जितानुसार ॥३४॥ आणि तुवां आक्षेप केला ॥ सर्वभूतीं असे एकला ॥ तरी अन्यस्थानीं वृत्तांत वितला ॥ तो म्यां कां नेणिजे ॥ ३५ ॥ तरी येविषयीं ऐक उत्तर ॥ करूनि मन एकाग्र ॥ संदेहसागराचा पार ॥ जेणें पाविजे

---

भासमात्रेंकरून जीवात्मभावांत अनेक रूपांनीं दिसतो. ३१ सुख व दुःख हें कर्मनिर्मित असतें. व तेच लिंगदेहाचें वर्म होय. ही लिंगोपाधि चैतन्याच्या ठिकाणीं मुळींच नाहीं. पण त्यावर आरोप मात्र करतात. ३२ ज्या जीवांचे, लिंगदेह, स्थूलदेहाच्या द्वारें कर्मांचा संचय करून ठेवतात, त्या त्यांच्या उपाधीनें जीव सुखदुःखें भोगीत असतात. ३३ ह्मणून इतराचें सुखदुख दुसऱ्याच्या गांवींही नसतें. त्यांना बंधन किंवा मोक्ष स्वार्जिताप्रमाणें केलेल्या कर्मसंचिताप्रमाणें असतो समजलास? ३४ आतां तूं आक्षेप काढिलास कीं, एकच सर्व भूतांमध्यें व्यापलेला असून दुसऱ्या ठिकाणीं काय गोष्ट चालली आहे तें मला कां कळूं नये? ३५ तर त्यांवर एक उत्तर आहे तेणेंकरून मन एकाग्र करावें आणि संशयसमुद्र

॥ ३६ ॥ जाणिव नेणिव चित्तासी ॥ हे धर्म नाहींत आत्म-यासी ॥ बुद्ध्यादि नव गुण लिंगदेहासी ॥ हें तंव आधींच निरूपळें ॥ ३७ ॥ प्रतिजीवीं अविद्या तंव भिन्न ॥ तत्कार्य लिंगदेहही अन्य ॥ स्थूलदेहीं अभिमान ॥ आन आन प्रति-शरीरीं ॥ ३८ ॥ ह्मणूनि जे अवस्थे जो अभिमानी ॥ तो वर्ते तिये अधिष्ठुनी ॥ तये दशेचें जाणणें ह्मणूनी ॥ असे तदुपाधिक ॥ ३९॥ ह्मणूनि जागृती दशेचें ज्ञान ॥ नाहीं प्र-गटलिया स्वप्न ॥ हें द्विविध अनुसंधान ॥ नाहीं सुषुप्तिकाळीं ॥ ४० ॥ ह्मणूनि अन्य चित्ताचें जाणणें ॥ अन्य चित्त प्र-यासें नेणे ॥ जाणूं पाहसी चित्तें येणें ॥ तरी सर्वज्ञ केवीं

---

ओलांडून जावें. ३६ जाणिव नेणिव हें चित्ताला आहे; ते धर्म आत्म्याला नाहींत. बुद्धि आदिकरून नऊ गुण लिंगदेहाला आहेत हें तर पूर्वींच सांगितलें आहे. ३७ प्रत्येक जीवामध्यें अविद्या ही तर भिन्न भिन्न असते. बरें तिचें कार्य लिंगदेह तोही निरनिराळा असतो. स्थूल देहामध्यें प्रत्येक शरीरांत पाहूं गेलें तर एकाचा एक तर दुसऱ्याचा दुसराच अभिमान असतो. ३८ ह्मणून ज्या अवस्थेचा जो अभिमानी असतो, तो त्या अधिष्ठानाच्या ठिकाणीं वर्तत असतो. ह्मणून त्या अवस्थेचें ज्ञान त्याच्या उपाधीनेंच वेष्टिलेलें असतें. ३९ ह्मणून जा-गृतावस्थेचें ज्ञान स्वप्न पडल्यावर नाहीं. हें दोन्हीप्रकारचें अनुसंधान [ ज्ञान ] झोपेमध्यें नाहीं. ४० ह्मणून इतरांच्या चित्तांतलें जाणणें, प्रयत्न केला तरी दुसऱ्याच्या चित्ताला होत नाहीं. आतां तूं जर ह्या

होसी ॥४१॥ अतीत अनागत वर्तमान ॥ हें तापसांसी उठे प्रपंचज्ञान ॥ जें तपोबळें जाण ॥ परी नव्हे भवमोचक ॥४२॥ परी तयाचें चित्त अनुक्रमें जाणणें ॥ तैसें तुझें नव्हे इंद्रियसाक्षेप देखणें ॥ सर्वत्र असूनि सर्वांतें प्रकाशणें ॥ निजप्रकाशें ॥ ४३ ॥ जयासी इंद्रियसाक्षेप ज्ञान ॥ तयासी अनुक्रमें ज्ञान कीं अज्ञान ॥ नातरी अन्यथाज्ञान ॥ उठे भ्रांतरूपें ॥ ४४ ॥ तैसें नव्हे आत्मयाचें द्रष्टेपण ॥ तेथें नलगे मन चक्षुरादि साधन ॥ तयास चेतनपण ॥ तत्सान्निधानमात्रें॥४५॥ आत्मयासी नलगे अनुक्रमें अदेखणें ॥ न देखणें आणि

---

चित्तानें जाणावयाचा प्रयत्न करूं लागलास तर तूं सर्वज्ञ कसा होशील? ४१ भूत, भविष्य, वर्तमान हें प्राणपंचिक ज्ञान तापसांना होत असतें, पण तें फक्त तपांच्या बळानें हें मात्र ध्यानांत ठेव. परंतु तें संसारांतून सोडविणारें ज्ञान मात्र नव्हे. ४२ परंतु त्याचें अनुक्रमानें चित्त जाणणें असतें तशांतलें मात्र तुझें इंद्रियांचें सापेक्ष पाहणें नव्हे. तूं सर्व ठिकाणीं असून आपल्या प्रकाशानें तूं सर्वांना प्रकाशणारा आहेस. ४३ ज्याला इंद्रियांचें सापेक्ष ज्ञान असतें, त्यांच्या ठायीं अनुक्रमानें ज्ञान किंवा अज्ञान नाहींतर विपरीत ज्ञान भ्रांतिरूपानें प्रगट झालेलें असतें. ४४ आत्म्याचें द्रष्टेपण हें तशांतलें नाहीं. तेथें मन, चक्षु, आदिकरून इंद्रियसाधनांची गरजच नसते. त्याच्या सान्निध्यानें त्यांस चेतना प्राप्त होते. ४५ आत्म्याला अनुक्रमानें जाणणें, न जाणणें, व भासवत्

अन्यथाही देखणें ॥ या चित्तधर्मातें सर्वज्ञपणें ॥ जाणता आत्मा तूं ॥ ४६ ॥ अहंता ममता प्रयत्नरहिता ॥ सूर्य डोळ्यांतें प्रकाशविता ॥ सकळ रूपांतें असे दाविता ॥ निजप्रकाशें ॥ ४७ ॥ तैसा तूं आत्मा सर्व इंद्रियांतें ॥ चैतन्य प्रकाशी विषयांतें ॥ अहंता ममता भावरहितें ॥ स्वस्वरूपें करूनी ॥ ४८ ॥ जैसा कांत अवच्छिन्न ॥ जड लोहातें अचेष्टून ॥ स्वयें चेष्टे ना चेष्टून ॥ अलिप्तचि तो ॥ ४९ ॥ तैसा आत्मा चेष्टे ना चेष्टवी ॥ कांहीं करी ना करवी ॥ स्वयें भोगी ना भोगवी ॥ विषयजात ॥ ५० ॥ परी तुझेचि या सत्तें ॥ इंद्रियें चेष्टती निभ्रांतें ॥ परी स्वतंत्र नव्हती तें ॥

---

जाणणें ह्या तिहींचीही गरज नसते.हे चित्तधर्म होत. ह्यांना सर्वज्ञपणानें जाणणारा तूं आत्मा होस. ४६ अहंता, ममता, व प्रयत्न यांविरहित जो सूर्य तो डोळ्यांना प्रकाश देणारा व आपल्या प्रकाशानें सर्व रूपें दाखविणारा आहेस. ४७ तसाच तूं आत्मा अहंता, ममता व भावरहित अशा निजस्वरूपाच्या योगानें सर्व इंद्रियांना, चैतन्याला व विषयालांही प्रकाशविणारा आहेस. ४८ जसा लोहचुंबक स्वतः न हालतां जड लोहाला मात्र चलनवलन देतो. बाकी तो अलिप्तच असतो. ४९ तसाच आत्मा हाही हालत नाहीं व चाळणाही देत नाहीं; कांहीं करीत नाहीं, व करवीतही नाहीं, विषयजातास भोगीतही नाहीं व भोगवीतही नाहीं ५० परंतु तुझ्याच सत्तेनें इंद्रियें निःसंशय हालूं चालूं लागतात.

**निजव्यापारीं ॥५१॥ कार्य कारण कर्तृत्व ॥ तेथें विषयप्रकृति हेतुत्व ॥ तुज सुखदुःखादि भोक्तृत्व ॥ तें प्रकृतिसंबंधें ॥५२॥ तूं सर्वोपाधिविनिर्मुक्त ॥ केवळ चैतन्य परमतत्त्व ॥ तुज सुख-दुःखादि भोक्तृत्व ॥ नाहीं सर्वथा ॥ ५३ ॥ परी तुझिया सत्तेविण ॥ नघडे इंद्रियांचें चेष्टन ॥ ह्मणूनि नाथिलें द्रष्टे-पण ॥ तुज आरोपिलें ॥ ५४ ॥ जंव होय दृश्याचें स्फुरण ॥ तंव तुज नाथिलें आरोपिलें द्रष्टेपण ॥ दृश्यनिरासीं परम निर्वाण ॥ तूं शुद्ध बुद्ध ॥५५॥ तूं दृश्य ना दर्शन ॥ तत्त्वतः नाहीं द्रष्टेपण ॥ तूं सत्ता मात्र निरंजन ॥ ज्ञप्तिरूप ॥ ५६ ॥**

---

परंतु तीं आपआपल्या व्यापारांत स्वतंत्र मात्र असत नाहींत. ५१ मूळ कार्यकारणांचें कर्तृत्व ( संबंध ) असून तेथें प्रकृतीचा हेतु विषय होय. तुला सुखदुःखादि जें भोगावें लागतें तें प्रकृतीच्याच संबंधानें. ५२ तूं सर्व उपाधींपासून मुक्त, केवळ चैतन्य—परमतत्त्व आहेस. तुला सुखदुःखादि भोक्तृत्व मुळींच नाहीं. ५३ परंतु तुझ्या सत्ते-शिवाय इंद्रियव्यापार नाहींत. ह्मणून नसताच द्रष्टेपणाचा तुजवर आरोप केलेला आहे. ५४ जोंपर्यंत दृश्याचें स्फुरण आहे, तोंप-र्यंतच तुला हा नसताच द्रष्टेपणाचा आरोप आहे. ह्या दृश्याचा लय झाला कीं, तूं शुद्ध बुद्ध व परम निर्वाण आहेसच. ५५ तूं दृश्य नव्हेस दर्शनही नव्हेस. तुला तत्त्वतः पाहूं गेलें तर द्रष्टे-पणाही नाहीं. तूं केवळ सत्तामात्र, निरंजन, ज्ञप्तिरूप आहेस. ५६

आतां असो हा युक्तिपंथ ॥ सकळ जीव त्वंपदार्थ ॥ शोधि-लिया उरे परमार्थ ॥ तो स्वयें साक्षी तूं ॥ ५७ ॥ एवं त्वंप-दार्थाचें शोधन॥ जेणें होय जीवत्व निरसन ॥ प्रकटे सम्यक् आत्मज्ञान ॥ अपरोक्ष जें ॥५८॥ धुळीमाजील सोनें जैसें ॥ भेसळलें न दिसे ॥ तें निवडूं जाणे जैसें ॥ झारियाचि पैं ॥ ॥५९॥ तेवीं दृश्य धुळीतें सांडी ॥ प्रकाशवंत सोनें निवडी ॥ यांची परी परवडी ॥ बुझावें स्वस्वरूप ॥६०॥ या परी विवे-कजळीं ॥ धुवूनि देहादि प्रपंच धुळी ॥ स्वयंप्रकाश झळाळी ॥ भेटे आत्महेम ॥ ६१ ॥ फेडून केळयाची सालडी ॥ भोगिजे

---

असो. आतां हा युक्तिवाद पुरे. सर्व जीव हें त्वंपदार्थ आहेत. त्यांचें शोधन केलें म्हणजे परमार्थच तळाशीं राहतो. आणि तोच तूं निजसाक्षी होस. ५७ एवंच त्वंपदार्थाचें शोधन तें हें कीं, जेणेंकरून जीवपणाचा लय होतो, आणि सम्यक् आत्म-ज्ञान म्हणजे अपरोक्ष—परब्रह्म तेंच प्रकट होतें. ५८ जसें मातीं-तल्या सोन्यामध्यें भेसळ झालेली दिसत नाहीं खरी, परंतु झाऱ्या असतो तोच त्यांतलें सोनें निवडण्याचें काम करूं शकतो. ५९ त्याचप्रमाणें ह्या दृश्य मातीला टाकून सोज्ज्वळ असें सोनें पारखून घे. अशाच प्रकारें परिपूर्ण स्वस्वरूप ध्यानीं आण. ६० येणें-प्रमाणें विवेकरूप पाण्यानें देहादि प्रपंचाची माती धुवून टाकली म्हणजे सोज्ज्वल स्वयंप्रकाश आत्मरूप सोनें हातास लागतें. ६१

केवळ रसगोडी ॥ तेवीं मायीक कंचुकी निवडी ॥ म्हणे मुकुंदराज मुनि ॥६२॥ इति श्रीमद्विवेकसिंधौ संहारक्रमे गुरुशिष्यसंवादे महाकारण देहनिरसनं नाम चतुर्थप्रकरणं समाप्तं ॥४॥

---

मुकुंदराज मुनि म्हणतातः—केळीची साल काढून टाकून केवळ आंतल्या रसाळ गिराची गोडी चाखावी, त्याचप्रमाणें हें मायेचेंही कवच काढून टाकावें ( वा अपार आत्मानंद सुख भोगावें. ) ६२

---

# प्रकरण पांचवें.

विषयः—ईश्वरतनुत्रय पूर्वक निरसन.

॥ श्रीगणेशाय नमः ॥ आतां असो हा युक्तिवादु ॥ जंव स्फुरे ईश्वरेंसी भेदु ॥ तंव न सुटे हा संबंधु ॥ मिथ्या द्वैताचा ॥ १ ॥ म्हणूनि तत्पदार्थाचें शोधन ॥ सांगिजेल कीजे अवधान ॥ जेथें भेटे आनंदघन ॥ केवळब्रह्म ॥ २ ॥ जीवात्मयाचे परी ॥ तनुचतुष्टय असे ईश्वरीं ॥ होय तयाच्या उपसंहारीं ॥ तत्पदार्थशोधन ॥ ३ ॥ तामस अहंकारजनितें ॥ पंचीकृत पंच महाभूतें ॥ तज्जनित ब्रह्मांड तें ॥ तो परमात्मा कैसेनी ॥ ४ ॥ ब्रह्मांड स्थूल शरीर ॥ पूर्वीं

---

श्रीगणेशाय नमः—असो. आतां युक्तिवाद राहूं दे. जोंपर्यंत ईश्वराच्या ठिकाणीं भेद आहे तोंपर्यंत हा मिथ्या द्वैताचा संबंध कांहीं चुकावयाचा नाहीं १ ह्मणून आतां तत्पदार्थाचें शोधन सांगण्यांत येईल, तिकडे लक्ष द्यावें. तेथें आनंदघन केवळ ब्रह्माचीच भेट होईल. २ जीवात्म्याप्रमाणेंच ईश्वरालाही तनुचतुष्टय—चार देह—आहेत. त्यांचा संहार झाला कीं, तत्पदार्थाचें शोधन होतें. ३ पंचीकृत पंचमहाभूतें हीं तामस अहंकारापासून जन्मलेलीं आहेत. आणि त्यांच्यापासून हें ब्रह्मांड झालेलें आहे. तेव्हां तो परमात्मा कसा होईल ? ४ ब्रह्मांड हें स्थूल शरीर होय, हें मागें

निरूपिलें सविस्तर ॥ तें दृश्य सविकार ॥ ईश्वर कैसेनी ॥ ५ ॥ ब्रह्मांडींची सृष्टि अवस्था ॥ तो परमात्मा नव्हे सर्वथा ॥ जाणे तेथींची व्यवस्था ॥ तो परमात्मा पैं ॥ ६ ॥ अभिमानी तो ब्रह्मांडींचा ॥ आणि सृष्टि अवस्थेचा ॥ ब्रह्मा निर्मिता विश्वाचा ॥ नोहे परमात्मा ॥ ७ ॥ ब्रह्मा राजस अहंकार ॥ ह्मणूनि नव्हे सर्वेश्वर ॥ तो चालवी सृष्टिव्यापार ॥ पराधीनपणें ॥ ८ ॥ या पंचीकृत पंच भूतांचें ॥ सूक्ष्म देह ईश्वराचें ॥ परमात्मा नव्हे साचें ॥ दृश्य म्हणूनी ॥ ९ ॥ विष्णु अंतःकरण ॥ चंद्रमा तो मन ॥ चित्त नारायण ॥ ईश्वराचें ॥ १० ॥ बुद्धि विरंची ॥ अहंता रुद्र

---

सविस्तर सांगितलेलेंच आहे. तें दृश्य असून त्यास विकार आहे. तेव्हां तें ईश्वर कसें होईल ? ५ सृष्टि ही ब्रह्मांडाची अवस्था होय. तो तर परमात्मा मुळींच नव्हे. तर तेथची व्यवस्था जो जाणतो तो परमात्मा होय. ६ ब्रह्मांड आणि सृष्टि अवस्था त्यांचा अभिमानी विश्व निर्माण करणारा ब्रह्मा होय. तो तर परमात्मा नव्हेच. ७ ब्रह्मा हा राजस अहंकार होय. म्हणून तो सर्वेश्वर नव्हे. तो परतंत्रतेनें सृष्टीचे व्यापार चालवितो. ८ ईश्वराचा सूक्ष्म देह ह्या पंचीकृत पंचमहाभूतांचा आहे. तो दृश्य आहे ह्मणून तो कांहीं खरोखर परमात्मा नव्हे. ९ विष्णु तें ईश्वराचें अंतःकरण, चंद्रमा तें मन, आणि नारायण तें चित्त होय. १० ब्रह्मदेव ती बुद्धि, रुद्र तो खरोखर अहंकार, आणि ह्यांचीं स्वरूपें जाणणारा

साची ॥ जाणे स्वरूपें यांचीं ॥ तो परमात्मा ॥ ११ ॥ श्रोत्र दिशा त्वचा पवन ॥ चक्षु सूर्य जिव्हा वरुण ॥ घ्राण अश्विनौ देव हा इंद्रियगण ॥ ईश्वर नव्हे ॥ १२ ॥ वाचा वन्हि पाणि सुरेशू ॥ पाद वामन शिश्न प्रजेशू ॥ पायु निर्ऋति हे परेशू ॥ केवीं घडे ॥१३॥ व्यान समान उदान ॥ प्राण आणि अपान ॥ परमात्मा या विलक्षण ॥ द्रष्टा ह्मणूनी ॥ १४ ॥ लिंग देहाचे पंच विषय ॥ अतिजड भूतमय ॥ परमात्मा तो निर्विषय ॥ परमतत्त्व पैं ॥ १५ ॥ एवंतत्वें पंचवीस ॥ त्रिविध अहंकाराचे अंश ॥ ती अहंकृति साभास ॥ नव्हे परमात्मा ॥१६॥ आतां असो हा लिंग देह ॥ नव्हे स्व-

---

तो परमात्मा होय. ११ दिशा हें श्रोत्र, वायु ही त्वचा, सूर्य हा डोळा, वरुण ही जिव्हा, व अश्विनौ देव हे घ्राण. हा इंद्रियसमुदाय कांहीं ईश्वर नव्हे. १२ अग्नि ही वाचा, सुरेश तो हस्त, वामन तो पाद, प्रजापति तें शिश्न, पायु ( गुद ) ते नैर्ऋति होत. हे परमात्मा कसे होतील ? १३ व्यान, समान, उदान, प्राण व अपान ह्यांहून परमात्मा भिन्न आहे. कारण तो द्रष्टा आहे म्हणून. १४ लिंग देहाचे पंचविषय अतिशय जड भूतात्मक आहेत.परमात्मा तर निर्विषय परमतत्त्व आहे. १५ अशा प्रकारें पंचवीस तत्त्वें हीं त्रिविध अहंकाराचे अंश होत. आणि तो अहंकार तर साभास आहे. तो परमात्मा नव्हे. १६ असो. आतां हा लिंगदेह राहू दे. पण तसाच हा देह हेंही स्वस्वरूप नव्हे.

स्वरूप तें विदेह॥तेथें स्थिति अवस्था निःसंदेह॥नव्हे परमात्मा ॥१७॥सूक्ष्म देह स्थिति अवस्था॥विष्णु अभिमानी येथें सर्वथा॥ तो परमात्मा हे कथा ॥ असंबद्ध पैं ॥ १८ ॥ विष्णु सात्विक अहंकार ॥ वरी रूपाचा आकार ॥ चालवी स्थितीचा व्यापार ॥ पराधीनपणें ॥ १९ ॥ विष्णु तो अंतःकरण ॥ वैकुंठ तयाचें स्थान ॥ परमात्मा तो पूर्ण ॥ चैतन्य शुद्ध ॥ २० ॥ विष्णु करी स्थिति व्यापारू ॥ सृष्टि संस्थापी अनिवारू ॥ परमात्मा तो निर्विकारू ॥ विष्णु हें न घडे ॥२१॥ माया कारण शरीर ॥ ईश्वर नव्हे तो सविचार ॥ तो द्रष्टा हे सविकार ॥ ह्मणूनि पैं ॥२२॥ जियेचा महत्तत्व अहंकार ॥

---

तेथली स्थिति किंवा अवस्था तोही निःसंशय परमात्मा हें नव्हे. १७ सूक्ष्म देहाची जी अवस्था, तेथचा अभिमानी विष्णु हा होय. तोच परमात्मा हें भाषण अगदीं असंबद्ध होय. १८ विष्णु हा सात्विक अहंकार होय. तो सगुणरूप धारण करतो व परतंत्रपणानें अवस्था कर्मे चालवितो. १९ विष्णु तो अंतःकरण व वैकुंठ हें त्याचें स्थान होय. परमात्मा तर पूर्ण व शुद्ध चैतन्य होय. २० विष्णु हा अवस्था कर्में करून अकटोविकट सृष्टीची स्थापना करतो. परमात्मा तर निर्विकार आहे. तव्हां तो विष्णु हें कसें होईल ? २१ माया ही कारण शरीर होय. ईश्वर हा विचाराच्या अतीत आहे. कारण तो द्रष्टा व ही विकारयुक्त आहे. २२ जिच्या मुख्य अहंकारापासून ब्रह्मा, विष्णु

व्याली ब्रह्मा विष्णु महेश्वर ॥ ते माया सर्वेश्वर ॥ हें न घडे पैं ॥ २३ ॥ मी ब्रह्म येणें आकारें ॥ अभिमानवृत्ति स्फुरे ॥ ते अव्याकृत ईश्वर केवीं घडे ॥ २४ ॥ कारण देह अव्याकृत ॥ प्रलय अवस्था वर्ते तेथ ॥ परमात्मयासी निश्चित ॥ तें नाहींच पैं ॥२५॥ अव्याकृत प्रळयाचा ॥ रुद्र अभिमानी तेथींचा ॥ तो परमात्मा हे चर्चा ॥ अघटमान ॥ २६ ॥ रुद्र अहंकार तामस ॥ अंतीं जगाचा करी नाश ॥ तो परमात्मा उदास ॥ निरभिमानी ॥ २७ ॥ रुद्र तयाचा व्यापारी ॥ योजिला असे संहारीं ॥ सृष्टि स्थितीचा निर्धारी ॥ तो स्वतंत्र नव्हे ॥ २८ ॥ तो परमात्मा मायावी ॥ हरिहरब्रह्मादि-

व शंकर झाले ती माया सर्वेश्वर कधींच होणार नाहीं. २३ मी ब्रह्म ह्या भावनेनें अभिमानवृत्ति स्फुरण पावते, ती अव्याकृत कारण शरीरयुक्त असते. ती ईश्वर कशी होईल ? २४ कारण देह हा अव्याकृत—असून तेथें प्रळय ही अवस्था असते. परमात्म्याला खरोखर त्यांपैकीं कांहींच नसतें. २५ अव्याकृत प्रळय जो आहे, तेथचा अभिमानी रुद्र होय. तो परमात्मा ही गोष्ट कधींच होणें नाहीं. रुद्र हा तामस अहंकार होय. तो शेवटीं जगाचा नाश करीत असतो. परमात्मा तर अगदीं तटस्थ—निरभिमानी आहे. २७ रुद्राचा व्यापार तोच. त्याची संहाराच्या कामींच योजना केलेली आहे. सृष्टि स्थितीचा निश्चय पाहिला असतां तो कांहीं स्वतंत्र नव्हे. २८ तो मायावी परमात्मा हरिहरब्रह्मा-

कांचा गोसावी ॥ माया गुणत्रयाचे नांवीं ॥ केवीं बोलावा तो ॥ २९ ॥ तंव शिष्य बोले वचन ॥ जी मी नेणें प्रळयाचें लक्षण ॥ तेथींचें विशद ज्ञान ॥ मज निरूपावें ॥ ३० ॥ मग बोले कृपासिंधु ॥ सद्गुरु पूर्ण बोधु ॥ प्रळय तो पंचविधु ॥ असे जाण तूं ॥ ३१ ॥ द्विविध होय पिंडीं ॥ द्विविध तो ब्रह्मांडीं ॥ पांचव्याची फुडाफुडी ॥ होय मोक्षदशे॥३२॥ प्रतिदिनीं होय दैनंदिन ॥ जो जाण सुषुप्तिकाळीं लीन ॥ देहद्वय संहारे ह्मणऊन ॥ तो प्रळय ह्मणिजे ॥ ३३ ॥ स्थूल देहाचें मरण ॥ तो महाप्रळय जाण ॥ हें प्रळयद्वयाचें लक्षण॥ पिंडीं जाणावें ॥ ३४ ॥ चतुर्युग सहस्त्रेषु ॥ तो ब्रह्मयाचा

---

दिक्कांचा स्वामी होय. तेथें मायेच्या त्रिगुणांचें नांवच काढूं नये. २९ तेव्हां शिष्य म्हणाला:—महाराज ! मला प्रळयाचें लक्षण ठाऊक नाहीं. त्याचें स्पष्टज्ञान मला कथन करावें. ३० नंतर कृपासागर पूर्णबोध सद्गुरु म्हणाले:–प्रळय तो पांच प्रकारचा आहे, असें तूं समज. ३१ पिंडामध्यें दोन प्रकारचा, ब्रह्मांडांत दोन प्रकारचा, आणि पांचवा तो खरोखरी मोक्षाच्या वेळेस असतो. ३२ रोजच्या रोज होणारा नेहमींचा प्रळय म्हणजे निद्रेमध्यें लीन झाल्यावर होणारा. येथें दोन देहांचा संहार होतो म्हणून तो प्रळय होय. ३३ जड देहाचें मरण तो महाप्रळय समजावा. हें पिंडामधील दोन प्रळयांचें लक्षण ओळखावें. ३४ चार हजार युगांचा एक दिवस ब्रह्मदेवाचा होत असतो. तेथें रात्रही त्याच प्रमाणाची असावयाची हें ध्यानांत असूं दे.

एक दिवसु ॥ तेथेंचि रात्रीही जाणजसु ॥ तेणेंचि मानें॥३५॥ जो ब्रह्मयाचा दिनांत ॥ तो दैनंदिन कल्पांत ॥ तैं ब्राह्मी मायेसी आंत ॥ संहारे लोकत्रय ॥ ३६ ॥ तैं द्वादशार्क तपती ॥ महामेघ वर्षती ॥ तिन्ही लोक अल्पावती ॥ प्रलयोदकीं ॥३७॥ परी स्थूलदेह निमाला ॥ लिंगदेह कीर उरला ॥ तोही बुडाला ॥ अज्ञानसमुद्रीं ॥ ३८ ॥ जीव सुषुप्ति यापरी॥ दैनंदिन संहारी ॥ तैं लीन होती कारण शरीरीं ॥ निजकर्मेंसहित ॥ ३९ ॥ दैनंदिन प्रळयकाळीं ॥ ब्राह्मी माया मांदुस जळीं ॥ जेथें जीवरत्नें सांठवलीं ॥ चौं भूतग्रामींचीं ॥ ४० ॥ यापरी रात्रीचिया ॥ सहस्रयुग चौकडिया ॥ समाधिमार्जी

---

३५ ब्रह्मदेवाच्या दिवसाचा शेवट तो दैनंदिन कल्पांत होय. त्या ब्राह्मीमायेच्या आंत त्यावेळीं तिन्ही लोकांचा संहार उडतो. ३६ तेव्हां बाराही सूर्य तपूं लागतात; महामेघ ( प्रळयकाळचे मेघ ) वर्षाव करूं लागतात; तिन्ही लोक त्या प्रळयकाळच्या पुरामध्यें पार बुडून जातात. ३७ जडदेह नाहींसा झाला, तरी खरोखर लिंगदेह बाकी राहतोच. तोही अज्ञानसमुद्रामध्यें बुडून जातो. ३८ सुषुप्ती ही ह्याप्रमाणें रोजच्या रोज जिवांचा संहार करते. तेव्हां ते आपआपल्या कर्मासहवर्तमान कारण शरीरांत लीन होतात. ३९ ह्या रोजच्या रोज होणाऱ्या प्रळयकाळामध्यें ब्राह्मी माया ही त्या प्रळयकाळच्या पाण्यांत ठेवलेली जवाहिराची पेटी होय. त्यामध्यें चारही भूतसमुदायांचीं जीवरूप रत्नें सांठवून ठेवलेलीं असतात. ४० त्याप्रमाणें हजार चौकड्या युगांची रात्र ब्रह्मदेवाची समाधी-

गेलिया ॥ चतुराननासी ॥ ४१ ॥ मग समाधी विसर्जूनी ॥ प्रलयोदकातें ग्रासुनी ॥ चौ भूतग्रामींची उभवणी ॥ ब्रह्मा रचिता झाला ॥ ४२ ॥ जयाचा आरंभ जैसा ॥ तो जीव सृजिला तैसा ॥ दैनंदिन प्रळय ऐसा ॥ तुज निरूपिला॥४३॥ महाप्रळयतो ऐक ॥ तुज सांगिजेल कौतुक ॥ तेथें संहारती ब्रह्मादिक ॥ ब्रह्मांडासहित ॥ ४४ ॥ शतवर्षे अनावृष्टी ॥ तेथें संहारे जीवसृष्टी ॥ तयाची परिपाठी ॥ तपती द्वादशादित्य ॥ ४५ ॥ तया शेषाचे मुखानळें ॥ पेटती सप्तही पाताळें ॥ द्वादशार्कांचेनि तेजाळें ॥ जळती लोक समस्त ॥ ४६ ॥ मग शतभरी संवत्सर ॥ संवर्तकादि जळधर ॥ वर्षती निरंतर ॥

---

मध्यें गेल्यावर समाधि उतरून प्रळयकाळच्या आलेल्या पाण्याचा ग्रास करून चारी भूतसमुदायांची उभारणी ब्रह्मा ( फिरून ) करिता झाला. ४१।४२ ज्याचा ज्याचा जसा जसा आरंभ होता, तो तो जीव तसा तसाच निर्माण केला. अशा प्रकारें हा दैनदिन प्रळय तुला कथन केला. ४३ आतां महाप्रळय ऐक. तुला कौतुकानें सांगण्यांत येईल. तेथें ह्या ब्रह्मांडासहवर्तमान ब्रह्मादिकांचाही संहार होतो. ४४ शंभर वर्षे अवर्षण पडून तेथें जीवसृष्टीचा संहार होतो. त्याचप्रमाणें बारा आदित्य तपूं लागतात; ४५ शेषाच्या मुखांतून ज्वाळा निघून सप्तपाताळांचाही भडका उडतो आणि द्वादश सूर्यांच्या प्रखरतेनें सर्व लोक भस्म होऊन जातात. ४६ मग शत संवत्सरपर्यंत प्रळयकाळचे मेघ एकसारखे मुसळधार वृष्टि

मुसळधारीं ॥ ४७ ॥ ब्रह्मांड राखोंडीं आतळे ॥ तें प्रळयोद-
कीं विरालें ॥ तेथें भूतजात संहारलें ॥ सृष्टिसारिसेंचि ॥४८॥
मग मेघुडे विराले ॥ तेथें प्रचंड तेज प्रकटलें ॥ तेणें तेजें
निःशेष शोषिलें ॥ प्रळयोदक ॥ ४९ ॥ चंडानिलें झडपिलें ॥
तें तेजही मावळलें ॥ तेथें वायूतें ग्रासिलें ॥ महदाकाशें ॥५०॥
तें तन्मात्रासहित ॥ महदाकाशातें ग्रासित ॥ वेळ नलवीची
अहंता ॥ तमोगुण रुद्राचा पैं ॥ ५१ ॥ तामस अहंकाराचा
ग्रास ॥ करी अहंकार राजस ॥ तयातें गिळितां नलगे आ-
यास ॥ सात्विकासी ॥ ५२ ॥ पंच ज्ञानेंद्रियें ॥ पंच प्राण
कर्मेंद्रियें ॥ हीं राजसअहंकाराचीं कार्यें ॥ निमती तयांसरि-
सीं ॥ ५३ ॥ अंतःकरण पंचक तें ॥ जो प्रसवला ज्ञानशक्ती-

---

करतात. ४७ ब्रह्मांडाची राखोंडी होऊन तें प्रळयकाळच्या उद-
कामध्यें विरून जातें. तेथें सृष्टीबरोबर भूतजाताचीही आहुति होते.
४८ नंतर ते प्रळयमेघ वितळतात. तेथें प्रचंड तेज प्रगट होतें; आणि त्या
तेजानें तें प्रळयकाळचें पाणी पार शोषून जातें. ४९ इतक्यांत भ-
यंकर वावटळ सुरू होते, आणि तें तेजही मावळतें. मग महत्
आकाशांत त्या वायूचाही ग्रास होतो. ५० नंतर रुद्राचा तमोगुण
जी अहंता ती लगेच प्रगट होते, आणि तन्मात्रेसहित महादाका-
शाला ग्रासून टाकते. ५१ तामस अहंकाराचा ग्रास राजस अहंकार
करतो. त्यालाही सात्विक अहंकार तेव्हांच गिळून टाकतो. ५२ पांच
ज्ञानेंद्रियें, पंचप्राण, कर्मेंद्रियें, हीं जीं राजस अहंकाराचीं कार्यें
तींही त्याबरोबरच नाश पावतात. ५३ तें अंतःकरणपंचक व

तें ॥ तया सात्विक अहंकारातें ॥ ग्रासी महत्तत्त्व ॥ ५४ ॥ तैं देवता चक्र निमालें ॥ संहार तेजासि संहारिलें ॥ महत्तत्वातें ग्रासिलें ॥ मायादेवीं पैं ॥ ५५ ॥ ते गुणक्षोभिणी माया ॥ महामायेसीं जाय विलया ॥ तेही मायाही लया ॥ गुणसाम्यीं जाय ॥ ५६ ॥ तेवेळीं परम पुरुष ॥ सांडी मी ब्रह्म ऐसा उन्मेष ॥ प्रकृतिलोपीं निर्विशेप ॥ होय परब्रह्म ॥ ५७ ॥ इच्छा ज्ञान क्रियादिक ॥ शक्तिचक्रें जी अनेक ॥ तीं उपसंहारतीं निःशंक ॥ मूळमायेसरसीं ॥ ५८ ॥ पंचविध भूतग्रामींचे ॥ जे समूह जीवांचे ॥ ते उदरीं गुणसाम्याचे ॥ अधिष्ठुनी वर्तती ॥ ५९ ॥ जें कर्मपंचकें लिंपलें ॥ अज्ञानें

---

ज्ञानशक्ति ह्यांचा जन्मदाता जो सात्विक अहंकार त्याला महत्तत्व गिळून बसतें. ५४ देवताचक्र त्यानंतर लयास जातें. प्रळयकाळच्या ( संहारक ) तेजाचाही संहार होतो, आणि मायादेवी महत्तत्व गिळून टाकते. ५५ ती गुणक्षोभिणी माया महामायेमध्यें लय पावते आणि ती महामायाही गुणसाम्यांत एकरूप होते. ५६ त्या वेळेस परमपुरुष ' मी ब्रह्म ' ही भावना टाकून देतो. आणि प्रकृतीचा निरास झाला ह्मणजे केवळ ब्रह्मच उरतें. ५७ इच्छा, ज्ञान, क्रिया इत्यादि जीं अनेक शक्तिचक्रें आहेत, तीं मूळमायेसरशीं-( बरोबरच ) निःसंशय नाश पावतात. ५८ पंचविध भूतसमुदायांपासून झालेले जे जीवसमूह ते गुणसाम्याच्या पोटांत आश्रय करून राहतात. ५९ जे कर्मपंचकानें बद्ध झाले, अज्ञानांत गुरफटले,

मुसावलें ॥ तें सुटकेसी मुकलें ॥ आत्मज्ञानावीण ॥ ६० ॥ जैसा वट बीजीं समस्त ॥ प्रपंच गुणसाम्या आंत ॥ अशेष मावळत ॥ हरपोनि जाय ॥ ६१ ॥ ते गुणसाम्य स्वरूपीं मुरे ॥ मग केवळ ब्रह्माचि उरे ॥मातीचें डिखळ विरे ॥ जेवीं महासमुद्रीं ॥ ६२ ॥ ऐसा प्रळय निरूपिला ॥ मग प्रपंच कैसा उठिला ॥ तुज सृष्टिक्रमीं सांगितला ॥ जयापरी॥६३॥ आतां सांगिजेल आत्यंतिक ॥ जो प्रळय सकौतुक ॥ एथें संहारकता विवेक ॥ अन्य नाहीं ॥ ६४ ॥ जैसा रज्जुसर्प आभासे ॥ तो विवेकेंचि निरसे ॥ तेणेंवीण न नासे ॥ कांहींच जो ॥ ६५ ॥ जैसा स्वरूपीं मिथ्यारोप ॥ जो उठिला

---

ते आत्मज्ञान न झाल्यामुळें मोक्षाला आंचवतात. ६० एका लहानशा बीजामध्यें सबंध वटवृक्ष असतो, त्याचप्रमाणें गुणसाम्यामध्यें सर्व प्रपंच मावळून पार लयास जातो. ६१ तें गुणसाम्य स्वरूपांत मुरून जातें, आणि मातीचें डिखळ ज्याप्रमाणें महासमुद्रांत विरून जातें व मग सगळा समुद्रच राहतो त्याप्रमाणें मग केवळ ब्रह्मच शिल्लक राहतें. ६२ येणेंप्रमाणें प्रळयाचें निरूपण केलें. तदनंतर प्रपंच कसा उत्पन्न कसा झाला त्याचा प्रकार तुला सृष्टिक्रमामध्यें सांगितलाच आहे. ६३ आतां एक परम केवळ प्रळयांतलाच— प्रळय कौतुकानें सांगूं. येथें प्रळयकर्ता विवेक होय. ह्याशिवाय दुसरा कोणी नाहीं. ६४ जशी दोरी सर्पाकार भासते व तो भास विवेकानेंच नाहींसा झाला पाहिजे. त्यावांचून तो मुळींच जावयाचा नाहीं, ६५ तो भ्रांतीचा सर्प ह्मणजे मूळच्या ( दोरीच्या ) स्वरू-

भ्रांतिसर्प ॥ तयातें फेडी विवेकदीप ॥ तमोमयातें ॥ ६६ ॥ स्वप्नींचिया वैरियातें ॥ आणीक नाहीं वाधितें ॥ तो प्रबोधेंचि निरुतें ॥ मरण पावे ॥ ६७ ॥ तैसा मायादि विवर्त ॥ जो प्रपंच मिथ्याभूत ॥ तो स्वरूपस्वानुभवें क्षणांत ॥ हरपूनि जाय ॥ ६८ ॥ हा प्रपंच निजाकारें ॥ असतचि संहारे ॥ जेवीं मृगजळाचेनि पुरें ॥ मिथ्या होइजे ॥ ६९ ॥ नातरी घृताची पुतळी ॥ अवयवाकारें घडली ॥ आकार असूनि मिथ्या झाली ॥ तें घृतचि असे ॥ ७० ॥ तैसा ब्रह्मीं जगदाकार ॥ जो विवर्त उठिला अपार ॥ तो मिथ्याचि हा निर्धार ॥ ब्रह्मचि साच असे ॥७१॥ सर्व असतां सर्व निमालें॥

---

पाच्या ठिकाणीं मिथ्याच आरोप असतो. तेव्हां त्या तमोमय सर्पाचें विवेकरूप दीप ( आपल्या प्रकाशानें ) जसें निवारण करतो, ६६ स्वप्नांतल्या वैऱ्याला दुसरा कोणीही मारणारा लागत नाहीं. जागृति हेंच त्याचें खरोखर मरण होय. ६७ तसाच मायादिक विवर्त जो मिथ्याभूत प्रपंच तो स्वरूपाच्या स्वानुभवानें एका क्षणांत लयास जातो. ६८ हा प्रपंच मृगजलाचा पूर नाहींसा झाल्याप्रमाणें–निजाकारानें असतां असतांच नाश पावतो. ६९ किंवा तुपाची बाहुली अवयवांचे आकार देऊन घडविली खरी पण ती आकार असून मिथ्या होय. कारण पाहूं गेलें तर तें सारें तूपच. ७० तसाच ब्रह्माच्या ठिकाणीं हा जगदाकृति अकटोविकट विवर्त उठला आहे. तो मिथ्याच आहे हें ठाम आहे. ब्रह्म हेंच काय तें एक खरें आहे. ७१ सर्व कांहीं असतांना सर्व कांहीं नाहींसें झालें.

केवळ ब्रह्माचि उरलें ॥ ऐसें संहारण केलें ॥ विवेकें आत्यंतिकें ॥ ७२ ॥ ह्मणूनि हा अशेष ॥ प्रपंच बंधन निःशेष ॥ उपसंहारे तो प्रळय देख ॥ आत्यंतिक ॥ ७३ ॥ मयाप्रळय तो अनारिसा ॥ तेथें संहारे स्थूलदशेचा ठसा ॥ परी भवदायक साभासा ॥ उरे अज्ञानगर्भीं पैं ॥ ७४ ॥ तेथें लिंगदेह न निमे ॥ न जळती शुभाशुभ कर्में ॥ ह्मणूनि चुकतीना मृत्युजन्में ॥ जीवासी पैं ॥७५॥ असो पंच प्रळयांचा प्रकार ॥ तुज निरूपिला संहार ॥ आतां मोक्षाचा विचार ॥ प्रवर्तू दिजे ॥ ७६ ॥ जे गुणप्रधान माया ॥ ते कारण देह शिष्यराया ॥ तेथींचिया महाप्रळया ॥ तये नांव सुषुप्ती ॥ ७७ ॥ रुद्र तेथींचा अभिमानी ॥ तो परमात्मा होय कैसेनि ॥ हें

---

केवळ ब्रह्मच राहिलें. अशाप्रकारें विवेकानें परिपूर्ण संहार केला. ७२ ह्मणून हें सर्व प्रपंचबंधन अगदीं समूळ लयास जातें. तो प्रळय आत्यंतिक किंवा परिपूर्ण होय. ७३ महाप्रळय तो वेगळा तेथें फक्त जडदशेचाच ठसा लयास जातो. परंतु मिथ्या संसार लावून देणारा तो ठसा अज्ञानाच्या गर्भांत असतोच असतो. ७४ तेथचा लिंग देह कांहीं नाश पावलेला नसतो, शुभाशुभ कर्में कांहीं जळून गेलेलीं नसतात, ह्मणून जीवाला जन्ममृत्यू कांहीं चुकत नाहींत. ७५ असो. तुला पंचप्रळयांचा प्रकार ह्मणजे संहार सांगितला. आतां मोक्षाच्या विचारांत शिरूं या. ७६ हे शिष्यराजा! गुण प्रधान जी माया ती कारण देह होय. तेथल्या महाप्रळयाला सुषुप्ति-निद्रा असें नांव आहे. ७७ तेथचा अभिमानी रुद्र. तो परमात्मा कसा

**गुणत्रयाचें कार्य ह्मणूनी ॥ तो वेगळाची ॥ ७८ ॥ ब्रह्मांड हिरण्यगर्भ माया ॥ सृष्टि स्थिति महाप्रळया ॥ ब्रह्मा हरिहर कार्या ॥ माया गुणाचे ॥ ७९ ॥ माया गुणत्रयाची कथा ॥ ते मिथ्या ऐसी व्यवस्था ॥ परमात्मा जाण तत्त्वतां ॥ सर्व-साक्षी ॥ ८० ॥ इति श्रीमद्विवेकसिंधौ संहारक्रमे गुरुशिष्य-संवादे ईश्वरतनुत्रयपूर्वकनिरसनं नाम पंचमप्रकरणं समाप्तं ॥**

---

होईल? हें त्रिगुणांचें कार्य आहे ह्मणून तो वेगळाच आहे ७८ ब्रह्मांड, हिरण्यगर्भ, व माया; सृष्टि, स्थिति, व महाप्रळय; ब्रह्मा, विष्णु, व महेश, हीं मायेच्या गुणांचीं कार्यें होत. ७९ मायेच्या त्रिगुणांची गोष्ट ह्मणजे ते मिथ्या हें ठरलेंच! आणि परमात्मा मात्र तत्त्वतः सर्वसाक्षी आहे, हें ध्यानांत ठेव. ८०

# प्रकरण सहावें.

विषयः—महाकारण देह निरसनपूर्वक तत्त्वंपदार्थ शोधन.

श्रीगणेशाय नमः ॥ ब्रह्माकारें आद्य स्फुरण ॥ जें ज्ञानपूर्णता लक्षण ॥ तेचि तनु महाकारण ॥ जगदीश्वरीं ॥ १ ॥ ज्ञानविग्रह ईश्वर ॥ हा सर्व शास्त्रांचा निर्धार ॥ तया ज्ञानाचा ज्ञातार ॥ तोचि तो कैसेनी ॥ २ ॥ हे महामाया परशक्ती ॥ ईश्वराची मूळप्रकृती ॥ तियेतें जाणता स्वयंज्योति॥ तो परम पुरुष ॥ ३ ॥ तो समस्त मायेचा गोसावी ॥ सत्तामात्रें सर्वांतें जीववी ॥ ब्रह्मादिकांतें चेष्टवी॥सृष्ट्यादिव्यापारीं ॥ ४ ॥ तीं अनादि घरवरौतें ॥ व्यालीं ब्रह्मादि प्रपंचातें ॥

---

श्रीगणेशाय नमः—पहिलें ब्रह्माकार स्फुरण तें परिपूर्ण ज्ञानाचें लक्षण होय; व तोच जगदीश्वराचा महाकारण देह होय? ॥१॥ ज्ञान हेंच ईश्वराचें शरीर होय, असा सर्व शास्त्रांचा सिद्धांत आहे. तेव्हां तें ज्ञान तरी तो कसा होईल ? कारण तो ज्ञानाचाही ज्ञानी आहे. २ महामाया ही पर श्रेष्ठ–शक्ति अर्थात् ही ईश्वराची मूळप्रकृति होय. तिला जाणणारा तो परमपुरुष स्वयंज्योति स्वयंप्रकाश आहे. ३ तो एकंदर मायेचा स्वामी असून सत्तामात्रेंकरून सर्वांना जीवन देत आहे व सृष्टि आदिकरून व्यापारामध्यें ब्रह्मादिकांना नाचवीत आहे. ४ हीं अनादि दोघेजणें ( दंपत्य ) ब्रह्मादिक प्रपंचास

न सांडिती एकमेकांतें ॥ छाया तनु जैसी ॥ ५ ॥ एकेंवीण एक नाहीं ॥ हें नवल प्रभेद पाही ॥ तयेमाजीं असूनि नाहीं॥ वेगळाचि तो ॥ ६ ॥ ते प्रकाश्य तो प्रकाशक ॥ ते वेद्य तो वेदक ॥ ते ज्ञेय तो ज्ञापक ॥ सर्वसाक्षी ॥ ७ ॥ हे मूळप्रकृती मिथ्य ॥ तत्कार्य विश्व कैचें सत्य ॥ तेथींची यथातथ्य॥ विवंचना सांगिजेल ॥ ८ ॥ माया सत् ना असत ॥ नव्हे ते सदसत् ॥ सदसद्विलक्षण ॥ बोलूंचि नये ॥ ९ ॥ माया भिन्नाभिन्न ॥ भिन्नाभिन्नविलक्षण ॥ नव्हे तें भिन्नाभिन्न ॥ ते कांहींच नव्हे ॥ १० ॥ माया नव्हे सावयव ॥ नव्हे ते

---

जन्म देतीं झाली. आणि छाया जशी शरीराला सोडीत नाहीं, त्याप्रमाणें हीं ऐकमेकाला विसंबत नाहींत. ५ एकावांचून दुसरें नाहीं. हें कसें विलक्षण नाड आहे पहा! तो तिच्यामध्यें असून नसतो ह्मणजे वेगळाच असतो. ६ ती प्रकाशली जाणारी, तो प्रकाशक; ती वेद्य ( विशेष जाणली जाणारी ), व तो वेत्ता; ती जाणण्यास योग्य, व तो आत्मा सर्वसाक्षी होय. ७ ही मूळप्रकृतिच मिथ्या आहे. तेव्हां तिचें कार्य जें विश्व तें तरी कोठून खरें आणावें? आतां तेथला यथातथ्य विचार सांगूं. ८ माया ही सत्‌ही नाहीं व असत्‌ही नाहीं, सदसत्‌ही नव्हे. बरें सदसतूहून विलक्षण ह्मणावी तर त्याचें तेथें नाव सुद्धां काढूं नये. ९ माया भिन्न, अभिन्न; किंवा ह्या दोहोंहूनही विलक्षण ह्मणावी तर ती भिन्नही नव्हे अभिन्नही नव्हे आणि कांहींच नव्हे. १० मायाही अवयवयुक्तही नाहीं व अवयवरहितही नाहीं. बरें; ह्या दोहोंची मिळून झालेली

निरवयव ॥ नव्हे उभयां संभव ॥ नव्हे उभयातीत ॥११॥ माया सत् कां न ह्मणावी ॥ हे भ्रांति चित्तीं न धरावी ॥ सत् तरी असावी ॥ जैसी तैसी ॥ १२ ॥ सत् शब्दें बोलिजे अस्तित्वता ॥ कालत्रयीं अबाधिता ॥ माया देवीसी तत्त्वता॥ तें अघटमान ॥ १३ ॥ जरी ह्मणसी माया सत् ॥ तरी कालत्रयीं अबाधित॥तरी देखत असो नासत ॥ स्वानुभवें॥१४॥ न होतां मायोपसंहार ॥ कैंचा ब्रह्म साक्षात्कार ॥ हा स्वानुभवें निर्धार ॥ होय योगींद्रासी ॥ १५ ॥ माया हो कां असत् ॥ हें बोलणेंचि असंगत ॥ ते न भासे कदाचित् ॥ जैसा

---

ह्मणावी तर तशीही नाहीं. बरें; त्या दोहोंच्या पलीकडची ह्मणावी तर तशीही पण नाहीं! ११ मायेला सत् कां ह्मणूं नये? तर ही भ्रांति होय. ती मनांत धरून उपयोगी नाहीं. कारण सत् असेल तर ती जशीच्या तशीच असली पाहिजे. १२ सत् शब्दानें तिकालींही अबाधित—निर्विकार अविनाश–असें अस्तित्व घ्यावयाचें. आणि मायादेवीला पाहूं गेलें तर ती गोष्ट अगदींच अशक्य! १३ माया ही जर सत् धरून चाललें तर ती त्रिकालींही अबाधित पाहिजे. पण तिचा तर नाश होतो, ही गोष्ट आह्मी स्वानुभवानें पाहत आहोंच. १४ मायेचा संहार झाल्यावांचून ब्रह्माचा साक्षात्कार कोठून बोलावा ? ह्याचा निश्चय योगिश्रेष्ठ स्वानुभवानें करून घेतात. १५ माया असत् ह्मणावी तर तें बोलणेंच मुळीं सयुक्तिक दिसत नाहीं. वांझेच्या मुलाप्रमाणें तो केव्हांही भासत

वंध्यापुत्र ॥ १६ ॥ मायानिवृत्तिकारणें ॥ वेदशास्त्रीं बोलिलीं साधनें ॥ तरी तयें अप्रयोजनें ॥ प्रतिभासती ॥१७॥ ह्मणूनि नव्हे ते असत् ॥ जरी ह्मणावी सदसत् ॥ तरी विरुद्ध धर्मासी ऐक्यता ॥ हें अघटमान ॥ १८ ॥ सत् तें नव्हे असत् ॥ असत् तें कैसेनि सत् ॥ जैसें स्वस्कंधारोहण वृथा ॥ असंबद्ध पैं ॥ १९ ॥ माया सदसद्विलक्षण ॥ एस बोलसी वचन ॥ तरी तें अघटमान ॥ सर्वथैव ॥ २० ॥ असतया विलक्षण नसे ॥ नसतया विलक्षण असे ॥ या दोहीं विलक्षण न दिसे ॥ वस्तु कवणीचि पैं ॥ २१ ॥ माया भिन्न ह्मणिजती॥ तरी चैतन्यावीण केवीं स्फुरती ॥ ते ब्रह्मींची निजप्रकृती ॥

---

नाहीं. १६ मायेचें निरसन व्हावें ह्मणून वेदामध्यें व शास्त्रामध्यें साधनें सांगितलीं आहेत. तरी त्यांचें प्रयोजन जवळ जवळ नाहींच सारखें आहे. १७ ह्मणून ती असत्‌ही नव्हे. बरें सदसत् ह्मणावी तर विरुद्ध धर्मांचें ऐक्य होणें, ही गोष्ट अगदीं अशक्य आहे. १८ जें सत् आहे तें असत् नव्हे; बरें सत् तें तरी असत् कसें होईल? जसें आपल्याच खांद्यावर आपण बसलों हें भाषण असंबद्ध उगाच कांहींतरी आहे, तसेंच हेंही बोलणें व्यर्थ आहे. १९ माया सदसत् त्यांहून विलक्षण आहे असें कोणी ह्मणतात. तर तेंही सर्वथैव अशक्य होय. २० कारण, असल्याहून विलक्षण ह्मणजे नाहीं; आणि नसल्याहून विलक्षण ह्मणजे आहे. ह्या दोहोंहून विलक्षण मात्र कोणतीच वस्तु दिसत नाहीं. २१ माया भिन्न ह्मटली तर ती चैतन्यावांचून कशी स्फुरण पावली असती. आणि ब्रह्मींची

तरी भिन्न कैसी ॥ २२ ॥ जैसी चंद्राची कळा ॥ नव्हे चंद्रासी वेगळा ॥ तैसी ब्रह्माग्नीची ज्वाळा ॥ तेणंसी भिन्न कैसी जरी ह्मणसी माया अभिन्न ॥ तरी हें अप्रमाण वचन ॥ जें मायेचें निरसन ॥ होय स्वानुभवें ॥ २४ ॥ जैं माया उपसंहरे ॥ तैं अविनाश ब्रह्म उरे ॥ तरी अभिन्न या उत्तरें ॥ न बोले तूं ॥ २५ ॥ माया यापरी भिन्नाभिन्न ॥ हें बोलणें अघटमान ॥ येथें उपपत्ति सांगेन ॥ ते ऐक पा तूं ॥ २६ ॥ जें भिन्न तें नव्हे अभिन्न ॥ अभिन्न तें नव्हे भिन्न ॥ या विरुद्ध धर्मांसी अवस्थान ॥ हें असंबद्ध ॥ २७ ॥ भिन्नाभिन्न विलक्षण ॥ ऐसें मायेतें तूं न ह्मण॥तेथींची विवंचना सांगेन॥

---

ती तर निजप्रकृतीच आहे, मग ती भिन्न कशी ह्मणावी? २२ जशी चंद्राची कळा, चंद्राहून वेगळी नसते, तशीच ब्रह्मरूप अग्नीची ज्वाळा त्याच्याहून भिन्न कशी होईल? २३ माया अभिन्न ह्मणशील तर तेंही बोलणें अप्रमाण होय. कारण मायेचें निरसन स्वानुभवानें होतेंच! २४ मायेचा संहार झाला कीं अविनाशी ब्रह्मच राहतें. ह्मणून ती अभिन्न आहे असें भाषण बोलूं नकोस. २५ ह्याप्रमाणें माया ही भिन्न व अभिन्न हें बोलणेंच मुळीं खुंटलें. ह्याविषयीं उपपत्ति सांगतों ती तूं ऐक. २६ जें भिन्न नव्हे तें अभिन्न; व जें अभिन्न नव्हे तें भिन्न. ह्या विरुद्ध धर्मांचें एकत्र बिऱ्हाड असणें अगदीं असंबद्ध होय. २७ आतां भिन्न व आभिन्न ह्यांहून माया विलक्षण आहे असेंही ह्मणूं नको. तेथलाही विचार आतां

ते अवधारिजे ॥ २८ ॥ भिन्ना वेगळे अभिन्न ॥ आणि अभिन्ना वेगळें भिन्न ॥ तरी उभयांसी विलक्षण ॥ माया केवीं घडे ॥ २९ ॥ जरी माया ह्मणसी सावयव ॥ तरी वारी या युक्तीची धांव ॥ तयेसी अव्यक्त हें नांव ॥ बोलिजे वेदांतीं ॥ ३० ॥ इयेसी वर्ण ना व्यक्ति॥रूप नास्थिती॥तरी सावयव ऐसें बोलती ॥ ते हीनाविवेकी ॥ ३१ ॥ माया निरवयव बोलती ॥ ते सर्वथा कांहींच नेणती ॥ ब्रह्माकारें स्फुरती ॥ तरी निरवयव कैसी ॥ ३२ ॥ निरवयव मायेपासाव ॥ जग कैसेनी होय सावयव ॥ इये उपपत्तीस्तव ॥ निरवयव नव्हे ॥ ३३ ॥ विरुद्ध धर्म निरूपिले तुज ॥ हें मायेसी नाहीं ऐसें बुज ॥ माझी माय परी वांझ ॥ हें असंबद्ध पैं

---

सांगेन तो एक. २८ भिन्नाहून भिन्न तें अभिन्न, आणि अभिन्नाहून वेगळें तें भिन्न. तेव्हां ह्या दोहोंतूनही विलक्षण माया कशी होईल ? २९ माया अवयवयुक्त आहे ह्मणशील तर तीही तुझी कल्पना चुकीची आहे, असें समज. तिला अव्यक्त हें वेदांतांत नांव आहे. ३० हिला वर्णही नाहीं, व्यक्तस्वरूपही नाहीं; रूप नाहीं की स्थिति नाहीं. ह्मणून हिला अवयवयुक्त ह्मणतात ते विचारशून्य होत. ३१ जे माया अवयवरहित ह्मणतात, त्यांना मुळींच कांहीं कळत नाहीं. ब्रह्मरूपानें ती जर स्फुरण पावते तर ती अवयवरहित कशी ? ३२ अवयवरहित मायेपासून अवयवयुक्त जग कसें निर्माण झालें ? ह्या उपपत्तीवरून ती अवयवरहित नव्हे. ३३ विरुद्ध धर्म जे तुला सांगितले ते

॥ ३४ ॥ जें होय सावयव ॥ तें होय निरवयव ॥ निरवयव तें सावयव ॥ कैसेनि होय ॥ ३५ ॥ माया उभयां विलक्षण ॥ हें असंगत वचन ॥ या विरुद्ध धर्मासी भिन्न ॥ आथी-चिना ॥ ३६ ॥ यापरी मिथ्या द्वादश विकल्परचना ॥ माया कांहींच निर्वचेना ॥ह्मणूनि हे अनिवर्चनीय जाणा॥ सर्वकाळीं ॥ ३७ ॥ जे दिसे अनिर्वचनीय ॥ ओळखावी मिथ्यामय ॥ यथातथ्य इये ॥ ऐसें जाणतूं ॥३८॥द्वादश विकल्पीं कल्पितां॥ मृगजळासी जेवीं अनिर्वचनीयता ॥ तैसी माया जाण तत्त्व-तां ॥ मिथ्याभूत ही ॥ ३९ ॥ अनिर्वचनीय देखिली ॥ या-परी माया निरसली ॥ जे मूळप्रकृती बोलिली ॥ सर्वेश्वरीं

---

मायेला नाहींत असें समज. माझी आई खरी पण ती वांझ आहे हें भाषण असंबद्ध होय. ३४ जें अवयवयुक्त असेल तेंच अवयव-हीन होईल. अवयवहीनच आहे तें अवयवयुक्त कसें होणार? ३५ माया ही ह्या दोहोंहूनही विलक्षण आहे. हें भाषण विसंगत आहे. कारण ह्या विरुद्धधर्मांहून भिन्न असें कांहचि नाहीं. ३६ ह्याप्रमाणें बाराही विकल्पांची उभारणी मिथ्या आहे. मायेविषयीं कांहींच बोलतां येत नाहीं. ह्मणून ती निरंतर आनिर्वचनीय आहे हें ध्यानांत आणा. ३७ जो आनिर्वनीय दिसते ती मिथ्याभूत आहे असें समजावें. अशा प्रकारें हिला तूं यथातथ्य रीतीनें ध्यानांत आण. ३८ बाराही विकल्प ( कुतर्क ) जरी रचले तरी मृगजळ हें जसें अनिर्वचनीय आहेत तशीच माया हीहि तत्त्वतः मिथ्याभूत आहे. ३९ अनिर्वचनीय अशी दृष्टोत्पत्तीस आली. ह्याप्रमाणें मायेचा

॥ ४० ॥ ते महामाया देह महाकारण ॥ सर्वेश्वराचें जाण ॥ तो तियेसी विलक्षण ॥ केवळ चैतन्य जें ॥ ४१ ॥ महाकारणीं असे वर्तत ॥ तेथें सर्वसाक्षित्वें व्यवस्थ ॥ अभिमानी सर्वेश्वर तेथ ॥ ऐसें जाण तूं ॥ ४२ ॥ तोचि अभिमान कैसा ॥ पूर्ण ब्रह्म मी ऐसा ॥ सर्वसाक्षित्वाचा ठसा ॥ जेथ बोलिजे ॥ ४३ ॥ हाचि तत्पदार्थ शबल ॥ जो परमात्मा केवळ ॥ जयासी चौं देहांचा मळ ॥ मिथ्यारोप ॥ ४४ ॥ स्वप्न देहासी मिळूनि बंध ॥ प्रबोधीं जेवीं मिथ्या सिद्ध ॥ तैसा चौं देहांसी संबंध ॥ परमात्मयासी ॥ ४५ ॥ ब्रह्मांड हिरण्यगर्भ माया ॥ मूळप्रकृती देहचतुष्टया ॥ जाण परमा-

---

निरास झाला. तीच सर्वेश्वराची मूळप्रकृति होय. ४० ती महामाया हाच सर्वेश्वराचा महाकारण देह होय. तो तिच्याहून विलक्षण, केवळ चैतन्य आहे. ४१ महाकारणामध्यें वास करीत असतो. तेथें सर्वसाक्षित्वाचाच कारभार असतो. अर्थात् तेथला अभिमानी सर्वेश्वर हें तूं लक्षांत आण. ४२ तो अभिमान कसा ह्मणशील तर 'मी पूर्ण ब्रह्म' ह्या भावनेचा. तेथें सर्वसाक्षित्वाचा ठसा असतो. ४३ हाच शबल तत्पदार्थ होय. तोच केवळ परमात्मा होय. चोहोंदेहांचा मळ त्यास लागतो हा त्यावर मिथ्या आरोप आहे. ४४ स्वप्नांतील देहाचें बंधन जागृतीमध्यें जसें मिथ्या ठरलेलें असतें, तसाच परमात्म्याला चारी देहांचा संबंध असतो. ४५ ब्रह्मांड, हिरण्यगर्भ, माया, व मूळप्रकृति हें देहचतुष्टय आणि परमात्मा तो

त्मा अप्रमेया ॥ परब्रह्म पैं ॥ ४६ ॥ जो शबल तत्पदार्थ ॥ शोधिलिया उरे परमार्थ ॥ तोचि शुद्ध हा माथितार्थ ॥ तुवां जाणिजसु ॥ ४७ ॥ घटाभावीं घटाकाश ॥ तेंचि जैसें महदाकाश ॥ माया निरासीं स्वप्रकाश ॥ ब्रह्म परमात्माचि ॥ ४८ ॥ ऐसें तत्पदार्थाचें शोधन ॥ विस्तारें केलें कथन ॥ तें पुनरपि तुज सांगेन ॥ आरांकुनी ॥ ४९ ॥ उत्पत्ति स्थिति संहार ॥ सर्वसाक्षित्व व्यवहार ॥ या चौं अवस्थांचा ज्ञातार ॥ तो अवस्था कैसेनी ॥५०॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर ॥ आणि चौथा सर्वेश्वर ॥ हे साकार तो निराकार ॥ जाण परमात्मा ॥ ५१ ॥ एवं माया गुणविस्तार ॥ चतुर्विध व्यवहार ॥ परमात्मा तो निर्विकार ॥ मायातीत

---

अप्रमेय ( अतर्क्य ) परब्रह्म होय. ४६ तो शबल तत्पदार्थ शोधला म्हणजे परम अर्थच शिलक राहतो, व तोच शुद्ध होय हा मथितार्थ तुला समजला असेलच. ४७ घटाच्या अभावीं घटाकाश हेंच जसें महदाकाश होतें, तसेंच मायेचा निरास झाला कीं स्वयंप्रकाश परमात्मा ब्रह्मच राहतें. ४८ येणेंप्रमाणें तत्पदार्थाचें शोधन ( निश्चय ) तुला विस्तारपूर्वक सांगितलें. तें तुला फिरून एकदां उत्साहपूर्वक सांगूं. ४९ उत्पत्ति, स्थिति, संहार हा सारा सर्वसाक्षित्वाचा कारभार होय. ह्या चारी अवस्थांचा जाणता तो अवस्था कसा होईल ? ५० ब्रह्मा, विष्णु, शंकर आणि चौथा सर्वेश्वर हे साकार आहेत, व तो परमात्मा निराकार आहे हें ध्यानांत ठेव. ५१ अशा प्रकारें मायेचा गुणविस्तार तो हा चार प्रकारचा कारभार होय. परमात्मा

॥ ५२ ॥ ईश्वरीं सृष्ट्यादिकर्तृत्व ॥ ते मायागुणीं आरोपित ॥ परमात्मयासी तत्त्वतां ॥तें न घडोचि पैं॥५३॥सृजी विश्व जरी तो मिथ्य ॥तरी सर्जन केवीं सत्य ॥होय सृष्टीचें यथातथ्य ॥ तेंही मिथ्याभूत ॥ ५४ ॥ प्रतिपाल्य जें विश्वत्व ॥ त्यासी जरी मिथ्यात्व ॥ तहीं ईश्वरीं प्रतिपालकत्व ॥ केवीं घडे ॥ ५५ ॥ जैसा वंध्येचा पुत्रु ॥ त्यासी होय जेविं शत्रु ॥ तयासी वधावयाचा मंत्रु ॥ तो नंव लटिकाचि कीं ॥ ५६ ॥ तैसा प्रळयीं संहारे प्रपंच ॥ तो मिथ्या हा निर्वच ॥ तरी संहार कर्ता हा साच ॥ कैसेनि ह्मणावा ॥ ५७ ॥ जरी प्रपंच साच होता ॥ तरी कैसेनी संहारता ॥ ह्मणूनि अस-

---

तर विकाररहित, मायेच्या पलीकडचा आहे. ५२ ईश्वराच्या ठिकाणीं सृष्टि आदिकरून कर्तृत्व असून तें मायेच्या गुणांनीं आरोपित झालेलें आहे. तें तत्त्वतः परमात्म्याच्या ठिकाणीं नाहीं. ५३ विश्वच जर मुळीं तो मिथ्या निर्माण करितो तर तें निर्माण करणें तरी सत्य कशावरून ? अर्थात् सृष्टीचें यथातथ्य स्वरूप तेंही मिथ्याभूतच होय. ५४ ज्याचा प्रतिपाळ करावयाचा तें विश्वच जर मुळीं मिथ्या तर प्रतिपाळाचा कर्तेपणा तरी ईश्वराच्या ठिकाणीं कसा संभवेल ? ५५ वांझेच्या मुलाला ह्मणे शत्रु उत्पन्न झाला तर त्याला मारण्यासाठीं मंत्र योजावयाचा तो देखील लटकाच ! ५६ त्याचप्रमाणें प्रळयकाळीं प्रपंचाचा संहार होतो खरा, पण तो मिथ्या हें जर निर्विवाद आहे, तर संहारकर्ता तरी खरा कसा ह्मणावा ? ५७ प्रपंच जर खरा असतो तर तो कसा संहारला असता ? ह्मणून

त्याची सत्यता ॥ साच न मानावी ॥ ५८ ॥ माया ब्रह्मींचा विवर्त ॥ तो मिथ्या ऐसा सिद्धांत ॥ तत्कार्य प्रपंच अनित्य॥ हें काय बोलावें ॥ ५९ ॥ नियमापेक्ष नियंतृत्व ॥ दृश्यापेक्ष द्रष्टृत्व ॥ कार्यापेक्ष कर्तृत्व ॥ ऐसी स्थिती पैं ॥ ६० ॥ नियम्य दृश्य कार्य ॥ जग मिथ्या मायामय ॥ तरी नियंतृत्वादि ऐश्वर्य ॥ ईश्वरीं कैसेनी ॥६१॥ जरी मायेसी मिथ्यात्व॥ तरी साच कैसेनि साक्षित्व ॥ म्हणूनि मायीक ईश्वरत्व ॥ नाहीं परमेश्वरासी ॥६२॥ रजस्वले मायेचा॥विटाळ नलगे साचा॥ तें परब्रह्म निःप्रपंच ॥ जाण शुद्ध तत्पदार्थ ॥ ६३ ॥ स्वस्वरूपीं विश्रांत ॥ जो परमात्मा निभ्रांत ॥ तोचि शुद्ध तत्पदार्थ ॥

असत्याच्या ठिकाणीं सत्यता खरोखर मानूं नये. ५८ माया हा ब्रह्माचा विवर्त आहे. तो मिथ्या आहे, हा सिद्धांत ठरलेला आहे. आणि त्याचेंच कार्य प्रपंच मग तो अनित्य आहे हें काय सांगावें? ५९ नियंतेपणा हा नियमावर अवलंबून, द्रष्टेपणा दृश्यावर अवलंबून, आणि कर्तेपणा हा कार्यावर अवलंबून, असा प्रकार आहे. ६० जग हें नियमन केलें जाणारें दृश्य कार्य असून तें मिथ्या मायारूप आहे. तेव्हां त्याचा नियंतेपणा आदिकरून प्रभुत्व ईश्वराच्या ठिकाणीं कसें संभवेल? ६१ जर मायाच मिथ्या आहे तर साक्षित्व तरी खरें कशावरून? म्हणून परमेश्वराच्या ठिकाणीं मायिक प्रभुत्व नाहींच. ६२ त्या अस्पर्श्य मायेचा तेथें खरोखर विटाळसुद्धां नाहीं. तें प्रपंचरहित परब्रह्म तोच शुद्ध तत्पदार्थ समजावा. ६३ स्वस्वरूपाच्या ठिकाणीं विसावा घेत असलेला जो भ्रांति-

जाण परमात्मा ॥६४॥ दुसरेपणातें ध्यालें ॥ तें सरोवरोदक आटलें ॥ तेथें प्रतिबिंब झालें ॥ मुख्य विंबचि ॥६५॥ ऐसी माया संहारे ॥ तैं ब्रह्मावेगळें ईश्वरत्व नुरे ॥ तरी ब्रह्मीं ईश्वरत्व हीं उत्तरें ॥ जाण लटिकेंचि ॥ ६६ ॥ उंसाचीं चिपाडें सांडुनी ॥ जैसा रस घेईजे गाळूनी ॥ तेवीं मायीक बोली उतरूनी ॥ घेणें परब्रह्म ॥ ६७ ॥ जेथें मनासहित ॥ वाचा निवर्तलिया समस्त ॥ परमात्मयासी तत्त्वतां ॥ तें निजस्वरूप पैं ॥ ६८ ॥ एवं तत्पदार्थाचें शोधन ॥ विस्तारें केलें कथन ॥ उभय लक्षांशांचें संघटन ॥ आतां सांगिजेल ॥६९॥

इति श्रीमद्विवेकसिंधौ संहारक्रमे गुरुशिष्यसंवादे महाकारणदेहनिरसनपूर्वकं तत्पदार्थशोधनं नाम षष्ठप्रकरणं समाप्तं ॥६॥

---

रहित परमात्मा, तोच शुद्ध तत्पदार्थ परमात्मा होय. ६४ जेथें दुसरेपणा उत्पन्न झाला होता तें सरोवरांतील पाणीच आटून गेलें. आतां तेथें मुख्य बिंबच प्रतिबिंब होऊन बसलें ( प्रतिबिंब म्हणून निराळें उरलेंच नाहीं. ) ६५ अशाप्रकारें मायेचा संहार झाला कीं ब्रह्मावेगळा ईश्वरपणा उरतच नाहीं. आणि ब्रह्माच्या ठिकाणीं ईश्वरपणा येतो तोही पण लटकाच! ६६ उंसाचीं चिपडें टाकून देऊन जसा रसच तेवढा गाळून घ्यावा, त्याचप्रमाणें मायिक भाषण टाकून देऊन परब्रह्मच घ्यावें. ६७ मनासहित सर्व वाणी लीन झाल्यावर तेंच परमात्म्याचें निजस्वरूप होय, हें ध्यानांत ठेव. ६८ अशाप्रकारें तत्पदार्थाचा निश्चय तुला विस्तारपूर्वक सांगितला. आतां लक्ष्य व अलक्ष्य ह्यांचा निकट संबंध सांगूं. ६९

# प्रकरण सातवें.

विषयः—जीव परमात्मा तदात्म ऐक्य विवरण.

॥ श्रीगणेशाय नमः ॥ तत्पदार्थ त्वंपदार्थ ॥ या दोहोंचा जो लक्ष्यार्थ ॥ तयासी ऐक्य हा फलितार्थ ॥ महावाक्याचा ॥ १ ॥ तत्शब्दें पूर्ण चैतन्य ॥ तेंचि त्वंशब्दें पृथक् चैतन्य ॥ जें बोलिजे पृथक् चैतन्य ॥ तेंचि पूर्ण चैतन्य जाणिजे ॥२॥ ह्मणूनि ब्रह्मत्वें तूं होसी ॥ हा अर्थ महावाक्यासी ॥ तरी परमात्म्यासी ॥ तुज ऐक्य पै ॥३॥ तंव शिष्य बोले वाक्य ॥ जी ईश्वरेंसी मज कैसें ऐक्य ॥ अग्नीसी होणें सख्य ॥ हिंवासी जी कैसेनी ॥ ४ ॥ तो व्यापक मी परिच्छिन्न ॥ तो

---

श्रीगणेशाय नमः—त्वंपदार्थ व तत्पदार्थ त्या दोहोंचा जो लक्ष्यार्थ ( अनुसंधान ) तेंच ऐक्य होय असा महावाक्याचा ध्वनितार्थ आहे. १ तत् शब्दानें पूर्ण चैतन्य घ्यावयाचें आणि त्वं शब्दानें पृथक् (भिन्न चैतन्य) घ्यावयाचें. ज्याला पृथक् चैतन्य असें नांव आहे, तेंच पूर्ण चैतन्य ह्मणून समजावें. २ ह्मणून तूं ब्रह्मरूप आहेस, हाच महावाक्याचा अर्थ आहे. ह्मणजे परमात्म्याशीं तुझें ऐक्य आहे. ३ तेव्हां शिष्य ह्मणालाः—महाराज! माझें ईश्वराशीं ऐक्य कसें होईल ? महाराज ! विस्तवाचें आणि थंडीचें सख्य जमावें कसें ? ४ तो व्यापक आहे, मी मर्यादित आहें; तो स्वतंत्र आहे,

स्वतंत्र मी पराधीन ॥ तो स्वामी मी सेवक जन ॥ तरी ऐक्य कैसेनी ॥ ५ ॥ तो सृष्ट्यादि कार्यकर्ता ॥ मज निरंतर शोच्यता ॥ मी बांधलों तो सोडविता ॥ तरी तदात्मा कैसेनी ॥ ६ ॥ तो नियंता सर्वेश्वर ॥ मी नियम्य अनीश्वर ॥ तो नित्यमुक्त मज संसार ॥ अनासिद्ध ॥ ७ ॥ तो कर्मफल दाता ॥ मी कर्मफल भोक्ता ॥ तरी ईश्वरासी मज ऐक्यता ॥ कैसेनी जी ॥ ८ ॥ मग बोले कृपासिंधु ॥ श्रीगुरु पूर्णबोधु ॥ हा गा उपाधिकल्पित भेदु ॥ त्वंपदार्थासी ॥ ९ ॥ सुवर्ण लोहाच्या दर्पणीं ॥ एकचि मुखाचि होती दोनी ॥ तेंसें संबंधें माया अविद्येचेनी ॥ ब्रह्मचि

---

मी परतंत्र आहें; तो स्वामी आहे, आम्ही बंदेगुलाम आहों. तर दोघांचें ऐक्य कसें व्हावें? ५ तो सृष्टि आदिकरून कार्यांचा कर्ता आहे, आणि मी निरंतर दुःखी आहें. मी बद्ध असून तो सोडविणारा आहे. तर मी तदात्मा कसा होईन? ६ तो सर्वेश्वर नियंता आहे. मी नियमांनीं बांधला जाणारा व अनीश्वर-ईश्वराहून भिन्न-पामर आहें. तो सदोदित मुक्त आहे; आणि माझ्यामागें संसार अनादिसिद्ध आहे. ७ तो कर्मफल देणारा आहे व मी कर्मफल भोगणारा आहें. तर महाराज! माझें व ईश्वराचें ऐक्य कसें होईल? ८ मग कृपेचे समुद्र पूर्णबोध श्रीगुरु ह्मणाले:—अरे! हा त्वंपदार्थाला उपाधि कल्पित-उपाधिमुळें झालेला-भेद आहे. ९ एकास सोन्याची चौकट व एकास लोखंडाची चौकट बसविलेल्या आरशांच्या ठिकाणीं ज्याप्रमाणें एकच मुख दोन प्रकारचें होतें, त्याच-

जीवेश्वर ॥ १० ॥ मायोपाधि ब्रह्म तो परमात्मा ॥ अवि-
द्योपाधि ब्रह्म तो जीवात्मा ॥ उपाधिविरुद्ध धर्मात्मा ॥ जी-
वेश्वरासी ॥ ११ ॥ तुवां बोलिला ईश्वरगुण ॥ ते माया
आरोपित जाण ॥ परमात्मा तो निर्गुण ईश्वरस्वरूप ॥१२॥
अविद्याकल्पित जीव धर्म ॥ ते मिथ्या ऐसें बुज वर्म ॥ तत्त्व-
तां जीवाचा निजधर्म ॥ तें केवळ ब्रह्म पैं ॥ १३ ॥ अविद्येचें
अनित्यत्व ॥ आणि मायेचें मिथ्यात्व ॥ हे शोधिलीया अ-
निर्वचनीवत्व ॥ प्रसंगें करूनी ॥ १४ ॥ ईश्वरीं ईश्वरत्व
मायिक ॥ जीवीं जीवत्व अविद्यक ॥ उभय निरासीं उरे
एक ॥ केवळ ब्रह्म ॥ १५ ॥ त्रिविध लक्षणांतें ॥ जो जाणतो

---

प्रमाणें मायेच्या व अविद्येच्या संबंधानें ब्रह्मच जीवेश्वर झालें आहे
१० मायेची उपाधि असलेलें ब्रह्म तो परमात्मा, अविद्येची उपाधि
असलेलें ब्रह्म तो जीवात्मा, आणि उपाधीच्या विरुद्ध धर्माचा तो
जीवेश्वराचा आत्मा होय. ११ तूं जे ईश्वराचे गुण सांगितलेस, ते
मायेनें आरोपित आहेत असें समज. परमात्मा तर निर्गुण ईश्वर-
स्वरूप आहे. १२ अविद्येनें कल्पिलेले जीवधर्म ते मिथ्या ही खूण
ध्यानांत ठेव. तत्त्वतः जीवाचा निजधर्म तें केवळ ब्रह्मच होय. १३
अविद्येचा अशाश्वतपणा, आणि मायेचा मिथ्या भ्रम ह्यांचा निश्चय
झाला ह्मणजे ओघानेंच अनिर्वचनीयपणा आला. १४ ईश्व-
राचे ठिकाणीं मायिक ईश्वरत्व आणि जीवाच्या ठिकाणीं अविद्या-
मय जीवत्व आलें आहे. ह्या दोहोंचाही लय झाला ह्मणजे
एक केवळ ब्रह्मच उरतें. १५ त्रिविध लक्षणा जो खरोखर जाणतो,

निरुतें ॥ तोचि निरसी भेदातें ॥ येरां भेद भिन्न ॥ १६ ॥ प्रथम ते जहल्लक्षणा ॥ दुसरी अजहल्लक्षणा ॥ जहदजहल्लक्षणा ॥ ते तिसरी पैं ॥ १७ ॥ जहल्लक्षणा बोलिजे त्याग ॥ अजहल्लक्षणा अत्याग ॥ जहदजहल्लक्षणा त्यागात्याग ॥ तेथें बोलिजे ॥ १८ ॥ वाच्यांश त्यागावा जीवाचा ॥ लक्ष्यांश घ्यावा तेथींचा ॥ वाच्यांश सांडिजे ईश्वराचा ॥ घेणें शुद्धांश ॥ १९ ॥ शबलांश सांडिजे ॥ शुद्धांश मांडिजे ॥ जहदजहल्लक्षणा बोलिजे ॥ वेदांतशास्त्रीं ॥ २० ॥ जैसें फोलकट सांडिजे ॥ शुद्ध तांदूळ घेईजे ॥ तैसा उपाधि निरसिजे ॥ स्वीकारिजे शुद्ध चैतन्य ॥ २१ ॥ ह्मणूनि जहदजहल्लक्षणा ॥ हे महावाक्यीं प्रमाण॥ इतर दोनीही लक्षणा॥ नयांचें

---

तोच भेदाचा भेद करतो. इतरांना निराळे भेद पाठीस लागतात. १६ पहिली ती जहल्लक्षणा होय. दुसरी अजहल्लक्षणा, आणि तिसरी जहदजहल्लक्षणा होय. १७ जहल्लक्षणा ह्मणजे त्याग, अजहल्लक्षणा ह्मणजे अत्याग, आणि त्याग व अत्याग ह्यास जहदजहल्लक्षणा असें ह्मणतात. १८ जीवाचा वाच्यांश टाकून देऊन त्याचा लक्ष्यांश घ्यावा. तसाच ईश्वराचा वाच्यांश टाकून शुद्धांश घ्यावा. १९ शबलांश टाकून शुद्धांश घेणें ह्यालाच वेदांतशास्त्रांत जहदजहल्लक्षणा असें नांव आहे. २० ज्याप्रमाणें फोलकट काढून टाकावें व शुद्ध तांदूळ घ्यावा, त्याचप्रमाणें उपाधीचें निरसन करून शुद्ध चैतन्याचा स्वीकार करावा. २१ ह्मणून जहदजहल्लक्षणा हीच महावाक्याचे ठिकाणीं प्रमाण आहे. इतर दोन्हीही लक्षणांचें कांहीं कारण नाहीं.

काज नाहीं ॥२२॥ जो दांडिये बैसला॥ तोचि घोडा आरूढला॥ इतकेन आनु झाला ॥ ऐसें केवीं घडे ॥ २३ ॥ दांडिये घोडा अन्य॥ हें उपाधीचें लक्षण॥तो आपणपां नव्हे भिन्न॥कांहींच जी॥२४॥नातरी काशिये भेटला ॥ तोचि ये देशीं देखिला॥ येतां जातां काय भिन्न झाला ॥ आपणयातें ॥ २५ ॥ तो देश काळ सांडूनी ॥ अन्य देश काळ त्यजूनी ॥ उभयतां एकचि जाणूनी ॥ जैसा भेद निरसे ॥ २६ ॥ तैशी ईश्वरींची निरसावी माया ॥ सर्वज्ञत्वादि तत्कार्या ॥ उरे मायातीत अद्वया ॥ परब्रह्म पैं ॥ २७ ॥ जीवाचें निरसावें अज्ञान ॥ कायसहित विपरीत ज्ञान ॥ त्यजुनी तदुपाधिलक्षण ॥ हे धर्म निरसावे ॥ २८ ॥ उरे जें शुद्ध चैतन्य ॥ तेंचि बोलिजे प्र-

---

२२ जो दांडीवर बसला तोच जर घोड्यावर स्वार झाला तर तितक्यानें तो भिन्न झाला असें कसें घडेल ? २३ दांडी वेगळी, घोडा वेगळा, हा उपाधीचा प्रकार आहे. तो स्वतः तर मुळींच भिन्न झालेला नाहीं. २४ किंवा जो काशींत भेटला त्याचीच ह्या देशांत गांठ पडली, तर तो स्वतः आल्या गेल्यानें भिन्न झाला कीं काय ? २५ तो देशकाल टाकला व हाही देशकाल टाकला, दोन्हीं एकच ह्मणून समजलें ह्मणजे जसा भेद नाश पावतो. २६ तसेंच ईश्वराच्या ठिकाणची माया—सर्वज्ञत्व आदिकरून तिचें कार्य नाहींसें केलें कीं, मायेच्या पलीकडचें अद्वय-एकीएक परब्रह्मच उरतें. २७ जीवाचें अज्ञान व शरीरासहवर्तमान विपरीत ज्ञान ह्याचा निरास केला आणि उपाधीचें लक्षण टाकून त्या धर्माचाही निरास केला, २८

त्यक् चैतन्य ॥ तेणेंसी जाण अनन्य ॥ ईश्वरस्वरूप ॥ २९ ॥ तया प्रत्यक् चैतन्यासी ॥ ऐक्य जेथें पूर्ण चैतन्यासी ॥ जाहले भेद आपुलें निरसी ॥ एकरूपत्वें ॥ ३० ॥ जीवात्मा परमात्मा एक होईल ॥ तेथें दुसरेपण कैसें उरेल ॥ आणि प्रदेशित्व निमेल ॥ तत्क्षणींची ॥३१॥ परमात्मा तंव नित्यानंद ॥ तेथें नाहीं सुखदुःखेंसी संबंध ॥ तरी भिन्नत्वाचा अनुवाद ॥ तेथ केवीं घडे ॥ ३२ ॥ आणि पूर्ण चैतन्यासी ॥ ऐक्य प्रत्यक् चैतन्यासी ॥ तैसें सद्वयत्वें अपरोक्षत्वासी ॥ ऐक्य सिद्धचि असे ॥ ३३ ॥ परमात्मा जो वेगळा ॥ तोचि जीवात्मा झाला ॥ तेथें दुसरेपणें उरला ॥ हें केवीं घडे

---

ह्मणजे जें शुद्धचैतन्य राहतें. त्याला प्रत्यक् ( साक्षात् ) चैतन्य असें नांव आहे. त्याचा व ईश्वररूपाचा कांहींच वेगळेपणा नाहीं. २९ त्या प्रत्यक चैतन्याचें व पूर्णचैतन्याचें ऐक्य झाले ह्मणजे एकरूपत्वानें ते आपले झालेले भेद पार नाहींसे करून टा. कितें. ३० जीवात्म्याचें व परमात्म्याचे ऐक्य झाल्यावर तेथें दुसरेपणा कसा उरणार ? नाहींच. आणि त्याबरोबरच देशकालाचाही निकाल लागतो. ३१ परमात्मा तर शाश्वत आनंदस्वरूप आहे. तेथें सुखदुःखाचें नांवही नाहीं. मग भिन्नत्वाचा प्रश्न कोठून आणावा. ? ३२ आणखी पूर्णचैतन्याबरोबर प्रत्यक् चैतन्याचें ऐक्य होतें, तेव्हां दुसरेपणासहवर्तमान अपरोक्षत्वाला ( ब्रह्मत्वाला ) ऐक्य हें सिद्धच असतें. ३३ वेगळा जो परमात्मा तोच जीवात्मा झाला.

॥ ३४ ॥ जंव परमात्मस्वरूप नेणि ॥ तंव दुसरेपण ऐसें कल्पिजे ॥ जीवात्म्यानें तेंचि होइजे ॥ तेथें परोक्षत्व कैचें ॥ ३५ ॥ घटाभावीं घटाकाश ॥ मठाभावीं मठाकाश ॥ दोहोंच्या निरासीं महदाकाश ॥ एकचि असे ॥ ३६ ॥ तैसें अविद्यामायेचे निरासीं ॥ ऐक्य जीवेश्वरासी ॥ ह्मणूनि जीवेश्वर भेदासी ॥ दे तिळांजुळी ॥ ३७ ॥ एवं कार्योपाधि जीवात्मा ॥ कारणोपाधि परमात्मा ॥ उपाधिनिरासीं तदात्मा ॥ स्वतःसिद्ध ॥ ॥ अविद्या कार्य माया कारण ॥ मिथ्यात्व दोहींचें ॥ तेथें जीवईश्वरांसी ऐक्य जाण ॥ नित्य सिद्ध ॥ ३९ ॥ तत्पदें

तर आतां दुसरेपणा राहिला हें कसें ? ३४ जोंपर्यंत परमात्मस्वरूप जाणिलें नाहीं, तोंपर्यंतच दु भावना. जीवात्म. तेंच झाल्यावर परोक्षपणा येणार कोठून? या अभावीं घटाकाश, मठाच्या अभावीं मठाकाश, आणि दो अभावीं महदाकाश राहतें. व तें एकीएकच असतें. ३६ च अविद्येच्या अभावीं व मायेच्या अभावीं जीवेश्वरांचें ऐक्य होतें ह्मणून जीवेश्वरांच्या भेदाला तिळांजली देऊन टाक न, कार्याची उपाधि ज्याला आहे तो जीवात्मा, कारण-उप आहे तो परमात्मा आणि ज्याला मुळींच उपाधि राहिली स्वतःसिद्ध–( स्वयंभू–मूर्तिमंत ) तदात्मा होय. ३८ अविद्या हें कार्य व माया हें कारण, ह्या दोहोंचेंही मिथ्यापण नाहीं की, तेथें जीवाचें व ईश्वराचें ऐक्य नित्यसिद्धच आहे, असें समज. ३९ तत् पदार्थानें

ईश्वर ब्रह्मासी ॥ त्वंपदें जीव ब्रह्मासी ॥ असिपदें जीवेश्वर ब्रह्मासी ॥ ऐक्य अकृत्रिम जें ॥ ४० ॥ एवं महावाक्याचा अर्थ ॥ तुज निरूपिला तत्त्वंपदार्थ ॥ जेथें भेटे परमार्थ॥ नेटें बोटें ॥ ४१ ॥ कवण ऐसें ह्मणेल ॥ महावाक्यें ब्रह्म भेटेल ॥ तरी हें कैसेनि घडेल ॥ अघटमान ॥ ४२ ॥ जेथें वाचा निवर्तलिया ॥ युक्ति खुंटलिया ॥ हिंपुटी झालिया ॥ चित्त-वृत्ती ॥४३॥ तें वाचें कैसें बोलिजे ॥ मनें नेणुनी जाणिजे ॥ स्वानुभवें अनुभविजे ॥ परमतत्त्व ॥ ४४ ॥ बोलतां शास्त्रें झालीं वेडीं ॥ वेदातांसी पडे बोबडी ॥ तेथें महावाक्यें फुडा-फुडी ॥ केवीं होय ॥ ४५ ॥ ऐसा ऐकतां आक्षेप ॥ तेथें बो-लिजेल साक्षेप ॥ तो न मानावा विकल्प ॥ येथींच्या विषयीं

ईश्वर ब्रह्म आहे, त्वं पदानें जीव ब्रह्म आहे, आणि असिपदानें जी-वेश्वर ब्रह्म आहे ह्मणजे येथें अकृत्रिम ऐक्य ध्यावयाचें. ४० अशा प्रकारें महावाक्याचा अर्थ व तत्त्वं पदांचा भाव तुला सांगितला. तेणेंकरून निश्चयानें परमार्थ हातीं लागतो. ४१ कोणी ह्मणेल कीं, महावाक्यानेंच ब्रह्म भेटेल ह्मणता, तर असें कसें होईल? ही गोष्ट केवळ अशक्य होय. ४२ जेथें वाणी मागें मुरडली, कल्पना जेथें भागल्या, चित्तवृत्ति जेथें बापुडवाण्या झाल्या. ४३ तें वाणीनें कसें सांगावयाचें? मनानें न जाणतांच तें जाणलें पाहिजे. तें परमतत्त्व स्वानुभवानेंच अनुभवविलें पाहिजे. ४४ तें सांगतांना शास्त्रें वेडीं झालीं; वेदातांची बोबडी वळली; तर तेथें महावाक्यानें साक्षात्कार कसा व्हावा? ४५ अशी शंका ऐकून तिचें समाधान आ-

॥ ४६ ॥ परब्रह्म कीर अकथ्य ॥ तें असे यथातथ्य ॥ परी नये अनुभवपंथ ॥ गुरुवाक्येंविण ॥ ४७ ॥ नेति मुखें अनुवादितां ॥ अनात्मा निरसितां ॥ वेदवाक्यासी प्रमाणता ॥ ब्रह्मसाक्षात्कारीं ॥ ४८ ॥ तरी नेति हा अर्थ कैसा ॥ तुज निरूपिजेल जैसा ॥ जेणें उकले आपैसा ॥ संसारबंध ॥४९॥ जें जें मनें जाणिजे ॥ तें तें परब्रह्म नव्हिजे ॥ मनातेंही प्रकाशिजे ॥ प्रकाशें जयाचेनी ॥ ५० ॥ सर्वांतें मिथ्यात्व देखिलें ॥ तें ज्ञान जयासी दृश्य झालें ॥ तेथें परब्रह्म प्रकाशिलें ॥ आपणपांची ॥ ५१ ॥ असे अंधारीं बुडाला ॥ तेणें दीप उजळिला ॥ तरी दीपें तो देखिला ॥ हें नघडेचि

स्थापूर्वक सांगण्यांत येईल. ह्यासंबंधानें विकल्प मानूं नये. ४६ परब्रह्म हें खरोखरी सांगण्यास अशक्य असून तें जसेंच्या तसेंच आहे. परंतु गुरुवाक्यावांचून अनुभवाचा मार्ग सांपडणें नाहीं. ४७ ' नेति ' च्या द्वारें सांगितलें असतां, व अनात्मा ह्मणजे जड जें आहे त्याचा निरास केला असतां ब्रह्मसाक्षात्काराविषयीं वेदवाक्य प्रमाण होतें. ४८ तर आतां ' नेति ' ह्याचा अर्थ काय तो जेणेंकरून संसारपाश आपोआप तुटेल अशारीतीनें तुला सांगण्यांत येईल. ४९ जें जें मनानें जाणलें जातें तें तें परब्रह्म नव्हे असें समज. कारण त्याच्याच प्रकाशानें मन प्रकाशत असतें. ५० सर्वच मिथ्या असें ज्यास कळून चुकलें, हें ज्ञान ज्याच्या अनुभवास पटलें तेथें परब्रह्म आपण होऊनच प्रकाशमान झालें ह्मणून समजावें. ५१ आंधारांत बुडालेल्यानें दिवा लावला तर दिव्यानें त्याला पा-

कीं ॥५२॥ येथें दीपें काय केलें ॥ दृष्टीचें तम फेडिलें ॥ तेथें स्वयेंचि देखिलें ॥ आपणयातें ॥ ५३ ॥ तैसें दीपेंवीण निरुतें ॥ जाणिजे जेवीं आपणातें ॥ तया दीपाही जाणतें ॥ आपणपांची ॥५४॥ तैसें ज्ञानेंवीण स्वरूप ॥ न प्रकाशे आपे आप ॥ ते अज्ञान-निवृत्ति देख पा ॥ ज्ञानेंचि करूनी ॥ ५५ ॥ म्हणूनी ज्ञान, अप्रमाण ॥ हें बोलणें अघटमान ॥ तरी न घडे ज्ञानेंवीण ॥ अज्ञाननिवृत्ति ॥ ५६ ॥ तया ज्ञानातें उपजवी ॥ आत्म-यातें चेतवी ॥ अज्ञानातें दवडवी ॥ श्रीगुरुवाक्य ॥ ५७ ॥ तें प्रमाण गुरुवाक्य ॥ जें महावाक्यासी ऐक्य ॥ येर अनर्थ-वाक्य ॥ पाषांड जाण ॥ ५८ ॥ महावाक्य श्रवणकाळीं ॥

---

हिलेंच असें कधींच होत नाहीं. ५२ येथें दिव्यानें केलें काय, तर डोळ्यांपुढचा अंधार नाहींसा केला! व तेथें आपणच आपल्याला पाहिलें. ५३ तसेंच खरोखर दिव्यावांचून आपल्याला जाणणारे आपणच व त्या दिव्यालाही जाणणार जसे आपणच! ५४ त्याचप्रमाणें ज्ञानावांचून स्वरूप हें आपोआप प्रकाशत नाहीं. ती अज्ञाननिवृत्तिही हें पहा! ज्ञानामुळेंच आहे. ५५ म्हणून ज्ञान हें निर्जीव आहे, हें बोलणेंच अशक्य होय. तर ज्ञानावांचून अज्ञानाचें निरसन व्हावयाचें नाहीं. ५६ तें ज्ञान उत्पन्न करणारें, आत्म्याला जागृति देणारें, अज्ञानाला धुडकावून लावणारें एक श्रीगुरुवाक्यच होय. ५७ तें गुरुवाक्य प्रमाण असून ज्याचें महावाक्याशीं ऐक्य आहे. इतर वाक्यें तीं निरर्थक किंवा अनर्थ उत्पन्न करणारीं होत. तीं पाखांडी म्हणून समज. ५८ महावाक्याचें श्रवण करतांच ज्ञानरूप अग्नीची

उठली ज्ञानाग्नीची ज्वाळां ॥ प्रज्वळे अज्ञानाची होळी ॥ संसारासहित ॥५९॥ प्रपंचातें निरसुनी ॥ परब्रह्मातें पावूनी ॥ कृतार्थ होउनी ॥ मिरवे महावाक्य ॥६०॥ अत्रार्थी निदर्शन॥ एक तुज सांगेन॥करूनि एकाग्र मन॥प्रीतिपूर्वक॥६१॥दंडकारण्यीं असतां ॥ श्रीराम मार्गमेळीं चालतां ॥ पंथींचिया वनिता ॥ पुसती सीतेतें ॥ ६२ ॥ तापसांचिया मांदियाळें ॥ पैळ येताती मनोमेळें ॥ तुज कारण उभे ठेले ॥ कल्पतरूसी॥६३॥ यांमाजीं तुझा भ्रतार ॥ कवण सांगे निर्धार ॥ सफळ होईल संसार ॥ प्राणवल्लभे ॥६४॥ त्या जयातें दाखविती ॥ तो नव्हे सीतेचा पती॥ म्हणूनि असे निरसिती ॥ न येणें शब्दें ॥६५॥

---

ज्वाळा भडकून प्रपंचासहवर्तमान अज्ञानाची होळी होऊन जाते. ५९ प्रपंचाचा नाश करून परब्रह्माशीं गांठ घालून कृतार्थ होत्सातें महावाक्य हें शोभत असतें. ६० ह्याविषयीं तुला एक दृष्टांत सांगतों. मन एकाग्र करून भक्तीनें श्रवण कर. ६१ दंडकारण्यांत असतांना श्रीराम वाटेनें मंडळींतून चालले असतांना मार्गांतल्या बायका सीतेला विचारूं लागल्या. ६२ समोरून ऋषींचा जमाव एकविचारानें येत आहे. कल्पवृक्षासारखी तूं येथें येण्याला हेंच कारण होय. ६३ तर त्यामध्यें तुझा पति कोणता, तें आह्मांला निश्चयानें सांग. तूं आमच्या प्राणांची धनीण. हें सांगितल्यानें आमचा संसार सफळ होईल. ६४ त्या ज्याच्या ज्याच्याकडे बोट दाखवीत तो आपला पति नव्हे ह्मणून सीता न या शब्दानें नकार दाखवीत असे.—नाहीं असें सुचवीत असे. ६५ याप्रमाणें सीतेनें इतर स-

यापरी समस्तां ॥ न म्हणों सरली सीता ॥ रामातें दाखवितां ॥ तन्मय झाली ॥ ६६ ॥ जेथें न म्हणूं सरलें ॥ तेथें येरींही जाणितलें ॥ सीतेनें न सांगूनि सांगितलें ॥ प्राणनाथातें ॥६७॥ यापरी उपनिषदें ॥ प्रपंचातें नेतिशब्दें ॥ निरसूनि ब्रह्मानंदें ॥ मुकीं ठेलीं ॥ ६८ ॥ स्वरूपीं विश्व आभासलें ॥ तें ना म्हणों सरलें ॥ जेथें बोलणें खुंटलें ॥ तें जाण परब्रह्म ॥ ६९ ॥ वेद न सांगून सांगती ॥ ते योगेश्वर नेणून जाणती ॥ म्हणूनि वेदवाक्यें प्रमाणें होती ॥ ब्रह्मसाक्षात्कारीं ॥ ७० ॥ जेथें वेदांसी मुकेपण ॥ तें अकथ्य वस्तूचें कथन ॥ तें परब्रह्म तूं जाण ॥ आपणपांची ॥ ७१ ॥ वाक्येंवीण अनेकविध ॥ दृष्टी पाहतां अनेक भेद ॥ तें नव्हे

---

वांना नकार प्रदर्शित केला. परंतु रामाकडे बोट करतांच तन्मय झाली. बोलेचना ६६ जेथें नकार संपला तेथेंच बाकीच्यांनींही ताडलेंच. ह्मणजे सीतेनें न सांगतांच आपला पति कोणता तें सांगून दिलें. ६७त्याचप्रमाणें उपनिषदें,नेति शब्दांनीं प्रपंचाचा निरास करून ब्रह्मानंदांत बुडून गेलीं ६८स्वरूपाच्या ठिकाणीं विश्वाचा जो भास झाला, तो नाहीं असें ठरून जेथें वाणी खुंटली, तें परब्रह्म ह्मणून समज. ६९ वेद हे न सांगूनच सांगतात, तेंच योगिश्रेष्ठ न जाणूनच जाणतात. ह्मणून ब्रह्मसाक्षात्काराविषयीं वेदवाक्यें प्रमाण आहेत. ७० जेथें वेदांनीं मौन धरलें त्या न सांगतां येण्यासारख्या वस्तूचें सांगणें ह्मणजे तें परब्रह्म तूं स्वतःच आहेस, असें समज. ७१ वाक्यावांचून अनेक प्रकारच्या दृष्टीनें पाहूं गेलें तर अनेक

स्वरूपावबोध ॥ ऐसें जाण तूं ॥ ७२ ॥ ऐकूनि एकाचा होय बंध ॥ परी प्राप्तीविना नव्हे बोध ॥ न करितां प्रपंचनिषेध ॥ स्वरूपप्राप्ति कैंची ॥ ७३ ॥ वेदाचेनि समावेशें ॥ विपरीत दृष्टि नासे ॥ परी अज्ञान न निरसे ॥ सुषुप्तीपरी ॥ ७४ ॥ भवसहित अज्ञानातें ॥ ब्रह्मज्ञान विधुळितें ॥ तयातें उपजवितें ॥ श्रीगुरुवाक्य ॥ ७५ ॥ म्हणूनि महावाक्य प्रमाण ॥ ब्रह्मसाक्षात्कारीं कारण ॥ सकळ प्रपंचाचें निरसन ॥ होय जेणें ॥ ७६ ॥ तथें केवळ ब्रह्मचि उरे ॥ असताचि प्रपंच विरे ॥ अखंड वाक्यार्थ स्फुरे ॥ योगीजनासी ॥७७॥ अहंब्रह्मास्मि ब्रह्माहमास्मि ॥ येथींचा अर्थ ब्रह्मचि मी ॥ ऐसें अन्वयव्यति-

---

भेद होतात. तें काहीं स्वरूपज्ञान नव्हे हें तूं लक्ष्यांत ठेव. ७२ श्रवणानें कोणाच्या चित्ताचा लय तिकडे लागतो खरा पण त्याचा लाभ झाल्यावांचून ज्ञानजागृति होत नाहीं. प्रपंचाची निवृत्ति झाल्याशिवाय स्वरूपाचा लाभ कोठून आणावा ? ७३ वेदाचा अंतर्भाव झाल्यानें विपरीत दृष्टि नाहींशी होते. पण झोंपेप्रमाणें अज्ञान कांहीं नाश पावत नाहीं. ७४ ब्रह्मज्ञान हें प्रपंचासहवर्तमान अज्ञान धुळीस मिळवतें. आणि तें प्राप्त करून देणारें श्रीगुरुवाक्य होय. ७५ ह्मणून महावाक्य हें प्रमाण असून तेंच ब्रह्मसाक्षात्काराला कारण आहे. त्यानेंच दरोबस्त प्रपंचाचें निर्मूलन होतें. ७६ मग केवळ ब्रह्मच राहतें; असत् प्रपंच लयास जातो, व योगीलोक जे आहेत त्यांना अखंड वाक्यार्थाचें स्फुरण होऊं लागतें. ७७ ‘ अहंब्रह्मास्मि ’ ‘ ब्रह्मास्मि ’ ह्याचा अर्थ ब्रह्मच मी आहें. अशाप्रकारें

रेकें ब्रह्मचि मी ॥ ऐक्य बोलती श्रुति द्वय ॥ ७८ ॥ ऐसा अखंडार्थ ॥ हाचि समाधि संप्रज्ञात ॥ ऐसें बोले वेदांत सिद्धांत ॥ बाह्या उभउनी ॥ ७९ ॥ संप्रज्ञात समाधिस्थ ॥ हरि हर ब्रह्मादि नित्यमुक्त ॥ शुभाशुभकर्मी ते अलिप्त ॥ ब्रह्मावबोधें ॥ ८० ॥ ज्ञानविग्रही परेश ॥ तयासि नाहीं गुरूपदेश॥ जो आदिगुरू अविनाश ॥ ह्मणूनि नित्यमुक्त तो ॥ ८१ ॥ ईश्वरींचें अंतःकरण ॥ ब्रह्मादिक तिघजण ॥ तेही नित्यमुक्त जाण ॥ स्वयंबोधें ॥ ८२ ॥ ते मायोपाधि तत्पदार्थ ॥ ह्मणूनि न भुलती परमार्थ ॥ तरी ते नित्यमुक्त हा शब्दार्थ ॥

---

( आठही देहांची उभारणी व संहार ) अन्वयव्यतिरेकपूर्वक ब्रह्मच मी होय. वरील दोन्ही श्रुति ऐक्यच दर्शवितात. ७८ अशा तऱ्हेचा अखंडार्थ हीच संप्रज्ञात समाधि होय, असें वेदांताचा सिद्धांत बाहू उभारून सांगत आहे. ७९ हरिहरब्रह्मा आदिकरून जे नित्ययुक्त ( निरंतर योगारूढ ) ते संप्रज्ञात समाधीमध्येंच गर्क असतात. ते ब्रह्मानुभवेंकरून शुभाशुभ कर्मांपासून अलिप्त असतात. ८० ज्ञान हेंच ज्याचें शरीर आहे तो परमेश्वर होय. त्याला गुरूपदेशाची गरज नाहीं. तो अविनाश आदिगुरु होय. ह्मणून तो नित्यमुक्त आहे. ८१ ब्रह्मा आदिकरून तिघेजण ईश्वराचें अंतःकरण होत. तेही स्वयंबोधानें नित्यमुक्त आहेत म्हणून समज. ८२ ते माया उपाधि असलेले तत्पदार्थ होत. म्हणून ते परमार्थाला चळत नाहीं. तर ते नित्यमुक्त आहेत हा शब्दार्थ व्यर्थ

व्यर्थ न ह्मणावा ॥ ८३ ॥ पूर्वीं जीव मग सुटती ॥ ते जीव-न्मुक्त बोलिजेती ॥ तयांसी ब्रह्मसंविती ॥ श्रीगुरुप्रसादें॥८४॥ उत्पन्न ज्ञानी जे सनकादिक ॥ त्यांसी गुरुप्रसादें सुटिक ॥ जाहली पूर्वजन्मीं देख ॥ ज्ञानद्वारें ॥ ८५ ॥ अशेष प्रारब्ध कर्म ॥ तणें होय देहधर्म ॥ तदनंतर पुरे सीम ॥ यातायाती-ची ॥ ८६ ॥ जे देह असतांचि सुटले ॥ ह्मणूनि जीवन्मुक्त बोलिले॥परब्रह्म जाहले॥सच्चिदानंद॥८७॥स्थूल लिंग कारण॥ हें देहत्रय जीवासी बंधन ॥ आणि कर्म प्रयत्न ॥ तेंही जळे ज्ञानाग्नीनें ॥ ८८ ॥ जैसा वनीं वैश्वानर ॥ पेटल्या करी तृणकाष्ठसंहार ॥ तैसा ज्ञानाग्नीनें संसार ॥ जळे ब्रह्मवंदा-

---

मानूं नये. ८३ प्रथम जीव असून मागाहून मुक्त होतात, त्यांना जीवन्मुक्त असें म्हणतात. त्यांना श्रीगुरुप्रसादेंकरून ब्रह्मज्ञान होतें.

८४ सनकादिक जे जन्मतःच ज्ञानी त्यांचीही गुरुप्रसादेंकरून सुट-णूक झाली, ती पूर्वजन्मीं ज्ञानाच्या द्वारानें झाली, समजलास ?

८५ त्याच्या योगानें सर्व प्रारब्धकर्म व देहधर्म हीं संपतात. व तदनंतर यातायातीचीही अखेर होते. ८६ जे जिवंत असतांनाच मुक्त झाले त्यांना जीवन्मुक्त असें नांव आहे. ते परब्रह्म सच्चि-

दानंदस्वरूपच झाले. ८७ स्थूल, लिंग, आणि कारण ह्या तीन दे-हांचें जीवाला जें बंधन आहे तें आणि कर्माची प्रवृत्ति हीं ज्ञान-रूप अग्नीनें जळून खाक होतात. ८८ जसा अरण्यांत वणवा पेटला ह्म-णजे गवताचा व लांकडांचा सप्पा उडवितो त्याचप्रमाणें ज्ञानरूप

चा ॥ ८९ ॥ अग्नीनें तृण काष्ठ जाळिलें ॥ तें अंगारदशें उरलें ॥ मग तेंही भस्म झालें ॥ अवसरेंकरूनि ॥ ९० ॥ तैसें ज्ञानाग्नीनें जाळिलें ॥ देहत्रय निरसिलें ॥ परी मिथ्यारोप उरलें ॥ दग्ध पट न्यायें ॥ ९१ ॥ दग्ध वस्त्राचें उरलेपण ॥ तें करूं नये प्रावरण ॥ साचासारिखें पण ॥ परी तें नव्हे अनारिसें ॥ ९२ ॥ तैसा देहत्रयाचा ठसा ॥ नव्हेचि तो अनारिसा ॥ परमात्मयासी फांसा ॥ घालूं न शके ॥ ९३ ॥ जैसें भाजलें कणवटें ॥ क्षुधानिवृत्ति घटे ॥ परी शेतीं वानवटे ॥ पेरूं नये ॥ ९४ ॥ तैसा उरे इंद्रिय आकार ॥ तेणें घडे इंद्रिय व्यापार ॥ परी तयासी नाहीं संसार ॥ कदांचि

---

अग्नीनें ब्रह्मादि समूहाचा संसार जळून खाक होतो. ८९ विस्तवानें गवत किंवा लाकूड जळलें म्हणजे तें निखाऱ्याच्या रूपानें राहतें. आणि मग कांहीं कांहीं कालानें त्याचीही राख होऊन जाते. ९० त्याचप्रमाणें ज्ञानरूप अग्नीनें जळून गेलें म्हणजे देहत्रयाचा नाश झाला परंतु मिथ्यारोपमात्र जळलेले वस्त्राचा अवशेष उरतो, त्या न्यायानें राहतें. ९१ जळलेल्या वस्त्राचा अवशेष कांहीं पांघरण्याच्या उपयोगाचा नसतो. बाकी दिसण्यांत खऱ्यासारखेंच असतें व असतेंही तेंच! ९२ त्याप्रमाणें देहत्रयाचा ठसा अगदीं तोच असतो, पण तो परमात्म्याला फासांत पाडूं शकत नाहीं. ९३ भाजलेलें धान्य क्षुधानिवारणास चालतें, परंतु तेंच भाजकट बी शेतांत पेरून चालावयाचें नाहीं. ९४ त्याचप्रमाणें इंद्रियांचा आकार मात्र उरतो, व त्यामुळें इंद्रियांचा व्यापार घडत असतो. परंतु त्याला केव्हांही

वें ॥ ९५ ॥ जरी तूं ऐसें ह्मणसी ॥ अभाव झालिया अ-
ज्ञानासी ॥ तरी पात देहत्रयासी ॥ व्हावा तत्क्षणीं ॥ ९६ ॥
जेथें कारण सरे ॥ तेथें कार्य कैचें उरे ॥ सूत्रतंतूचि उप
संहारे ॥ तेथें पटत्व कैचें ॥ ९७ ॥ येथें ऐक उत्तर ॥ क-
रूनि मन एकाग्र ॥ संदेहसागराचा पार ॥ तेणें पाविजे
॥ ९८ ॥ धनुर्धरें कांडें मोकलिलें ॥ कां हातांतूनि सुटलें ॥
तें कर्मवेगें जैसें धाविन्नलें ॥ गगनमार्गें ॥ ९९ ॥ नातरीं
कुलालचक्राचा भवरा ॥ जैसा भोंवे गरगरा ॥ तैसा कर्मवे-
गाचा उतारा ॥ जंव घरीं असे ॥ १०० ॥ जेथें कर्माचा
वेग सरे ॥ तेथें धांव आपसयाचि पुरे ॥ वर्झणें येणेंचि प्रकारें ॥

---

संसर ह्मणून नाहींच. ९५ आतां तूं जर असें ह्मणत असशील कीं, अज्ञानाचा अभाव झाला तर तात्काल तिन्ही देहांचाही नाश व्हावा-९६ जेथें कारणच नाहींसें झालें तेथें कार्य कसें उरणार ? सूत्रतंतूचाच नाश झाला ह्मणजे पटत्व कसें राहणार? ९७ तर ह्यावर एक उत्तर आहे. मन एकाग्र करून त्या उत्तरानें हा संशयसमुद्र ओलांडून जातां येईल. ९८ तिरंदाजानें कांबीट सोडून दिलें किंवा तें त्याच्या हातांतून निसटलें तर तें कर्माच्या वेगानें जसें आकाशाकडे धांव घेत सुटतें, ९९ किंवा कुंभाराचाकाचा भोंवरा जसा गरगर गर फिरत असतो, त्याचप्रमाणें कर्माचा वेग जोंपर्यंत मूळ ठिकाणीं जसाच्या तसाच आहे. १०० ( तोंपर्यंत तूं ह्मणतोस तसें होत नाहीं ह्मणून ) जेथें कर्माचा वेग खुंटतो तेथें आपोआपच त्याची गतिही खुंटते. ह्याचप्रमाणें देहाची अवस्था आहे असें स-

देहस्थिती ॥ १ ॥ प्रारब्ध कर्माचेनि योगें ॥ देहद्वय धांवूं लागे ॥ तें सरलेया राहे उगें ॥ होय देहपात ॥ २ ॥ जैसा अंगारदशेचा वन्हि ॥ अंगाराचा ग्रास करूनि ॥ निर्वाण-स्वरूपीं विसवुनी ॥ जैसा लीन होय ॥ ३ ॥ तैसा ब्रह्मज्ञान हुताश । करी देहत्रयाचा नाश ॥ गिळूनि स्वसाक्षित्व प्रकाश ॥ लीन होय स्वरूपीं ॥ ४ ॥ ही सायुज्यता मुक्ती ॥ तुज सांगितली निगुती ॥ तेथें नाहीं पुनरावृत्ती ॥ कदाचि पैं ॥ १०५ ॥ इति श्रीमद्विवेकसिंधौ संहारक्रमे गुरुशिष्य-संवादे जीवपरमात्मा तदात्म्यऐक्यविवरणं नाम सप्तमप्रकरणं समाप्तम् ॥ ७ ॥

---

मज. १ आरंभिलेल्या कर्माच्या विशेष योगामुळें दोन्ही देह धांवूं लागतात—चळवळ करीत असतात. तें संपलें कीं चळवळ बंद होते. तो देहपातच होतो. २ जसा निखाऱ्याच्या स्थितींतला विस्तव निखाऱ्याचाही ग्रास करून विझून निर्वाणरूपामध्यें लीन होतो. ३ तसाच ब्रह्मज्ञानरूप अग्नि तिन्ही देहांचा नाश करून निजसाक्षित्वाचाही प्रकाश ( शेषज्ञान ) गिळून टाकून स्वस्वरूपामध्यें लीन होतो. ४ ही सायुज्यता मुक्ति आतांच तुला सांगितली. येथें पुनर्जन्माचा फेरा कालत्रयींही नाहीं असें समज. १०५

# प्रकरण आठवें.

विषयः—भेदखंडनपूर्वक अद्वैतप्रतिपादन.

श्रीगणेशाय नमः ॥ सलोकता समीपता ॥ तिसरी स्वरूपता ॥ या तिहींच्या माथां ॥ कांबी वाजे काळाची ॥ १ ॥ चौथी सगुण सायुज्यता ॥ तेही जाण मायानिर्मिता ॥ तरी या मुक्ती आतां ॥ ह्मणों साच मानिसी ॥ २ ॥ या मुक्तीच परी बंधन ॥ जें न चुके पुनरागमन ॥ जयविजयांसी सांगे पतन ॥ ते कवण ठायाहूनी झालें ॥ ३ ॥ जेतुले आकारासी आलें ॥ तेतुले मायामय ह्मणितलें । विनाशातें पावलें महाप्रळयीं ॥ ४ ॥ जेथें मायाचि संहारे ॥ तेथें लोक

---

श्रीगणेशाय नमः—पहिली सलोकता, दुसरी समीपता, आणि तिसरी सरूपता ह्या तिहींच्याही डोक्यावर काळाचा कमठा वाजत असतो. १ चौथी सगुण सायुज्यतामुक्ति तिलाही मायाच निर्माण करणारी आहे हें ध्यानांत ठेव. आतां कदाचित् ह्या मुक्ति तूं खऱ्या मानशील हो! २ ह्या मुक्तिच खऱ्या परंतु तें बंधन आहे. त्याच्यामुळें पुनरागमन कांहीं चुकत नाहीं. जय व विजय ह्यांस जें पतन घडलें तें कोणत्या ठिकाणाहून सांग पाहूं? ३ जें जें ह्मणून आकारास आलें आहे तें तें सारें मायामय ह्मटलेलें आहे. आणि त्या सर्वांचा महाप्रळयांत संहार होतो. ४ जेथें मायेचाच संहार होतो तेथें

कैंचा उरे ॥ ह्मणुनि मुक्ती वारे ॥ ह्मणें साच मानिसी ॥ ५ ॥ ह्मणूनि निर्गुणसायुज्य ॥ तेचि मुक्ती जाण पूज्य ॥ हें जाणूनि सांडिलें साम्राज्य ॥ पुरूरवादिकीं ॥६॥ जैसा क्षीराब्धीचा तरंग ॥ न होतां आकारासी भंग ॥ क्षीराब्धीसी नाहीं विभाग ॥ ऐक्यभावनेचा ॥ ७ ॥ तैसा मृत्यु न होतां देहासी ॥ ब्रह्म सायुज्यता जीवन्मुक्तासी ॥ तरी देहपात झालिया तयासी ॥ काय अन्य ह्मणूं येईल ॥८॥ तूं ह्मणसी हाचि मोक्ष ॥ परी बंधचि जाण सापेक्ष ॥ तरी साच भेदपक्ष ॥ कां न मानावा ॥ ९ ॥ येथें परिहार सांगन ॥ जें लटिकेंचि बंधन ॥ तेथें मोक्ष तो कवण ॥ साच मानी ॥१०॥

---

लोक कसा उरणार? ह्मणून ह्मणतों कीं, मुक्ति खरी मानशील हो! ५ हें पहा! निर्गुण सायुज्य हीच पूजनीय (खरी) मुक्ति होय. हें जाणूनच पुरूरव्यासारख्यांनीं सार्वभौम राज्याचा त्याग केला. ६ ज्याप्रमाणें क्षीरसमुद्राची लाट आकार भंग न पावता क्षीरसमुद्राला एकरूपतेचा निराळा भाग नसतो, (क्षीरसमुद्राशीं एकरूपच असते) ७ त्याप्रमाणें देहाला मृत्यु न येतां जीवन्मुक्ताला ब्रह्मसायुज्यता प्राप्त होते. मग देह पडल्यानंतर तरी त्यांत कांहीं वेगळेपणा आहे असें ह्मणतां येईल काय? ८ हाच मोक्ष आहे असें तूं ह्मणशील तर तें अपेक्षित बंधनच आहे असें समज. भेदाचा (द्वैताचा) पक्ष खरा कां मानूं नये? ९ हें लटकेंच बंधन आहे तर येथें खरा मोक्ष तो कोणता समजावा ह्याचें निराकरण सांगूं. १० आत्म्याला जें जें बंधन आहे तें तें तर उघडच अज्ञान होय. त्याचा लटकेपणा तर

आत्मयासी जें जें बंधन ॥ तें तंव प्रसिद्धचि अज्ञान ॥ त्यासी तरी लटिकेपण ॥ विस्तारें सांगितलें ॥ ११ ॥ जरी अज्ञान माच होतें ॥ तरी कैसेनि संहारतें ॥ आणि मोक्ष तेणें मतें ॥ केवीं घडे ॥ १२ ॥ जेथें मोक्षचि नाहीं ॥ तेणें मतें काज काई॥ आतां असो काळत्रयीं अज्ञान मिथ्या ॥ १३ ॥ आणिक जीं हीं बंधनें॥तीं ज्ञानोत्पत्तिकाळीं होतीं लीन॥तयांसी सत्यत्व कवणें ॥ प्रकारें होईल ॥ १४ ॥ ठाईचाचि गांव नाहीं ॥ तेथें सीमा पुससी काई ॥ म्हणूनि मोक्षाचि मिथ्या पाहीं ॥ आत्मयासी ॥ १५ ॥ अविद्याकल्पित बंधन ॥ विद्याकल्पित मोक्षसाधन ॥ होती मिथ्यात्वें जाण ॥ मायामयत्वची ॥ १६ ॥ नित्यमुक्त जीवन्मुक्त ॥ हे कडसणी निभ्रांत ॥

---

विस्तारपूर्वक सांगण्यांत आला आहे ११ अज्ञान जर खरें असतें तर त्याचा नाश कसा झाला असता? आणि त्या दृष्टीनें पाहिलें तर मोक्ष तरी कसा संभवतो ? १२ जेथें मोक्षच नाहीं. तेथेंच त्या दृष्टीचें तरी कारण काय ? आतां हें असो. तर अज्ञान हें तिन्हीही काली मिथ्या आहे ३ आणखी हीं जीं बंधनें आहेत, तीं ज्ञानाचा उद्भव झाला कीं लगेच लीन होतात. तेव्हां त्याला सत्यता तरी कोणत्या प्रकारें येईल ? १४ अरे ! जेथें गांवालाच मुळीं पत्ता नाहीं तेथें शिव कोणती म्हणून काय विचारतोस ? म्हणून आत्म्याला मोक्षच मुळीं मिथ्या आहे. १५ बंधन हें अविद्याकल्पित आहे, आणि मोक्षसाधन हें विद्याकल्पित आहे. दोन्हीही मिथ्यारूप मायामयच होत. १६ नित्यमुक्त, जीवन्मुक्त, हे निःसंशय भेद

जे उपाधिभेद् आरोपित ॥ ह्मणोनियां ॥ १७ ॥ जेथें मायेसी मिथ्यात्व ॥ तेथें साच कैसें ईश्वरत्व ॥ तरी ईश्वरीं नित्य-मुक्तत्व ॥ तेंही लटिकें जाण ॥ १८ ॥ प्रत्यक्चैतन्य जीवत्व ॥ तरी तें अविद्या कल्पित ॥ तेथें जीवन्मुक्तत्व ॥ तेंहि लटिकेंचि ॥ १९ ॥ जीवेश्वरासी सद्वयता ॥ हें शबलपक्षीं कल्पितां ॥ ह्मणूनि सांडी भेदवार्ता ॥ तूं सर्वथैव ॥ २० ॥ ऐसा वायांचि करिसी विरोध ॥ जरी ह्मणसी साच भेद ॥ तरी तूं करी पा अनुवाद ॥ पुसिजेल तो ॥ २१ ॥ भेद काय पारमार्थिक ॥ किंवा तो औपाधिक ॥ या दोहींमाजीं पक्ष एक ॥ अंगीकारीं पां ॥ २२ ॥ जरी ह्मणसी पारमार्थिक भेद ॥ परमार्थ तो

---

आहेत. कारण त्याच्यावर उपाधिभेदांचा आरोप केलेला आहे. १७ जेथें मायाच मिथ्या ठरली तेथें ईश्वरत्व तरी खरें कशावरून? आणि मग ईश्वराचा नित्यमुक्तपणा तोही पण लटकाच असें समज. १८ जीवपणा ह्मणजे प्रत्यक् चैतन्य. तेंही पण अविद्याकल्पितच! तेथें जीवन्मुक्तपणा तोही लटकाच. १९ जीवेश्वराच्या ठिकाणीं द्वैत आलें. त्याचा विचार केला असतां तो शबलपक्ष होय. ह्मणून तूं भेदाची गोष्ट अजिबात सोडून दे. २० असा उगाच विरोध करशील व भेद खरा मानशील तर मी विचारीन त्याचा अनुवाद कर पाहूं? २१ पारमार्थिक भेद काय किंवा उपाधिभेद काय ह्या दोहों-पैकीं कोणता तरी एक तूं ग्रहण कर. २२ पारमार्थिक भेद जर ह्मणशील तर परमार्थ हा अद्वय आनंदरूप आहे, असें श्रुतीचें ह्मं-

अद्वयानंद ॥ ऐसा श्रुतीचा संवाद॥ह्मणून सांडी कुमत हें॥२३॥ सबाह्याभ्यन्तरब्रह्म ॥ एकमेवाद्वितीयं ब्रह्म ॥ इत्यादि श्रुति परमार्थाचें वर्म ॥ अद्वय बोलती ॥ २४ ॥ नेहनानास्तिकिंचन ॥ ऐसें श्रुतीचें वचन ॥ भेदातें करितसे निरसन ॥ तरी भेदु साच कैसा ॥ २५ ॥ वेदवाक्यासी विरुद्ध ॥ तो पक्ष नव्हे प्रमाणसिद्ध ॥ ह्मणोनि भेदाचा निषेध ॥ करिती महानुभाव ॥२६॥ माया अविद्येचा निरासीं ॥ ब्रह्मचि होणें जीवेश्वरांसी ॥ तरी कवण प्रकारें त्यांसी ॥ भेद उरेल ॥२७॥ ह्मणूनि पारमार्थिक भेद ॥ बोलतां थोर असे प्रमाद ॥ तरी सांडी हा मिथ्यावाद ॥ जो विरुद्ध श्रुतीसी ॥ २८ ॥ जरी ह्मणसी औपाधिक भेद ॥ तरी आमचाचि पक्ष होय सिद्ध ॥ एत-

---

णणें आहे. ह्मणून कुमत ( वाईट वेदबाह्यमत ) टाकून दे. २३ ' सबाह्याभ्यन्तरब्रह्म ', ' एकमेवाद्वितीय ब्रह्म ' इत्यादि श्रुति परमार्थाचें कर्म अद्वय—अद्वैत—आहे असें सांगतात. २४ ' नेहनानास्ति किंचन ' हें श्रुतिवाक्य भेदाचा निषेध करतें. मग भेद खरा कसा मानावा ? २५ जो वेदवाक्याला विरुद्ध तो पक्ष कांहीं प्रमाणसिद्ध नव्हे ह्मणून महानुभव ( सिद्धब्रह्मज्ञानी ) जे आहेत ते भेदाचा निषेध करतात २६ माया अविद्येचा अस्त झाला ह्मणजे जीव व ईश्वर ब्रह्मस्वरूपच आहे. मग त्यांस भेद कसा राहील ? २७ म्हणून पारमार्थिक भेद म्हणावयास गेलें तर महत् अपराध होतो.तर श्रुतीस विरुद्ध असलेला हा मिथ्या वाद टाकून दे. २८ आतां उपाधिभेद

द्विषयीं विषाद ॥ आथीचिना ॥ २९ ॥ मायोपाधि ब्रह्म तो शिव ॥ अविद्योपाधि ब्रह्म तो जीव ॥ आणि माया अविद्येचा स्वभाव ॥ तो तंव मिथ्याभूत ॥ ३० ॥ एवं मिथ्यात्व उपाधीसी ॥ उपाधिजनित भेदासी ॥ सत्यत्व होय ऐसी ॥ युक्ती न घडे ॥ ३१ ॥ ह्मणोनि ईश्वरेंसी ॥ भेद मिथ्या सकळ जीवांसी ॥ आणि त्या परब्रह्मासी ॥ लटिकाचि पैं ॥ ३२ ॥ तसेंचि जीवेश्वरांसी ॥ आणि परब्रह्मेंसी ॥ याचि परी परस्परेंशी ॥ भेद मिथ्याचि पैं ॥ ३३ ॥ एवं पंचविध भेदासी ॥ लिपी पुशिली मिथ्यात्वेंसी ॥ ब्रह्म तें अद्वयाचि परियेसीं ॥ जाण आपण पैंची ॥ ३४ ॥ यापरी स्थावर जंगमासी ॥ परस्परें चेतन अचेतनासी ॥ भेद मायामय

---

घेतलास तरीही आमचाच पक्ष सिद्ध होतो. ह्याविषयी शंका नाहींच. २९ मायोपाधिक ब्रह्म तो शिव, अविद्योपाधिक ब्रह्म तो जीव होय. मायेचा व अविद्येचा स्वभाव तर मिथ्याभूतच आहे. ३० एवंच उपाधीलाच जर मिथ्यात्व येतें तर उपाधिजनित–उपाधीपासूनच झालेला जो भेद ( द्वैत ) त्याला तरी सत्यता येईल अशी गोष्ट दिसत नाहीं. ३१ म्हणून ईश्वराला आणि सर्व जीवांना भेद हा मिथ्या आहे. आणि तो त्या परब्रह्मालाही पण लटकाच आहे. ३२ त्याचप्रमाणें जीव, ईश्वर, आणि परब्रह्म त्यानाही ह्याचप्रमाणें परस्परांशीं मिथ्याच भेद आहे. ३३ अशा प्रकारें पंचविध भेद हीं अक्षरेंच मिथ्या ह्मणून पुसून टाकली ह्मणजे शेवटीं स्वतःसिद्ध अद्वय ब्रह्मच आहे. ३४ याप्रमाणें स्थावराला व जंगमाला तसेंच

जाणसी ॥ सकळ लटिकाचि ॥ ३५ ॥ आणीक सांगिजेल उपपत्ती ॥ जेणें भेदासीचि होय निवृत्ती ॥ अद्वयस्वरूपाची स्थिती ॥ बुझसी आपसयांची ॥३६॥ भेद सत् कीं असत् ॥ किंवा तो सदसत् ॥ इहीं तिहीं पक्षीं विकल्पित ॥ परी लटिकाचि तो ॥ ३७ ॥ सत् तरी निजाकारें असता ॥ किंवा विनाश पावता ॥ विनाशाची उभयावस्था ॥ तो भेद काय ॥ ३८ ॥ निजाकारें वर्ततु ॥ जरी भेद होय सतु ॥ तरी देख असों नासतु ॥ आकार हा ॥ ३९ ॥ विनाशातें पावत ॥ जरी भेद होय असत् ॥ तरी साचाचि आमुचा सिद्धांत ॥ भेद सत् न ह्मणावा ॥ ४० ॥ विनाशाची उत्त-

---

चेतनाला ( चंचलाला ) व अचेतनाला ( जडाला ) परस्पर मायामय भेद आहे, आणि तो सारा लटकाच आहे, समजलास. ३५ जेणेंकरून भेदाचीच निवृत्ति होईल, व त्या केवळ स्वरूपाची स्थिति तुला आपोआपच समजून येईल, अशा आणखीही उपपत्ति सांगूं. ३६ भेद सत् आहे कीं असत् आहे कां तो सदसत्ही आहे, ह्या तिन्ही पक्षांच्या शंकांनीं तो युक्त आहे खरा. परंतु तो लटकाच आहे. ३७ सत् आहे ह्मणावा तर तो निजाकारानें असतांना काय किंवा नाश पावला असतांना काय त्याचा दोन्हींही अवस्थांत नाश हा आहेच. तेव्हां तो भेद आहे कशाचा ? ३८ बरें; निजाकारानें असणारा भेद जर सत् ह्मटला तर हें पहा! आकार हा नाशास जाणारा आहे. ३९ बरें; नाशास जाणारा भेद असत् ह्मटला तर आमचा सिद्धांत खराच आहे. तर भेद हा सत् मानूं नये. ४०

रावस्था ॥ तो भेद सत् हें ह्मणतां ॥ तरी वंध्याकुमाराची सुरतता ॥ ग्राच कां न मानावी ॥ ४१ ॥ ह्मणुनि भेद सत् हें वचन ॥ तिहीं विकल्पीं नव्हे प्रमाण ॥ द्वितीय पक्षीं दूषण ॥ तें आइक पा तूं ॥ ४२ ॥ असत् भेद बोलिजेता ॥ तरी स्वपक्षीं असे वर्तता ॥ प्रत्यक्ष देखिजत असतां ॥ हा असत् ऐसा ॥ ४३ ॥ बोलतां सदसत भेद ॥ उपजे जे स्ववाक्यीं विरोध ॥ ह्मणुनि सांडी हा शब्द ॥ जो मिथ्या द्वैतेंसी ॥ ४४ ॥ कवणीया परी न निर्वेच ॥ भेद मिथ्या हें साचें ॥ जैसें आडंबर स्वप्न भेदाचें ॥ नाथिलेंचि ॥ ४५ ॥ स्वप्न सत्य ह्मणूं तरी नसे ॥ असत्य ह्मणूं तरी

---

नाशाच्या पलीकडची अवस्था तो भेद सत् आहे असें मानले तर वंध्यासुत मैथुन तरी खरें कां मानूं नये ? ४१ ह्मणून तिन्हीही शंकांनीं भेद सत् आहे हें बोलणें अप्रमाण होय. आतां दुसऱ्या पक्षीं दूषण आहे तें तूं श्रवण कर. ४२ भेद जर असत् ह्मटला गेला असता तर तो आपल्याच पक्षाचा झाला असतां, आणि तो असत् आहे असा प्रत्यक्षच दिसला असता. ४३ बरें; भेद सदसत् मानला असतां, तर आपल्याच वाक्याला विरोध येतो. ह्मणून हें ह्मणणें सोडून दे. कारण तो मिथ्या द्वैतमय आहे. ४४ कोणत्याच प्रकारानें निवड करतां येत नाहीं. तर मग जसें स्वप्नभेदाचें औडंबर मिथ्याच असतें तसाच भेद हा मिथ्या आहे हेंच खरें. ४५ स्वप्न सत्य ह्मणावें तर नाहींसें होतें, असत्य ह्मणावें तर भासतें. बरें; सदसत् असें विरुद्धाविरुद्ध आहे ह्मणावें तर तें घडणेंच अशक्य.

आभासे ॥ सदसत्विरोधी वसे ॥ हें अघटमान ॥४६॥ स्वप्नीं नाहीं तेंचि दिसे ॥ परी निद्रिस्थासी साच भासे ॥ तैसें नाशवंत परी भासे ॥ अज्ञान जनासी ॥ ४७ ॥ आतां असो हा विस्तार ॥ जग जीव आणि ईश्वर ॥ हा अशेष मायीक व्यवहार ॥ तो तंव लटिकाचि कीं ॥ ४८ ॥ ह्मणूनि भेद सजातीय ॥ याचि परी विजातीय ॥ स्वगत भेद तृतीय ॥ नाहीं केवळ ब्रह्मीं ॥ ४९ ॥ स्वरूपीं भेद सजाती ॥ नानात्व तो विजाती ॥ हा द्विविध भेद मिथ्या स्थिती ॥ बोलिलों विस्तारें ॥ ५० ॥ स्वगत भेद विरहित ॥ परब्रह्म अनावृत ॥ तें तंव स्वयें प्रकाशित ॥ असे ह्मणूनिची ॥ ५१ ॥ विजातीय सजातीय स्वगत ॥ येणें त्रिविध भेद विवर्जित ॥ अहंता मम-

४६ स्वप्नात नाहीं तेंच दिसतें पण तें झोंपेंत असलेल्यास खरेंच वाटतें. तसें नाशिवंत असून अज्ञान लोकांना खऱ्याप्रमाणें भासत आहे. ४७ असो. आतां हा विस्तार पुरे. जगतांतील जीव व ईश्वर हा सगळा मायेचा बाजार आहे. आणि तो तर लटकाच! ४८ ह्मणून सजातीय, तसाच विजातीय भेद, तिसरा स्वगत भेद हे केवळ ब्रह्मामध्यें मुळींच नाहींत. ४९ स्वरूपाच्या ठिकाणी असलेला भेद सजातीय, नानाप्रकारें करून असणारा भेद विजातीय होय. हा मिथ्याभूत दोन प्रकारचा भेद विस्तारपूर्वक सांगितला. ५० परब्रह्म हें मूळचेंच प्रकाशित आहे ह्मणूनच तें स्वगतभेदरहित व अनावृत ह्मणजे कशानेंही आच्छादिलें जाणारें नव्हे असें आहे. ५१ सजातीय, विजातीय व स्वगत हे त्रिविध भेद जेथें नाहींत; जें अहंता,

ता भाव रहित ॥ परब्रह्म चिन्मात्र जें ॥ ५२ ॥ जेथें अनु- वाद खुंटला ॥ विवाद समूळ सरला ॥ झगडा तुटला ॥ षड्- दर्शनांचा ॥ ५३ ॥ मी तूं इत्यादिक व्यवहार ॥ तेथें नाहीं साचार ॥ हे उठती मायिक अंकुर ॥ जेणें आधारें ॥ ५४ ॥ जें सर्व जीवांचें जीवन ॥ जगज्जनकाचें जन्मस्थान ॥ आनं- दाचें निधान ॥ केवळ ब्रह्म जें ॥ ५५ ॥ जेथींचा विवर्त हें विश्व ॥ जें सर्वेश्वराचें सर्वस्व ॥ तें ब्रह्म दीर्घ ना ऱ्हस्व ॥ निराकार पैं ॥ ५६ ॥ जयातें उपपादितां ॥ चतुराननही वक्ता ॥ शिणला तत्त्वतां ॥ अगाध ह्मणूनी ॥ ५७ ॥ जेथें नेणणें निमालें ॥ जाणणेंही खुंटलें ॥ जें स्वयें प्रकाशिलें ॥ आपणपांची ॥५८॥ जें आशेपावेगळें ॥ अशेष जें आगळें ॥

---

ममता, व भावरहित, जें चिन्मात्र परब्रह्म; ५२ जेथें अनुवाद (प्रति- भाषण ) संपला; विवाद मुळासकट नाहींसा झाला; आणि साही दर्शनांचा तंटा मिटला. ५३ मी तूं इत्यादि व्यवहाराचें येथें खरो- खर नांवही नाहीं. हे मायेचे अंकुर ज्याच्या आश्रयानें उद्भवतात. ५४ जें सर्व जीवांचें जीवन; जें जगाच्या पित्याचें ( ईश्वराचें ) ज- न्मस्थान; जो आनंदाचा ठेवा; जें केवळ ब्रह्म होय. ५५ विश्व हें जेथचा विवर्त; जें सर्वेश्वराचें सर्वस्व; तें ब्रह्म मोठेंही नाहीं व लहानही नाहीं, तर केवळ आकाररहित; ५६ ज्याचें वर्णन करतां करतां तें अगाध ह्मणून ब्रह्मदेव चार तोंडांनीं बोलणारा तो सुद्धां खरो- खर थकला; ५७ जेथें न जाणणेंही मेलें; व जाणणेंही राहिलें; जें आपण होऊनच आपणाला प्रकाशमान झालें; ५८ जें सर्वांहून

झालेपण नाथिलें ॥ तेथें तेंचि तूं ॥ ५९ ॥ जंव जंव जाणूं जाइजे ॥ तंव तंव कांहींच नव्हिजे ॥ जाणणें विसरिजे ॥ तें स्वरूप तूं ॥६०॥ जें ज्ञानाज्ञानासी वेगळ ॥ तेंचि परमज्ञान केवळ ॥ तें स्वयंज्योति निर्मळ ॥ परब्रह्म तूं ॥६१॥ जें सर्वत्र असे ॥ परी कांहींचि न दिसे ॥ कांहीं न दिसून प्रकाशे ॥ तेंचितें पैं ॥ ६२ ॥ जें सुखदुःखातीत सुख ॥ तेंचि तें केवळ परब्रह्म देख ॥ देखणेंही निःशेष ॥ जेथें निमाले ॥ ६३ ॥ जें जें मनें मांडिजे ॥ तें तें सकळही सांडिजे ॥ सांडलें सांडिलिया उरिजे ॥ तेंचि तें तूं ॥ ६४ ॥ जें जें दृश्य देखिजे ॥ तें तेणेंचि असिजे ॥ असूनिही नसिजे ॥ कांहींच नेणों ॥६५॥

---

पलीकडचें व सर्वांहून विशेष; जेथें झालयाचा नसताच आरोप आला आहे, तेथचें जें तेंच तूं होस. ५९ जों जों जाणावयाला जावें तों तों तें कांहींच नव्हे असें आहे. जाणण्याचा विसर पडला कीं, तेंच तुझें स्वरूप. ६० जें ज्ञानाहून व अज्ञानाहून वेगळें तेंच केवळ परमज्ञान होय. तें निर्मळ स्वयंप्रकाश परब्रह्म तूं होस. ६१ जें सर्व ठिकाणीं आहे पण दिसत नाहीं मुळींच. जें मुळींच न दिसतां प्रकाशित होणारें तेंच तें होय. ६२ जें सुखदुःखांच्या पलीकडचें सुख, तेंच केवळ परब्रह्म असें समज. जेथें समजणें सुद्धां सर्वस्वी नाहीसें होतें. ६३ जें जें मनानें उभारावें तें तें झाडून सारें सोडून द्यावें. तें सोडलें व सोडल्यानंतर जें उरलें तेंच तूं होस. ६४ जें जें दृश्य पहावें तें तें असावें तेंच. पण तें तेंच असूनही जणो काय कांहींच नाहीं असें आहे. ६५ दुसरेपणाचें

दुसरेपणाचें लागलें पिसें ॥ तेंपण सांडणें आपैसें ॥ सांडणें सांडिलिया असे ॥ तें ज्ञप्तिरूप ॥ ६६ ॥ जें करणें ना करविते ॥ भोगणें ना भोगविते ॥ तेंचि तें जाणतें ॥ तें आत्मस्वरूप तूं ॥ ६७ ॥ तें उष्ण ना शीतळ ॥ सूक्ष्म ना स्थूळ ॥ तें प्रपंचा वेगळ ॥ निजस्वरूप तूं ॥ ६८ ॥ जें नियम्य ना नेमक ॥ व्याप्य ना व्यापक ॥ कांहींच न होऊनि कांहीं एक ॥ तें स्वरूप तूं ॥ ६९ ॥ जें हाले ना चाले ॥ चळे ना ढळे ॥ युक्तीसी न कळे ॥ कवणाचिये ॥ ७० ॥ जेथें युक्ती खुंटली ॥ अहंता गळाली ॥ तेथं ज्ञप्ति प्रकाशली ॥ आपणपाचि ॥ ७१ ॥ जें ध्येय ना ध्याता ॥ चिंत्य ना चिंतिता ॥

---

वेड लागलेलें आहे, तेंपण ( दुसरेपण ) आपोआप सोडून दिलें. आणि सोडून दिल्यावर जें राहतें तें ज्ञप्तिरूप; ६६ ज्याला करणेंही नाहीं व जें करवीतही नाहीं. भोगणेंही नाहीं व भोगवीतही नाहीं, तेंच तें जाणतें आत्मस्वरूप तूं होस. ६७ तें उष्णही नाहीं, थंडही नाहीं; सूक्ष्मही नाहीं, स्थूळही नाहीं; तें प्रपंचाच्या पलीकडचें निजस्वरूप तूं होस. ६८ जें नियमबद्धही नव्हे व नियामकही नव्हे; व्यापलें जाणारेंही नव्हे; व व्यापकही नव्हे; कांहीं नसून सर्व कांहीं एकच असणारें तें स्वरूप तूं होस. ६९ जें हालतही नाहीं, चालतही नाहीं, चळतही नाहीं, ढळतही नाहीं आणि कोणत्याही ज्ञानाला आकळत नाहीं; ७० जेथें ज्ञानाची मजल थकली; अहंता गळून गेली, तेथें ज्ञप्ति स्वयमेव प्रगट झाली. ७१ जें ध्येयही नव्हे, ध्याताही नव्हे; चिंत्यही नव्हे, चिंतन करणारेंही नव्हे. तर तें आतां कशासारखें

तरी कासयासारिखें आतां ॥ बोलावें तें ॥७२॥ जें हेतुदृष्टांत-विवर्जित ॥ अनुपम्य सुखभरित ॥ द्वैताद्वैतरहित ॥ परम तत्त्व ॥ ७३ ॥ जें क्षराचिये वाटे ॥ कांहींच न भेटे ॥ तें अनु-भवाचियें पेठे ॥ मिळे स्वात्मरूप ॥ ७४ ॥ बोलावयाचेनि काजें । जंव जंव स्वरूप आठविजे ॥ तंव तेथांचि बुडिजे ॥ बोलावें कवणें ॥ ७५ ॥ असो हें स्वरूपवर्णन ॥ ब्रह्म तें अकथ्य जाण ॥ जाणूनि कांहींच नेण ॥ तें अनिर्वाच्य तूं ॥ ७६ ॥ सर्वांतें प्रसवलें दिसे ॥ वेगळेंही न प्रकाशे ॥ ब्रह्म जें स्वयें असे ॥ तेंचि तूं पैं ॥ ७७ ॥ इति श्रीमद्विवेकसिंधौ संहारक्रमे गुरुशिष्यसंवादे भेदखंडनपूर्वकं अद्वैतप्रतिपादनं नाम अष्टमप्रकरणं समाप्तं ॥ ८ ॥

---

आहे ह्मणून सांगावें? ७२ हें दृष्टांताच्याही पलीकडचें; अनुपमेय सुखानें परिपूर्ण; द्वैताद्वैतरहित परमतत्त्व होय. ७३ नाशिवंताच्या वाटेला जें कधींच दृष्टीस पडावयाचें नाहीं, तें स्वात्मरूप अनुभवाच्या पेठेंत पहावयास मिळतें. ७४ सांगावयाच्या निमित्तानें जों जों आ-ठवावयास जावें तों तों तेथेंच बुडावयास होतें. तेव्हां सांगावें कोणीं? ७५ हें स्वरूपाचें वर्णन पुरे. ब्रह्म हें सांगण्यास अशक्य आहे हें लक्ष्यांत आण. हें पहा! जाणून मुळींच न जाणणें तें अनिर्वाच्य स्व-रूप तूं. ७६ सर्वांना त्यानेंच जन्म दिला आहे. पण वेगळेंही दि-सत नाहीं. तर जें स्वयमेव ब्रह्म तेंच तूं होस. ७७

# प्रकरण नववें.

विषयः—महाद्वैतप्रतिपादन

॥ श्रीगणेशाय नमः ॥ आतां सांगिजेल कौतुक ॥ तें तूं एकाग्र ऐक ॥ जें ऐकिलिया सकळ होय एक ॥ केवळ ब्रह्म जें ॥ १ ॥ जंव जीवेश्वर उपाधीसी ॥ ऐक्य नेणिजे उभयांसी ॥ तंव ऐक्य तत्त्वंपदार्थासी ॥ तें मनोरथ मात्र ॥ २ ॥ ह्मणोनि समस्त उपाधींसी ॥ ऐक्य कार्यकारणांसी ॥ जाणावया परमतत्त्वासी ॥ स्वयें अद्वैत सिद्ध ॥ ३ ॥ ईश्वरदेह ब्रह्मांड ॥ जीवाचे सकलही पिंड ॥ स्थूल भूतांचें दळवाड ॥ ह्मणोनि ऐक्य तयां ॥ ४ ॥ स्थूल भूतें तीं कारण ॥ पिंड ब्रह्मांड तें कार्य जाण ॥ तरी कार्यकारणांसी कवण ॥ भेद

---

श्रीगणेशाय नमः—आतां एक कौतुक सांगण्यांत येईल. तें तूं एकाग्र चित्तानें श्रवण कर. तें ऐकल्यानें सर्व कांहीं एक केवळ ब्रह्मच होऊन राहतें. १ ह्मणून जीवेश्वर आणि उपाधि ह्या उभयांमध्यें ऐक्य आहे हें ठाऊक नसतें, तोपर्यंत तत्त्वपदार्थांचें ऐक्य ह्मणजे केवळ मनोराज्य होय. २ ह्मणून सर्व उपाधींचें, कार्यकारणांचें ऐक्य आहे. परमतत्त्व जाणावयाला अद्वैत हें जातीनें तयार आहे. ३ ईश्वराचा देह जें ब्रह्मांड तें व जीवांचे सर्वही पिंड हे स्थूळ भूतांचे समुदाय होत. ह्मणून त्यांचें ऐक्य आहे. ४ स्थूलभूतें तीं कार-

बोलिजे ॥ ५ ॥ कार्य नाहीं कारणेंविण ॥ म्हणूनि तेणेंसी तें अभिन्न ॥ सूतवस्त्राचेनि दर्शनें ॥ जाणावें ऐसें ॥६॥ नातरी सुवर्ण आणि भूषण ॥ तें कांहींच नव्हे अन्य ॥ तैसें ब्रह्मांडेंसी भिन्न ॥ नव्हती पिंड ॥ ७ ॥ ब्रह्मांडींची अवस्था उत्पत्ती ॥ तेचि पिंडीं जाण जागृती ॥ तयासी ऐक्यत्व स्थिती ॥ हें बोलावें नलगे ॥ ८ ॥ अभिमानी जो विश्व ॥ तो चतुराननाचा अंश ॥ तयासी ऐक्य हा विश्वास ॥ बीजांकुरन्यायें ॥ ९ ॥ हिरण्यगर्भ प्रभूचा लिंगदेह ॥ ऐक्यभाव निःसंदेह ॥ सकळ जीवसमूह ॥ जाणावें ऐक्यरूप ॥ १० ॥ जैसें लोहाग्नीचें स्फुलिंग ॥ लोह पिटितां उठती अनेक ॥

---

ण, आणि पिंडब्रह्मांड हें त्यांचें कार्य आहे. तर कार्यकारणाला भेद कोण म्हणेल ? ५ कार्य हें कारणावांचून नाहीं. म्हणून तें त्याहून भिन्न नाहीं. सूत व वस्त्र ह्यांच्याच उदाहरणाप्रमाणें समजावें. ६ किंवा सोनें व त्याचा दागिना हे मुळींच भिन्न नाहींत. त्याचप्रमाणें पिंड हे ब्रह्मांडाहून भिन्न नाहींत. ७ ब्रह्मांडाची उत्पत्ति अवस्था तीच पिंडामधील जागृति अवस्था होय. तेव्हां त्यांची एकरूपता आहे हें सांगणें नकोच. ८ विश्व हा तेथचा अभिमानी. तो ब्रह्मदेवाचा अंश होय. तेव्हां बीजांकुरन्यायानें त्यांच्या ऐक्याविषयीं खात्री आहेच. ९ हिरण्यगर्भ हा ईश्वराचा लिंगदेह होय. तेथें निःसंशय एकरूपता आहे. सर्व जीवसमूहही ऐक्यरूपच आहेत. १० ज्याप्रमाणें तापविलेल्या लोखंडातून तें घणानें पिटलें म्हणजे अनेक ठिणग्या बाहेर पडतात, किंवा गंगेच्या लाटा कांहीं गंगे-

नातरी गंगेचे तरंग ॥ नव्हती गंगेतीत ॥ ११ ॥ तैसे हिर-
ण्यगर्भाचे अंश ॥ ते प्रसिद्ध जीवकोश ॥ आत्मा पावे गर्भ-
वास ॥ संगें जयाचेनी ॥ १२ ॥ हिरण्यगर्भाचें प्रतिपालन ॥
तयाचा अंश जीवाचें स्वप्न ॥ ह्मणूनि जीवेश्वरांचें एकचि
जाण ॥ अवस्थाद्वय ॥१३॥ लिंगदेहाचा अभिमानी तैजस ॥
तोचि सकळही विष्णूचा अंश ॥ तयासी ऐक्य निःशेष ॥
कार्यकारणन्यायें ॥ १४ ॥ महत्तत्वरूप प्रकृती ॥ तिचा
अंश जीवाची अज्ञानशक्ति ॥ तयासी ऐक्य हे निश्चिती ॥
करणेंचि नलगे ॥ १५ ॥ महाप्रळय तो सर्वसंहार ॥ सुषुप्ती
तयाचा अवतार ॥ तयासी ऐक्य हा निर्धार ॥ बोलणेंचि
नलगे ॥ १६ ॥ संहारकर्ता महेश ॥ प्राज्ञ तयाचा अंश ॥

---

हून भिन्न नसतात. ११ त्याचप्रमाणें प्रसिद्ध जीवकोश ते हिर-
ण्यगर्भाचे अंश होत. त्यांच्या योगानें आत्मा गर्भवास भोगीत
असतो. १२ हिरण्यगर्भाचें जें संरक्षण त्याचाच अंश जीवाचें
स्वप्न होय. ह्मणून जीवाच्या व ईश्वराच्या दोन्ही अवस्था
एकच समजाव्या. १३ लिंगदेहाचा अभिमानी तैजस तोच सर्वही
विष्णूचा अंश होय. तेथें कार्यकारणन्यायानें पूर्ण ऐक्य आहे,
१४ महत्तत्वरूप प्रकृति तिचाच अंश जीवाची अज्ञानशक्ति होय.
त्याचें ऐक्य आहे. ह्याचा निश्चय करायलाच नको. १५
महाप्रळय ह्मणजे सर्वच गोष्टींचा संहार होय. झोंप ही त्याचीच
प्रतिमा ! त्यांचें ऐक्य आहे, हा निश्चय सांगण्याचीच गरज नाहीं.
१६ महेश हा संहार करणारा होय. आणि प्राज्ञ हा त्याचाच अंश.

हे दोघे अहंकार तामस ॥ ह्मणूनि ते एकरूप ॥ १७ ॥ प्रभूची शक्ति महामाया ॥ तेचि जीवीं आत्मज्ञानाची छाया ॥ तयेसी भेद बोलती वायां ॥ ते मूढजन ॥ १८ ॥ ईश्वरीं जी सर्वसाक्षिता ॥ तियेची प्रतिरूप तुरीया अवस्था ॥ तयासी ऐक्यरूपता ॥ तुवां जाणिजसु ॥१९ ॥ एवं जीवेश्वर-उपाधींसी ॥ ऐक्य जेथें उभयांसी ॥ तरी तदुपाधि जीवेश्वरांसी ॥ भेद कवण करील ॥ २० ॥ तंव बोले शिष्यचक्रवर्ती ॥ ज्या महासांख्यांच्या नानाश्रुति ॥ भेदातें सत्यत्वें बोलती ॥ मिथ्या कैशा म्हणाव्या ॥ २१ ॥ द्वा सुपर्णा सयुजा सखाया ॥ एवमादिक श्रुति गुरुराया ॥ भेद सत्य बोलती तरी काय या ॥ अप्रमाण ॥ २२ ॥ तंव अनाथाचा

हे दोघेही तामस अहंकार होत. ह्मणून ते एकरूप आहेत. १७ महामाया ही ईश्वराची शक्ति होय. जीवामध्यें आत्मज्ञानाची छाया दिसून येते ती तीच. मूढ लोक तिला उगाच भेद लावतात. १८ ईश्वराचें जें सर्वसाक्षित्व, त्याचेंच प्रतिबिंब तुर्यावस्था होय. तेथें एकरूपताच आहे, हें ध्यानांत ठेव. १९ अशाप्रकारें जीवेश्वर व उपाधि ह्या उभयतांचें जेथें ऐक्य आहे तेथें तदुपाधि जीवेश्वराला भेद कोण लावील ? २० तेव्हां शिष्यराजश्रेष्ठ ह्मणाले " महाराज ! महासांख्याच्या नाना श्रुति ( उपश्रुति ) भेद सत्य आहे असें मानतात, तर त्या खोट्या कशा ह्मणाव्या ? २१ गुरुमहाराज ! ' द्वासुपर्णा सयुजा सखाया ' इत्यादि श्रुति भेद सत्य मानतात, तर त्या काय अप्रमाण समजावयाच्या कीं काय ? २२ तेव्हां अनाथां-

वेळाईत ॥ बोले श्रीगुरुनाथ ॥ सांगिजेल श्रुतिसंकेत ॥ तो ऐक पा तूं ॥ २३ ॥ आधीं पूर्वपक्ष उद्भविजे ॥ मग तो सर्वथैव दूषिजे ॥ स्वतःसिद्ध प्रतिपादिजे ॥ तदनंतर ॥ २४ ॥ ऐसा वेदशास्त्राचा समाचार ॥ ह्मणूनि श्रुती करितसे भेदाचा उच्चार ॥ करूनि मग तयासी मार ॥ करी सर्वथैव ॥ २५ ॥ द्वा सुपर्णा सयुजा ॥ हे श्रुति पूर्वपक्षीं बुझा ॥ तरी तेथविषयीं दुजा ॥ भाव आथीचिना ॥२६॥ एकमेवाद्वितीयं ब्रह्म॥ भेदातें ही श्रुति करीतसे भस्म ॥ ह्मणूनि भेदवादियाचे धर्म ॥ सांडी पापरूप ॥२७॥ आतां वचन एक ऐक ॥ बोलिजेल जें सार्थक ॥ जेणें पुरे कौतुक॥ ऐक्यवादाचें ॥२८॥ हिरण्यगर्भ लिंगदेहावीण ॥ ब्रह्मांड पिंड नव्हे जाण ॥ पिंड कार्य ब्रह्मांड कारण ॥ म्हणूनि

---

च्या हाकेला धांवणारे श्रीगुरुनाथ ह्मणालेः—" आतां श्रुतीचा निश्चय सांगण्यांत येईल तो तूं ऐक." २३ प्रथम पूर्वपक्ष उत्पन्न करावयाचा व मग सर्व बाजूंनीं त्याचें खंडन करावयाचें. तदनंतर जें स्वतःसिद्ध त्याचें प्रतिपादन करावयाचें. २४ अशी वेदशास्त्राची पद्धति आहे. ह्मणून श्रुति भेदाचा उल्लेख करिते. व मग त्यावर सर्वबाजूंनीं मारा करते. २५ 'द्वासुपर्णा सयुजा' हा श्रुतीचा पूर्वपक्ष आहे असें समज. तर त्याविषयीं दुसरा भाव ह्मणून नाहींच. २६ 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' ही श्रुति भेदाला मिथ्या ठरविते, ह्मणून भेदवादी जे आहेत त्यांचे पापरूप धर्म टाकून दे. २७ आतां एक कृतकृत्यतेचें बोलणें बोलण्यांत येईल, तें श्रवण कर. तेणेंकरून ऐक्यवादाची हौस पूर्ण होईल. २८ हिरण्यगर्भ आणि लिंगदेह ह्यां-

ऐक्य तया ॥२९॥ स्थिति स्वप्नावस्थेपासाव ॥ तेथींचे सांगेन अवयव ॥ सृष्टि जागृती हें नांव ॥ जयांसी बोलिजे ॥ ३० ॥ तूं ह्मणसी जे स्वप्नावस्था ॥ ते तंव जागृतीचा उलथा ॥ तरी जागृती तत्कार्य व्यवस्था ॥ केवीं घडे ॥ ३१ ॥ येथें सांगेन परिहार ॥ स्वप्नरूपाचा निर्धार ॥ मनासी विषयाचा व्यवहार ॥ तें स्वप्न बोलिजे ॥ ३२ ॥ मनीं विषयवासना स्फुरे ॥ मग धांवे इंद्रियाचेनि द्वारें ॥ बुद्धीसी बाह्य विषयाचें ज्ञान स्फुरे ॥ ते जागृती जाण ॥३३॥ ह्मणूनि स्वप्नावस्था कारण ॥ जागृती तत्कार्य जाण ॥ तयासी ऐक्य हें निर्वचन ॥ बोलणें नलगे ॥३४॥ विष्णु तैजसाचा तनय ॥ ब्रह्मा विष्णु हे अद्वितीय॥

---

वांचून ब्रह्मांड व पिंड हीं नाहींतच हें ध्यानांत ठेव. पिंड हें कार्य व ब्रह्मांड हें कारण होय. ह्मणून त्यांचें ऐक्य आहे. २९ स्वप्नावस्थेतील जी स्थिति तिचे अवयव ( पृथक् पृथक् भाग ) आतां सांगतों. त्यांना सृष्टि व जागृति असें नांव आहे. ३० तूं ज्याला स्वप्न–अवस्था ह्मणतोस, तो तर जागृतीचा टोला असतो खरा. तरी जागृतावस्थेंत त्यांतील कार्यांची अवस्था कशी होणार ? ३१ ह्याविषयीं स्वप्नरूपाच्या निश्चयाचें समाधान सांगतों. तर मनाला विषयाचा जो सहवास घडतो तें स्वप्न होय. ३२ मनामध्यें विषयाची वासना स्फुरूं लागते व मग ते इंद्रियांच्या द्वारानें धांव घेत सुटते. बुद्धीला बाह्य विषयाचें ज्ञान स्फुरूं लागणें, हीच जागृति समज. ३३ ह्मणून स्वप्नावस्था हें कारण, व जागृति हें तिचें कार्य आहे हें ध्यानांत ठेव. त्यांचें ऐक्य निर्विवाद आहे, हें सांगणें नकोच. ३४

एवं पिता पुत्र अद्वय॥तन्न्यायें ऐक्य तयां॥३५॥स्वप्नावस्था अंकु-
र॥तो हिरण्यगर्भाचा विस्तार॥तोही अज्ञानलिंगाचा व्यवहार॥
वटबीजन्यायें ॥ ३६ ॥ ह्मणूनि माया अविद्येसी ॥ हिरण्यगर्भ
लिंगदेहासी ॥ ऐक्य परस्परेंसी ॥ तें स्वभावसिद्ध ॥ ३७ ॥
प्रळय सुषुप्ती या कारण॥स्थिती स्वप्नावस्था तत्कार्य जाण॥
तेथें ऐक्याचें निर्वचन ॥ करणेंचि नलगे ॥ ३८ ॥ विष्णु
तैजसाची उत्पती ॥ ते रुद्र प्राज्ञापासाव उपजती ॥ सत्वर-
जासी तमीं स्थिती ॥ ह्मणूनि ऐक्य तयां ॥ ३९ ॥ अज्ञान
अव्याकृतातें ॥ आत्मज्ञान मूलमायाजनितें ॥ ह्मणूनि तया-
सी ऐक्य निरुतें ॥ जाणावें पैं ॥४०॥ प्रळय सुषुप्ती व्यालिया॥

---

विष्णु हा तैजसाचा पुत्र होय. ब्रह्मा विष्णु हे अद्वितीय ह्मणजे एकरूपच आहेत. अशाप्रकारें पिता-पुत्र हे कांहीं दोन नाहींत. ह्या न्यायानें त्यांचें ऐक्यच आहे. ३५ स्वप्न अवस्था हा अंकुर होय. तो हिरण्यगर्भाचा विस्तार, तोही अज्ञानमय वासनेचा वटबीजन्यायानें खेळ आहे. ३६ ह्मणून माया, अविद्या, हिरण्यगर्भ, लिंगदेह ह्यांचें परस्पराशीं स्वभावसिद्धच ऐक्य आहे. ३७ प्रळयरूप सुषुप्ति ही कारण, व स्वप्नावस्थेची स्थिति हें तिचें कार्य होय. त्याच्या ऐक्याचा निश्चय करावयालाच नको. ३८ विष्णु तैजसापासून झाला व ते दोघे रुद्र व प्राज्ञ ह्यांपासून उत्पन्न झाले. सत्वाचें व रजाचें तमाच्या ठिकाणीं वास्तव्य ह्मणून त्यांचेंही ऐक्य आहे. ३९ अज्ञान अव्याकृताचें व आत्मज्ञान मूळमायेस जन्म देणारें असल्यामुळें त्यांचें निश्चयपूर्वक ऐक्य आहे ह्मणून समजावें. ४०

सर्वसाक्षित्व आणि तुरिया ॥ कार्यकारणभावें तया ॥ जाणावें ऐक्यरूप ॥ ४१ ॥ रुद्र प्राज्ञाचें माहेर ॥ प्रत्यगात्मा सर्वेश्वर ॥ तयासी ऐक्य निरंतर ॥ असतचि असे ॥ ४२ ॥ जया कारणाचें कार्य ॥ तें तेणेंसी जाण अद्वय ॥ या सकळातें गुणसाम्य ॥ प्रसवलें जाण पैं ॥ ४३ ॥ एवं कार्यकारणासी ॥ ऐक्य बोलिजे मायामयेसीं ॥ तरी तदुपाधि जीवेश्वरांसी ॥ ऐक्य सिद्धचि ॥ ४४ ॥ शबलही तत्त्वंपदार्थासी ॥ ऐक्य जेथें उभयांसी ॥ तेथें शुद्ध जीवेश्वरचैतन्यांसी ॥ ऐक्य न बोलतां लाभे ॥ ४५ ॥ आतां असो हा ब्रह्मींचा विवर्त ॥ गुणसाम्यादि समस्त ॥ प्रपंच ब्रह्मेंशीं व्यतिरिक्त ॥ तो कांहींच नव्हे ॥ ४६ ॥ जें जें जेणेंवीण

प्रलयरूप सुषुप्तीपासून झालेल्या सर्वसाक्षित्व आणि तुर्या ह्यांचे कार्यकारणभावानें ऐक्यच आहे. ४१ रुद्र प्राज्ञाचें माहेर होय. आणि प्रत्यगात्मा सर्वेश्वर ह्यांचें निरंतरचें ऐक्य आहेच आहे. ४२ ज्या कारणाचें जें कार्य तें त्याच्याशीं अगदीं एकरूपच असतें. ह्या सर्वांना गुणसाम्यानें जन्म दिला हें ध्यानांत ठेव. ४३ अशाप्रकारें कार्यकारणाला, मायामय ह्मणून जें आहे त्याला ऐक्य आहे असें समजावें. मग तदुपाधि जीवेश्वराला ऐक्य सिद्धच आहे. ४४ जेथें शबल तत्त्वंपदार्थांना सुद्धां परस्पर ऐक्य आहे तेथें शुद्ध जीवेश्वर व चैतन्य ह्यांस न बोलतांच ऐक्य प्राप्त होतें. ४५ आतां हा ब्रह्माचा विवर्त असूं दे. तर गुणसाम्यादि सर्व प्रपंच ब्रह्माशीं अगदीं एकरूप आहे. ४६ जी ज्याच्याशिवाय नाहीं तीच ती वस्तु

नाहीं ॥ तेंचि तें वस्तु पाही ॥ यापरी सकळ ब्रह्मही ॥ प्रपंचजात ॥ ४७ ॥ जैसा रज्जूवीण सर्प ॥ कांहींच न भासे तो आरोप ॥ ह्मणूनि रज्जूचि तद्रूप ॥ ऐसें जाणावें ॥ ४८॥ नातरी आपुलेनि आंगें ॥ जळचि तरंगाकारें होलागे ॥ तैसें ब्रह्म आभासूं लागे ॥ प्रपंचाकारें ॥ ४९ ॥ अलंकाराचीं कुसरी ॥ सोनेंचि भास नानापरी ॥ तैसें पाहतां तत्त्वनिर्धारीं ॥ ब्रह्मचि विश्वरूप हें ॥ ५० ॥ मूळाकडूनि पाहतां वृक्षाचि पानें खांदिया समस्ता ॥ ऐक्य ऐसें तत्त्वतां ॥ अनुभवासि ये ॥ ५१ ॥ वृक्षाग्रेंकडूनि पाहिजे ॥ तंव खांदियांसी भेद देखिजे ॥ एकचि वृक्षासी विभागिजे ॥ अवयवभेदें ॥ ५२ ॥ तैसें एकचि ब्रह्मलिंगातें ॥ विस्तारिती

---

हें ध्यानांत ठेव. ह्याचप्रमाणें प्रपंचजात व सर्व ब्रह्मही समज. ४७ दोरीवांचून सर्पाचा आरोप शून्यवत्च होय. ह्मणून दोरी हेंच त्याचें रूप समजावें. ४८ नाहीं तर पाणी स्वतःच लाटेचा आकार होऊं लागतें, तसेंच ब्रह्म प्रपंचाकार भासूं लागतें. ४९ दागदागिन्यांच्या कौशल्यानें सोनेंच निरनिराळ्या रूपानें भासमान होतें, तसेंच तत्त्वनिश्चय पाहूं गेलें तर हें ब्रह्मच विश्वरूप आहे. ५० मूळाकडून पाहूं लागलें तर पानें, डाहळ्या सर्व वृक्षच आहे. येणेंप्रमाणें तत्त्वतः ऐक्यच अनुभवास येतें. ५१ शेंड्याकडून पाहूं गेलें तर डाहळ्यांमध्यें भेद दृष्टीस पडतो. एकच वृक्ष अवयवभेदानें विभागलेला असतो. ५२ तसें एकच ब्रह्म पण त्याच्या लक्षणाचा नानामतांनीं विस्तार केला आहे. पण ती एकंदर माया ह्म-

नाना मतें ॥ तीं फुडीं माया–संकळितें ॥ ऐसें जाणिजे ॥ ५३ ॥ सर्व खल्विदं ब्रह्म ॥ या श्रुतिवादासी आलें वर्म ॥ ह्मणुनि भेदवादियाचें मत नाम ॥ तूं ह्मणें घेसी ॥ ५४ ॥ पुरुष एवेदं सर्वं ॥ हे श्रुतिवादियाचे गर्व ॥ सांडविती ह्मणुनि अपूर्व ॥ अद्वैत मत पैं ॥ ५५ ॥ ब्रह्मैव संसरति ॥ ब्रह्मैव विमुच्यत इति ॥ हे श्रुति भेदातें असे ग्रासिती ॥ ह्मणुनि सांडावें तें ॥ ५६ ॥ यापरी हें अद्वैत ॥ जयांसी अनुभवलें निश्चित ॥ ते जाणावे मूर्तिमंत ॥ परब्रह्म पैं ॥ ५७ ॥ प्रपंच उपसंहारे ॥ केवळ ब्रह्मचि उरे ॥ तें जाणावें चतुरें ॥ अद्वैतमत पैं ॥ ५८ ॥ महाद्वैत अनारिसें ॥ येथें केवळ ब्रह्मचि प्रकाशे ॥ प्रपंचनिरासाचें पिसें ॥ नलगे

---

णून ठाम समजावें. ५३ 'सर्व खल्विदं ब्रह्म' ह्या श्रुतिवचनापाशीं वर्म आलें.ह्मणून भेदवाद्याचे मताचा उच्चार चुकून करशील हो एखादा! तर तसें करूं नको. ५४ ' पुरुषएवेदं सर्वं ' ही श्रुति वाद करणाराचा गर्व हरण करते ह्मणून अद्वैतमत हें अपूर्व आहे. ५५ ब्रह्मैव संसरति, ' ब्रह्मैव विमुच्यत ' इत्यादि ह्या श्रुति भेद गिळून टाकतात. ह्मणून तो टाकून द्यावा. ५६ आणखी हें अद्वैत ज्याच्या निश्चयानें अनुभवास आलें तें मूर्तिमंत परब्रह्म ह्मणून समजावें. ५७ तेणेंकरून प्रपंचाचा संहार होतो, व केवळ ब्रह्मच राहतें, तें शाहण्यांनीं अद्वैतमत असें जाणावें. ५८ महाद्वैत तें वेगळें. येथें केवळ ब्रह्मच प्रकाशमान होतें. येथें प्रपंचाचा नाश करण्याची भानगड

तेथ ॥ ५९ ॥ साचेंवीण नाहीं लटिकें ॥ म्हणूनि ओ-
ळखावें तयातें मोटकें ॥ ऐसें ज्ञान होय नेटकें ॥ तें महाअ-
द्वैत ॥ ६० ॥ जैशा आपुल्याचि लहरी ॥ पाणियासी नये
सरी ॥ तैसें इंद्रियांचे व्यापारीं ॥ न लिंपे योगिराज ॥६१॥
नातरी आपुलेनि तेजें॥जैसा अग्नि न पोळिजे॥तैसा योगीश्वर
न लिंपिजे ॥ पुण्यपापातें ॥६२॥ जें अग्नीसी वेगळें ॥ तेंचि
अग्निसंगें जळे ॥ मा अग्नि केवीं पोळे ॥ निजतेजें पैं ॥६३॥
तैसें सर्वब्रह्म जिहीं जाणिजे ॥ स्वयं ब्रह्म आपण होईजे ॥
तिहीं कैसेनि बुडिजे ॥ भवसागरीं ॥ ६४ ॥ जयासी सकळ
ब्रह्म झालें ॥ तयासी वेगळें काय उरलें ॥ एकांत सेवणें ला-
गलें ॥ हें आथीचिना ॥६५॥ मन जेथें जेथें जाईल ॥ तेथें

येथें पडत नाहीं. ५९ खऱ्याशिवाय लटकें नाहींच. म्हणून तेंच ने-
मकें ओळखावें. अशाप्रकारचें जें उत्कृष्ट ज्ञान तें महाअद्वैत होय.
६० ज्याप्रमाणें लाटा त्याच्याच खऱ्या पण पाण्याला कांहीं बाध
येत नाहीं; तसाच इंद्रियांच्या व्यापारानें योगिश्रेष्ठ लिप्त होत नाहीं.
६१ किंवा आपल्याच उष्णतेनें विस्तव जसा पोळत नाहीं, तसाच
योगिश्रेष्ठ पुण्यानें पापानें लिप्त होत नाहीं. ६२ जें अग्नीहून वेगळें
तेंच अग्नीनें जळेल. नाहीतर आपल्याच उष्णतेनें अग्नि पोळेल
काय? ६३ त्याचप्रमाणें ज्यांनीं अखिल ब्रह्म जाणलें ते स्वयंब्रह्मच
होऊन राहिले. ते संसारसमुद्रांत कसे काय बुडणार? ६४ ज्यांना
सर्वच ब्रह्म होऊन चुकलें त्यांना वेगळें तें काय राहिलें? त्यांना ए-
कांत सेवावा लागला हें व्हावयाचेंच नाहीं. ६५ मन जेथें जेथें

तेथें ब्रह्मचि स्फुरेल ॥ तरी समाधि न लगेल ॥ घालणें तया ॥ ६६ ऐक तयाची प्रचीती ॥ जनकाचिया राज्यस्थिती ॥ नाना संभ्रमें संवित्ती ॥ डंडळेना ॥ ६७ ॥ यद्यपि केतुल अवसर ॥ जरी स्वरूपीं पडेल विसर ॥ तितुकेनि तया संसार ॥ नाकळूं सके ॥ ६८ ॥ कवण एकाची अंतुरी ॥ मी सुवासिनी ऐसें विसरली जरी ॥ तितुकेनि वैधव्य- दुःखसागरीं ॥ केवीं बुडे ते ॥ ६९ ॥ तैसी रजतमाची आवृत्ती ॥ क्षणएक आवरी संविती ॥ तितुकेन तया संसृती ॥ काय बोलूं ये ॥ ७० ॥ स्वात्मानुसंधानासरिसीं ॥ कर्में जळती आपैसीं ॥ तया संसृति कायसी ॥ बोलिजेल ॥ ७१ ॥ स्वप्नींचीं कर्में विचित्रें ॥ अशेष जळती प्रबोधमात्रें ॥ तयांसी प्रायश्चित्त आणिकें शास्त्रें ॥

---

जाईल, तेथें तेथें ब्रह्मभावनाच होईल. तर त्याला समाधि धारण करावी लागणार नाहीं. ६६ त्याचा अनुभव ऐक. जनक राजाच्या राज्यव्यवस्थेमध्यें नानाप्रकारच्या भानगडी असत तरी त्याची चित्तवृत्ति ढळत नसे. ६७ कितीही वेळपर्यंत जरी स्वरूपाचा विसर पडला तरी तेणेंकरून त्याला संसाराची बाधा होऊं शकत नाहीं. ६८ कोणा एकाची बायको आपण सवाष्ण असल्याचें जरी विसरली तरी तितक्यानें ती वैधव्यदुःखसमुद्रांत कशी बरें बुडेल ? ६९ त्याचप्रमाणें रजतमांची आवृत्ति ( फिरफिरून येणें ) क्षणभर स्वरूपज्ञानावर आच्छादन घालतात, पण तेवढ्यानें त्यास संसार काय लागेल ! ७० स्वात्मानुसंधानाबरोबर आपोआपच कर्में जळून जातात, मग त्याला संसाराची गोष्ट काय बोलावी? ७१ स्वप्नांतील

कवणें बोलिजे ॥ [illegible] ॥ जे कोवळ ज्ञानें आथिले ॥ तरी नें- व्हती संसारासी [illegible] ॥ पूर्ण बोधें ब्रह्म झाले ॥ तें बोलावें काय ॥ ७२ [illegible] होईजे जेणें आंगें ॥ बैसिका तेणेंचि बागें ॥ [illegible] अवस्थालगें ॥ न बाधिजे योगिराज ॥ ७४ [illegible] पडिलें ॥ तृण काष्ठाग्नीची आतळे ॥ तैसें पू[illegible] ब्रह्म झालें ॥ प्रपंचजात ॥ ७५ ॥ प्रवेशतां आपुल[illegible] ॥ रायातें कवण निवारी ॥ जरी राखणाइत सह[illegible] ॥ असती कोटिसंख्या ॥ ७६ ॥ तैसी संप्रज्ञात स्फु[illegible] ॥ [illegible] कवण निषेधी ॥ पूर्णबोधाशी निजबोधा [illegible] कीं ॥ ७७ ॥ असतां इंद्रिय-

---

विलक्षण कर्मे जागृ[illegible] जळून जातात. त्यांना प्रायश्चित्त दुसऱ्या कोणत्य[illegible] सांगावें? ७२ सूक्ष्माचें ज्ञान झालें तरी जे संसारापासून दूर [illegible] नाहीत. ते पूर्णबोधानें ब्रह्मच झालेले असतात, त्यांचे [illegible] काय करावें? ७३ जो स्वतः मार्गानें चालत आहे त्याणें [illegible] त्याचप्रमाणें कोणत्याही अवस्थेच्या योगानें योगिश्रेष्ठ [illegible] होत नाहीं. ७४ जें अग्नीमध्यें पडलें तें तृण, काष्ठ [illegible] होऊन जातें, त्याचप्रमाणें दरोबस्त प्रपंच पूर्णबोधासहवर्तमान ब्रह्मच होऊन बसलें! ७५ कोट्यावधि पहारेकरी सर्व सरंजामासहवर्तमान जरी असले तरी राजा आपल्या महालांत शिरला तर त्याला मज्जाव कोण करणार? ७६ तसेंच संप्रज्ञात समाधि प्रगट झाल्यावर मग कोण दोष लावणार? पूर्ण बोधासह स्वात्मानुभव देणारी ती समाधि स्वतंत्रच आहे. ७७ इंद्रिय-

व्यापार ॥ परी तो ब्रह्मरूपें व्यवहार ॥ पूर्णबोधासी संसार ॥ परमार्थेचि ॥७८॥ एवं द्विधा समाधीचिया ॥ तैसी चालतां नेती घडिया ॥ तळीं उपर जाणविती तया ॥ उपनिषदें ॥७९॥ तो सर्वेश्वराचा अवतार ॥ जाण पूर्णबोधें योगींद्र ॥ कटाक्षमात्रें संसारज्वर ॥ फिटे जयाचेनी ॥ ८० ॥ तेणेंसी दर्शन स्पर्शन । जयासी घडे संभाषण ॥ तयाचें पापविध्वंसन ॥ होय क्षणमात्रें ॥८१॥ सकलही तपें तीर्थें ॥ भवनिरासीं नव्हती समर्थें ॥ तें करावें श्रीगुरुनाथें ॥ एकें पूर्णबोधेंची ॥८२॥ ऋषभ देवाचिये परी ॥ निर्विकल्प दशा उठे जरी ॥

---

व्यापार सुरू असतोच पण तो सारा ब्रह्मरूपमयच व्यवहार असतो. पूर्णबोधाबरोबर संसार परमार्थरूपच होऊन जातो. ७८ अशा-प्रकारें दोन प्रकारच्या समाधींच्या ( संप्रज्ञात व असंप्रज्ञात ) त्याला चालतांना पायघड्या घातलेल्या असतात; आणि उपनिषदेंही त्याला उंचसखल सांगणारीं ( चोपदार ) होत. ७९ जो पूर्णबोधानें योग्यांचा इंद्र होऊन बसला तो सर्वेश्वराचा अवतार होय, हें ध्यानांत ठेव. ज्याच्या नुसत्या कृपाकटाक्षानें संसाराचा ताप लयास जातो ८० त्याचें दर्शन, किंवा स्पर्श, किंवा ज्याचें त्याच्याशीं संभाषण घडेल त्याचें एका क्षणांत पाप धुळीला मिळेल. ८१ सर्वेही तपें व तीर्थें संसारनाश करावयास समर्थ नाहींत. तें एका पूर्ण-बोध श्रीगुरुनाथांनींच करावें. ८२ ऋषभ देवाप्रमाणें जर निर्विकल्प स्थिति प्राप्त होईल तर चिन्मात्र असें जें ब्रह्म तें तेव्हांच ब्रह्मज्ञाना-

तें ब्रह्मज्ञानाचा ग्रास करी ॥ ब्रह्म चिन्मात्र जें ॥ ८३ ॥ कर्म-
शेषें देहीं वर्तती ॥ परी ते कर्मबंध नेणती ॥ देहीं विदेह-
मुक्ती ॥ ऐसें यातें ह्मणिजे ॥ ८४ ॥ विदेहमुक्ताचें शरीर ॥
चिरकाल नव्हे स्थिर ॥ तये चरमदशेचा योगीश्वर ॥ विर-
ळाचि पैं ॥ ८५ ॥ निर्विकल्प दशेविण ॥ जीवन्मुक्ताचें कां-
हींच नव्हे न्यून ॥ ते ब्रह्मचि होती आपण ॥ तेथें न्यून ते
काय ॥८६॥ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति ॥ विमुक्तश्च विमुच्यत इति॥
हें श्रुतिद्वय जीवन्मुक्ती ॥ बोलिजे पूर्णबोधासी ॥ ८७ ॥ नि-
र्विकल्प दशेविण सुटिका ॥ जरी न होती पैं ऐका ॥ तरी
कां न राहती शुकादिक देखा ॥ तथाविपर्यी ॥ ८८ ॥ न स्फु-
टती जे चरम दशेविण ॥ ऐसें बोलती विवेकहीन ॥ तया

---

चा ग्रास करून टाकील. ८३ शेषकर्मामुळें ते देहामध्यें वर्तत अ-
सतात, परंतु कर्माचें बंधन त्यांस मुळींच माहित नसतें. देहामध्यें
असतांना विदेहमुक्ति असें ह्याला नांव आहे. ८४ विदेहमुक्ताचें
शरीर कांहीं चिरकाल रहात नाहीं. त्या चरम ( शेवटच्या ) दशेचा
योगेश्वर एखादाच! ८५ निर्विकल्पदशेवांचून जीवन्मुक्ताचें उणें
असें कांहींच नसतें. ते स्वतःच ब्रह्म होऊन असतात मग तेथें
उणें तें काय असणार? ८६ 'ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति,' 'विमुक्तश्च
विमुच्यत इति' ह्या दोन श्रुति जीवन्मुक्ताच्या ठिकाणीं पूर्णबोध
सांगतात. ८७ निर्विकल्पदशेवांचून जर सुटका झालीच नसती तर
हे पहा! शुकादिक मंडळी तेथेंच राहिली नसती काय? ८८ चरम
दशेवांचून मुक्त होत नाहींत असे जे विवेकशून्य ह्मणतात त्या धी-

धीटवादियातें कवण ॥ दंडीता ॥८९॥ शुको मुक्तो वामदेवो मुक्त॥हें श्रुति वाक्य ऐसें बोलत॥शुक नेणे तरी भागवत ॥ कवणें निरूपिलें ॥ ९० ॥ ऋषभदेव प्रतिपाद्य ॥ हें श्रुतीचेनि संवादें ॥ वामदेवादिक ब्रह्मानंदें ॥ निवाले पैं ॥ ९१ ॥ वामदेवादि योगीश्वर ॥ नव्हती अंध मुके बधिर ॥ निर्विकल्प दशा निरंतर ॥ हें तंव तयासी नाहीं॥९२॥ तरी वेदीं जीवन्मुक्त बोलती ॥ तेथविषयीं नाहीं उपपत्ती ॥ ह्मणूनि सांडी दे हे भ्रांती ॥ संशयरूप ॥ ९३ ॥ प्रत्यक्षादिक प्रमाणें ॥ तयांसी संभवती दूषणें ॥ तरी श्रुतिवाक्यासी कवणें ॥ आरोपिजेल ॥९४॥ काच आणि कमळादिक ॥ प्रत्यक्षासी दोष

---

टवाद्यांना कोण शासन करणार ? ८९ 'शुको मुक्तो वामदेवो मुक्तः' असें श्रुतीचें वचन सांगत आहे. शुकाला जर माहित नसतें तर भागवताचें निरूपण कोणीं केलें ? ९० ऋषभ देवांनीं प्रतिपादिलेलें हें श्रुतिसंवादयुक्त, जेथें वामदेवादिक ब्रह्मानंदानें शांति पावले, ९१ वामदेवादिक ऋषि कांहीं आंधळे, मुके, किंवा बहिरे नव्हते. निरंतर निर्विकल्पदशाही तर त्यांस नव्हतीच. ९२ तर वेदामध्यें जीवन्मुक्त ह्मटलें आहे, ह्याविषयीं कांहीं उपपत्ति नाहीं. ह्मणून ही संशयरूप देहाची भ्रांति टाकून दे. ९३ प्रत्यक्षादिक जीं प्रमाणें आहेत त्यांना दूषणें उद्भवतात. तरी श्रुतिवाक्यांवर कोणीं आरोप करावा. ? ९४ हे पहा! काच आणि कमल आदिकरून प्रत्यक्षाला दोष आहेतच. परंतु विवेकशून्य असतात ते त्यांसच प्रमाण मान-

देख ॥ तयातें हीनविवेक ॥ मानिती प्रमाणें ॥ ९५ ॥ पांचवें जें अनुमान ॥ तयासी प्रत्यक्ष असे दूपण ॥ तयासी स्वतंत्र कवण ॥ निगमीं बोलिलें ॥ ९६ ॥ अर्थातीं उपमान ॥ तेथें सादृश्यादि प्रमाण ॥ ह्मणूनि सत्ता प्रमाण जाण ॥ वेदें बोलिजे ॥ ९७ ॥ तथापि श्रुत्यनुसारें ॥ अप्रमाणें होतीं प्रमाणांतरें ॥ ह्मणूनि स्वतंत्र प्रमाण चतुरें ॥ वेद जाणावा ॥ ९८ ॥ प्रमाणांतराची अपेक्षा ॥ श्रुतीसी नाहीं विवक्षा ॥ ह्मणूनि निरापेक्षा ॥ तूंचि एक ॥ ९९ ॥ वेदासी मानी अखंड ॥ तें न मानिती जे पाखंड ॥ तया धीटवादियांचें तोंड ॥ काय निवांत राहे ॥ १०० ॥ आतां असो हा युक्तिप्रसंग ॥ जीवन्मुक्त सर्वत्र निःसंग ॥ सरे कर्मप्रारब्ध वेग ॥ तंवचि

---

तात. ९५ पांचवें जें अनुमान त्याला प्रत्यक्ष हें दूषण आहे. त्याला स्वतंत्र असें कोणत्या वेदांत ह्मटलेलें आहे? ९६ अर्थाच्या शेवटीं उपमान येतें. त्याला सादृश्यादिक प्रमाण असतें. म्हणून वेदानें सत्ताप्रमाण ह्मटलें आहे. ९७ तथापि श्रुतीला अनुसरून इतर प्रमाणें हीं अप्रमाणें होत. म्हणून शहाण्यांनीं वेद हेच स्वतंत्र प्रमाण समजावें. ९८ इतर प्रमाणाची जरूर आणि विवक्षा ( अपवाद ) श्रुतीला नाहीं. म्हणून निरपेक्ष असा तूंच एक आहेस. ९९ वेदाला अखंड प्रमाण कर. जे पाखांडी ते मानीत नाहींत त्या धीटवाद्यांचें तोंड काय गप्प राहणार थोडेंच? १०० आतां हा युक्तिवाद राहूं दे. जीवन्मुक्त हे सर्वत्र संगरहित असतात खरे, पण

वर्ते ॥१॥ प्रारब्ध संचित क्रियमाण ॥ हें त्रिविध कर्म जाण ॥
तें कर्म कैसें कवण ॥ सांगिजेल ॥२॥ जेणें कर्म आरंभिलें ॥
तेणें स्थूल देह निपजलें ॥ तें देहारंभक बोलिलें ॥ शुभा-
शुभकर्म ॥ ३ ॥ या स्थूल देहानंतरें ॥ होती जिया शरीरें ॥
तयांसी हेतु कर्म विचित्रें ॥ तियें संचितें जाणावीं ॥ ४ ॥
जें जें कर्म संचित ॥ फल द्यावया होय उदित ॥ तें जाणावें
जाणत ॥ देहारंभक ॥ ५ ॥ स्थूल देहें कीजत असिजे ॥
तें क्रियमाण कर्म बोलिजे ॥ येणें त्रिविधें न बाधिजे ॥ तो
योगिराज ॥ ६ ॥ सुखदुःखाचेनि समयोगें ॥ प्रारब्ध कर्म
क्षयासी जाय वेगें ॥ जीवन्मुक्त ह्मणे उगें ॥ गर्भवासातें

---

प्रारब्धकर्माचा वेग संपतो तेव्हांच मात्र. १ ( नाहीं तर नाहीं. ) १ प्रारब्ध, संचित, व क्रियमाण असे कर्माचे तीन प्रकार आहेत, ध्यानांत ठेव. तें कर्म कोणतें व कसें तें सांगण्यांत येईल. २ ज्या आरंभिलेल्या कर्मानें स्थूल देह निर्माण झाला, त्या शुभाशुभ कर्माला देहारंभक कर्म ( प्रारब्ध ) असें नांव आहे. ३ हा स्थूल देह झाल्यानंतर जीं ह्या शरीरानें घडतात, त्यांना जीं विलक्षण कर्में कारण असतात तीं संचित कर्में समजावीं. ४ जें जें संचित कर्म फल देण्यासाठीं उदयास येतें, तें तें शाहण्यानें देहारंभक असें समजावें. ५ स्थूल देहानें जें घडत असतें तें क्रियमाण कर्म होय. ह्या तिन्ही कर्मांनीं योगिराज लिप्त होत नाहीं. ६ सुखदुःखाचा समभाव झाल्यानें प्रारब्धकर्म तावडतोब क्षय पावतें. जीवन्मुक्त गर्भवासाला

॥ ७ ॥ संचित कर्मासी अंत ॥ ज्ञानाग्नीनें होय निभ्रांत ॥ जैसा स्वप्नींचा वृत्तांत ॥ जळे प्रबोधमात्रें ॥ ८ ॥ कर्मे जीं क्रियामाणें ॥ तीं ज्ञानोत्पत्ती होती लीनें ॥ या तिहीं संबंधीं अकर्तेपण ॥ आथीचिना ॥ ९ ॥ एवं कर्मपाश त्रिविधु ॥ ज्ञानाग्नीनें होय दग्धु ॥ म्हणूनि मागुता भवसिंधु ॥ नाहीं ब्रह्मविदासी ॥ १० ॥ देहीं असतां विदेह ॥ तेथें देहांतीं कवण संदेह ॥ म्हणूनि त्रिभुवनीं निःसंदेह ॥ तूंचि एक ॥११॥ स्वप्नींचिया सिंहाचा ठसा ॥ प्रबुद्धासी आभासे जैसा ॥ तेवीं योगियाचें शरीर सहसा ॥ असतुचि असेना ॥ १२ ॥ ततो नविचिकित्सति ॥ ऐसें श्रुति असे बोलती ॥

---

जेथच्या तेथें बसवितो. ७ जसा स्वप्नांतला प्रकार जागृतीबरोबर नाश पावतो, तसाच ज्ञानाग्नीनें संचित कर्माचा निःसंशय शेवट होतो. ८ जीं क्रियमाण कर्मे असतात, तीं ज्ञानाचा उद्भव झाल्या-बरोबर लीन होतात. ह्या तिहींसंबंधानें अकर्तेपणा नसताच! ९ अशा प्रकारे त्रिविध कर्मपाश आहे, तो ज्ञानाग्नीनें जळून खाक होतो. म्हणून ब्रह्मवेत्त्याला फिरून संसारसमुद्र नाहींच. १० देहांत असतांनाच मुळीं विदेह (देहरहित) मग देह गेल्यानंतर तरी संशय कशाचा? म्हणून त्रिभुवनामध्यें निःसंशयेंकरून तूंच एक आहेस. ११ स्वप्नातल्या सिंहाचा ठसा जागृताला जसा नुसता भासतो तसेंच योग्याचें शरीरही बहुधा असून व नसल्यासारखें अ-सतें. १२ ' ततो न विचिकित्सति ' असें श्रुति सांगत आहे. तर

तरी जीवन्मुक्ताची स्थिती ॥ कैसी निरूपावी ॥ १३ ॥ आतां असोत जीवन्मुक्त ॥ स्वस्वरूप जे अनुभावित॥ प्रपंचातें असे देखत ॥ ब्रह्मरूपत्वें ॥ १४ ॥ जयाचे वेद बंदीजन ॥ तें तूं ब्रह्म निरंजन ॥ होसी आपणया आपण ॥ विश्वाकारें तूं ॥ १५ ॥ जें आत्यंतिक निर्मळ ॥ परब्रह्म केवळ ॥ तेंचि तूं सकळ ॥ विश्वाकारें ॥ १६ ॥ नाना घृताचिया टांका॥ जैसिया घृताच्या कणिका ॥ तैसें ब्रह्म तूं व्यापका ॥ जगदाकारें ॥ १७ ॥ जग जीव ईश्वर ॥ जेथें नाहीं हा व्यवहार ॥ तें तूं निर्विकार ॥ परब्रह्म ॥ १८ ॥ ऐसें स्वरूप निरूपितां ॥ शिष्यासी झाली तन्मयता ॥ तूष्णीभूत झाला वक्ता ॥ गुरुवचनाप्रती ॥ १९ ॥ ब्रह्मानंदसागरीं ॥ बुराली चित्तलहरी ॥ तेथेंचि उपमा कवण करी ॥ तया समाधि-

---

जीवन्मुक्ताची स्थिति कशी सांगावी? १३ स्वस्वरूपाला अनुभवणारे, प्रपंच ब्रह्मदृष्टीनें पाहणारे जीवन्मुक्त आता राहूं देत. १४ वेद ज्याचे भाट बनले, तें निरंजन ब्रह्म तूं होस. आपला आपणच तूं विश्वाकार झालेला आहेस. १५ जें अतिशय निर्मळ, केवळ परब्रह्म, विश्वाकारानें असणारें तें सर्व तूंच होस. १६ अथवा जग जीव आणि ईश्वर हा जेथें खेळ नाहीं, तें विकाररहित परब्रह्म तूं होस. १७ किंवा तुपाच्या टाक्यामध्यें जसे तुपाचे कण असतात, त्याप्रमाणें जगताच्या आकारानें असणारें तूं व्यापक ब्रह्म आहेस. १९ ब्रह्मानंदसमुद्रामध्यें चित्ताच्या लहरी बुडाल्या क्षणांत त्याच्या त्या समाधि-

सुखाची ॥ २० ॥ ऐसा गुरुशिष्यसंवाद ॥ म्यां केला विनोद ॥ ह्मणती राजयोगी सिद्ध ॥ मुकुंदराज ॥ १२१ ॥ इति श्रीमद्विवेकसिंधौ संहारक्रमे गुरुशिष्यसंवादे महाअद्वैतप्रतिपादनंनाम नवमप्रकरणं समाप्तं ॥ ९ ॥

---

सुखाची बरोबरी कोण करील. २० सिद्ध राजयोगी मुकुंदराज ह्मणतातः—असा गुरुशिष्यसंवाद मी गमतीनें केला. २१ "

# प्रकरण दहावें.

विषयः—सच्चिदानंदपदत्रयविवरण.

॥ श्रीगणेशाय नमः ॥ आतां इये निरूपणीं ॥ जीव शिव गेले हारपूनी ॥ तें उरले निदानीं ॥ आत्मरूप ॥ १ ॥ तें तंव तुज अनुभवलें ॥ पुसणें सांगणें नाहीं उरलें ॥ तथापि प्रांजळ करूनि सांगितलें ॥ पाहिजे तरी एक ॥२॥ बोलणें तरी घडे ॥ परी मौनमुद्रा तों न मोडे ॥ हें बोलणें तेणें पाडें ॥ जाणिजस ॥ ३ ॥ आत्मस्वरूप किं लक्षण ॥ तूं ऐसें आक्षेपिसी वचन ॥ तरी ब्रह्मींची खूण ॥ जें सच्चिदानंद ॥ ४ ॥ ब्रह्म तरी अद्वय ॥ तेथें हें पदत्रय ॥ कैसें

---

श्रीगणेशाय नमः—आतां ह्या निरूपणानें जीव शिव जागच्याजागीं नाहींसे झाले. तेव्हां निदानींचें आत्मरूपच राहिलें. १ त्याचा तर तुला अनुभव दिला. विचारणें, सांगणें आतां कांहीं उरलें नाहीं. तथापि तुला तें प्रांजळ करून सांगावयास पाहिजे तर श्रवण कर. २ बोलणें तर होतें, पण मौनावस्था तर मोडत नाहीं. अशाप्रकारचेंच हें बोलणें आहे असें समज. ३ आत्मस्वरूपाचें लक्षण काय, असा तूं आक्षेप घेशील. तर सत्, चित्, आनंद ही ब्रह्माची खूण आहे. ४ब्रह्म तर अद्वय (एकच) आहे. तेथें हीं तीन पदें कशीं शो-

शोभेल हा विस्मय ॥ करणेंचि नलगे ॥ ५ ॥ सत् ह्मणिजे शाश्वत ॥ तेंचि ज्ञान ह्मणूनि चित् ॥ तेंचि स्वरूप यालागीं ह्मणिजेत ॥ आनंद ऐसें ॥ ६ ॥ ऐके प्रकारांतरें निरूपण ॥ अस्ति भाति प्रियपण ॥ हें पदत्रय मिळून ॥ एकलें ब्रह्म ॥ ७ ॥ अस्ति ह्मणिजे आहे ॥ भाति ह्मणिजे प्रकाशरूप होय ॥ आणि आपण प्रिय ॥ अद्वयत्वें ॥८॥ यदस्ति तद्भाति ॥ ऐसी असे वेद श्रुति ॥ जें आहे तेंचि प्रकाशरूप ह्मणती ॥ तेंचि प्रिय ॥९॥ आद्य त्रय ब्रह्मरूप ॥ ऐसें शास्त्र बोले स्वरूप ॥ यालागीं वेगळेपणाचें माप ॥ धरूं नये ॥ १० ॥ सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म ॥ उपनिषद्वाक्य परम ॥

---

भतील असें आश्चर्य मानण्याचें कारणच नाहीं ५ सत् ह्मणजे शाश्वत. तेंच ज्ञान ह्मणून चित् होय. आणि चित् तेंच स्वरूप. ह्यासाठीं त्याला आनंद असें ह्मणतात. ६ निराळ्या प्रकारानें निरूपण सांगतों तें श्रवण कर. 'अस्ति, भाति, प्रियत्व' हीं तीन पदें मिळून एकी एक ब्रह्म होय. ७ अस्ति ह्मणजे आहे; भाति ह्मणजे प्रकाशमान होतें; आणि अद्वैतपणानें आपल्यालाच प्रिय असतें. ८ 'यदस्ति तद्भाति' असें वेदाचें वचन आहे. जें आहे तेंच प्रकाशरूप व तेंच प्रिय आहे असें ह्मणतात. ९ हें ब्रह्मरूप आद्यत्रय होय. असें शास्त्रांत स्वरूप सांगितलें आहे. ह्यासाठीं वेगळेपणाचें गणित करूं नये. १० 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' असें उपनिषदाचें सर्वोत्कृष्ट वचन आहे. ती ब्रह्माची खूण सांगितली खरी, परंतु त्रिधा ( तीन

वें ब्रह्मींचें सांगितलें वर्म ॥ परी त्रिधा नव्हे ॥ ११ ॥ सच्छब्दें नित्य सन्मात्र ॥ ज्ञानशब्दें ज्ञप्तिरूप चिन्मात्र ॥ आनंदशब्दें स्वानंदमात्र ॥ परब्रह्म तें ॥ १२ ॥ जैसा शुद्ध आणि तेजोमय ॥ उष्मा मिळोनि पदत्रय ॥ सूर्य तरी अद्वय ॥ संचला असे ॥ १३ ॥ शुद्ध आणि प्रकाशमय ॥ शीतलता मिळूनि पदत्रय ॥ तरी चंद्र तंव अद्वय ॥ संचला असे ॥ १४ ॥ श्वेत तैसीच नम्र ॥ नम्र तीचि मधुर ॥ मधुर तीचि साखर ॥ वेगळी नसे ॥ १५ ॥ शुभ्र तोचि मृदू ॥ मृदू तोचि मकरंदू ॥ परी कर्पूर तंव अभेदु ॥ एकला असे ॥१६॥ आरक्त आणि घन ॥ किरण फांकती संपूर्ण ॥ ऐसिये परीचें रत्न ॥ एकलेंचि असे ॥ १७ ॥ हिरवी आणि सघन ॥ प्रभा फांके

---

प्रकारचें नव्हे. ११ सत् शब्दानें तें परब्रह्म नित्य सत् स्वरूपच असतें; ज्ञानशब्दानें ज्ञप्तिरूप चिन्मात्र असतें; आणि आनंदशब्दानें तें स्वानंदमयच असतें. १२ जसा स्वच्छ, प्रकाशमय, आणि ऊष्ण तिन्ही पदें मिळून सूर्य होतो, तथापि तो एकच भरून राहिलेला असतो. १३ शुद्ध, प्रकाशयुक्त आणि शीतळ मिळून जें पदत्रय तो चंद्र होय. तर तोही एकच भरून राहिलेला आहे. १४ सफेत तशीच नरम, नरम तीच गोड, आणि गोड तीच साखर होय. वेगळी नव्हे. १५ पांढरा तोच नाजूक, नाजूक तोच मगज होय. परंतु कापूर तर भेदरहित एकी एकच असतो. १६ लाल आणि कठीण, जिकडे तिकडे प्रभा फांकत आहे, अशा प्रकारांचे रत्न खरें, पण असतें एकच! १७ हिरवी आणि कठीण, हिरवीगार

हरितवर्ण ॥ परी ते पाच एकली जाण ॥ अभिन्नत्वें ॥१८॥ पिंवळा आणि सुगंध ॥ अमृता ऐसा असे स्वाद ॥ परी अंबा तंव प्रसिद्ध ॥ एकलाच ॥१९॥ काळी आणि कठिण॥ वरी चक्रें सुलक्षण ॥ परी गंडकी तंव अन्य ॥ नव्हे जैसी ॥२०॥ नेत्रीं सांवळी घ्राणीं सुगंध ॥ जिव्हेसी अपूर्व स्वाद ॥ परी तुळसीमंजरी स्वतःसिद्ध ॥ एकलीच ॥ २१॥ एवं नांनां प्रमाणीं ॥ नाना दृष्टांत साधनीं ॥ सच्चिदानंदनिरूपणीं ॥ दुसरें नाहीं ॥ २२॥ ग्रंथांतरीं निरूपण ऐसें ॥ जें असज्जड-दुःख असे ॥ तयाचेनि निरासें ॥ सच्चिदानंद ॥ २३ ॥ तरी असज्जडदुःखनाशें ॥ ब्रह्म आलें सच्चिदानंददशे ॥ ऐसें

---

प्रभा पसरत आहे, पण ती पाच अभिन्नपणानें एकच आहे. १८ पिंवळा आणि सुवासिक, अमृताप्रमाणें रुचीला गोड खरा. पण तो प्रसिद्ध आंबा तर एकच असतो १९ काळी आणि कठीण वर सुंदर चिन्हांनीं युक्त अशी चक्रें असतात खरीं. पण ती गंडकी जशी दुसरी नसते. २० दृष्टीला नीलवर्ण, नाकाला सुगंधित, जिभेला अपूर्व स्वादिष्ट अशी तुळशीची मंजिरी असते खरी, पण ती स्वतः एकच असते. २१ एवंच नाना प्रमाणांनीं, अनेक प्रकारच्या दृष्टांतसाधनांनीं सच्चिदानंदाच्या निरूपणांत भिन्न म्हणून कांहीं नाहींच. २२ ग्रंथांतरीं निरूपण असें आहे कीं जें असत्, जड दुःख आहे, त्याचा अभाव तो सच्चिदानंद होय. २३ तर असत्, जड दुःख नाहींसें झालें म्हणजे ब्रह्म सच्चिदानंद स्वरूपाला पोंचतें. असें

ह्मणतां आलें हांसें ॥ महानुभावा ॥२४॥ अहो ब्रह्म सच्चिदानंद नसतें ॥ तरी असदादि कासयानें निरसतें ॥ ह्मणूनि हें आइतें ॥ सच्चिदानंद ॥२५॥ सूर्य अंधारातें नासी ॥ तेव्हां प्रकाशत्व ये त्यासी ॥ ऐसें नव्हे प्रकाशराशी ॥ पहिलाचि असे ॥ २६ ॥ छायेवरूनि पुरुषाचें रूप ॥ कीं पुरुषावरूनि छायेचें होय माप ॥ छायेसी लयोद्भव आरोप ॥ पुरुष जैसा तैसा ॥ २७ ॥ ऐसा हा परमपुरुष ॥ जेथें छायेमायेचा नाहीं भास ॥ सच्चिदानंदस्वरूपसोस ॥ तोही नाहीं ॥ २८ ॥ मुळीं असज्जडदुःख नाहीं ॥ तें सच्चिदानंद ह्मणूं काई ॥ परी न ह्मणतां ठाईंच्या ठाईं ॥ सच्चिदानंद ॥ २९ ॥ या-

---

ह्मणतांच शिष्यराज हांसला. २४ अहो ! ब्रह्म सच्चिदानंद नसतें तर असत् आदिकरून कशानें नाश पावलें असतें ? म्हणून तें स्वतःसिद्धच सच्चिदानंद आहे. २५ सूर्य अंधाराचा नाश करतो तेव्हांच त्याला प्रकाशत्व येतें असें नाहीं तर तो मूळचाच प्रकाशाचा निधि आहे. २६ छायेवरून पुरुषाचें रूप काढावयाचें कां पुरुषावरून छायेचें गणित घ्यावयाचें ? छायेला उद्भव व नाश ह्यांचा आरोप आहे, आणि पुरुष हा जसाच्या तसाच आहे. २७ जेथें छायेचा व मायेचा भास नाहीं. सच्चिदानंद स्वरूपाचा हव्यास म्हणावा तर तोही नाहीं. अशाप्रकारचा हा परमपुरुष आहे. २८ मूळामध्यें असत्, जड, व दुःख हें नाहींच. तें सच्चिदानंदस्वरूप कसें म्हणून सांगावें ? पण तें न सांगतांच जागच्या जागींच सच्चिदानंद आहे. २९ ह्मणून सत् तेंच चित्, चित् तोच आनंद

लागीं सत् तेंचि चित् ॥ चित् तेंचि आनंद ॥ पदत्रयीं अभेद ॥ एकली वस्तु ॥३०॥ एकमेवाद्वितीयं ब्रह्म ॥ नेह नानास्ति किंचन हें वर्म ॥ तुज जाहलें सुगम ॥ सद्गुरुकृपें ॥३१॥ जेव्हां परोक्ष पूर्ण चैतन्य ॥ तेव्हां ध्येयापरोक्ष प्रत्यक् चैतन्य॥ आतां अपरोक्ष पूर्ण चैतन्य ॥ प्रत्यक् चैतन्य सांग कोठें ॥३२॥ जेव्हां प्रत्यक् चैतन्य नाहीं ॥ तेव्हां शिष्यत्व केंचें काई ॥ गुरुत्वही ठाईचे ठाई ॥ पारुशलें कीं ॥ ३३ ॥ ऐकूनि शिष्यशिरोमणी ॥ माथा ठेवी सद्गुरुचरणीं ॥ ह्मणे ब्रह्मसुखाची शिराणी ॥ पुरविली स्वामी ॥ ३४ ॥ मज माझिया निरूपणीं ॥ सुख केलें पीयूषपानीं ॥ ब्रह्मासी ब्रह्मत्व ज्याचेनी ॥

---

असा तिन्ही पदांत अभेद एकीएक वस्तु उरली. ३० ' एकमेवाद्वितीयं ब्रह्म ' ' नेहनानास्ति किंचन ' हें वर्म तुला सद्गुरूंच्या कृपेनें सुलभ झालें. ३१ जेव्हां अतींद्रिय पूर्ण चैतन्य असतें तेव्हां प्रत्यक् चैतन्य ही ध्येय अपरोक्ष वस्तु असते. आतां प्रत्यक्षच पूर्ण चैतन्य झालें तेव्हां प्रत्यक् चैतन्याला जागा कोठें राहिली, सांग. ३२ जेव्हां प्रत्यक् चैतन्यच नाहींसें झालें तेव्हां शिष्यपण कशाचें काय घेऊन बसलास ? गुरुपणाही जागच्या जागीं निवाला. ३३ हें श्रवण करून शिष्याग्रणीनें सद्गुरूच्या चरणांवर मस्तक ठेवलें आणि ह्मणाला:—" स्वामी महाराज ! ब्रह्मानंदाची हौस पूर्ण केलीत. ३४ मला माझ्याच निरूपणामध्यें अमृतपान करवून सुखस्वरूप करून सोडलेंत. ज्यांच्या योगानें ब्रह्माला ब्रह्मपण येतें, ते

तो तूं सद्गुरू ॥ ३५ ॥ मज ब्रह्मत्वाची नाहीं चाड ॥ तुझें भजन अत्यंत गोड ॥ भजनेंवीण कोड ॥ कांहीं नाहीं ॥३६॥ तें तुझें भजन कैसें ॥ जेथें शिष्यपणाचि नुमसे ॥ ऐसें अकृत्रिम एकरसें ॥ सुगम जें कां ॥ ३७ ॥ सुगम तुझिये कृपें करूनी ॥ तूं उदास तैं दुर्गम जनीं ॥ ऐसी भक्ती मजलागूनी ॥ दिधलीच देई ॥ ३८ ॥ तुझे भक्तीनें ऐसें केलें ॥ तें मी न विसंबें पाउलें ॥ ऐसें मज दिधलें ॥ पाहिजे देवा ॥३९॥ तुझे ठाई प्रेमभाव ॥ जीव गेला परी तो न जाव ॥ ऐसा प्रार्थिला गुरुदेव ॥ शिष्यारायें ॥ ४० ॥ तंव तो अनाथाचा नाथ ॥ सद्गुरु जो समर्थ ॥ ह्मणे सर्व सिद्धांत मथितार्थ ॥

---

सदगुरु आपण आहात. ३५ मला ब्रह्मपणाची काहीं गरज नाहीं. आपलें भजन मात्र अत्यंत गोड आहे. त्या भजनावांचून मला दुसऱ्या कशाचीही हौस नाहीं. ३६ आतां तें आपलें भजन कशाप्रकारचें आहे ह्मणाल तर तेथें शिष्यपणाचेंच ठिकाण नाहींसें होतें. असें अकृत्रिम, एकरस झालेलें, व जें सुलभ, ३७ सुलभ आपल्याच कृपेनें झालेलें आहे. आपण उदास असतां तेव्हां लोकामध्यें दुर्लभ अशाप्रकारची मला दिलेलीच भक्ति द्या. ३८ देवा मी आपले पाय विसरणार नाहीं, असें मला आपल्या भक्तीनें करून टाकिलें असें मला आपण केलें पाहिजे. ३९ आपले ठिकाणीं जडलेलें माझें प्रेम प्राण गेला तरी सुद्धां जाऊं नये, अशी शिष्यराजांनीं गुरुदेवांची प्रार्थना केली. ४० तेव्हां अनाथांचे स्वामी समर्थ सद्गुरु ह्मणालेः—सर्व सिद्धांतांचें रहस्य आज तुझ्याच हातीं

तुजाचि पावला ॥ ४१ ॥ हें वेदाचें सर्वस्व ॥ येथें पाषांडिया नाहीं विश्वास ॥ जें ब्रह्मप्राप्तीवरी भक्तीचा सोस ॥ काय ह्मणूनी ॥ ४२ ॥ तरी ब्रह्मप्राप्तीची पदवी ॥ तिहीं कानींचि ऐकावी ॥ परी सद्‌गुरुभजनेंवीण अनुभवी ॥ नव्हतीच कीं ॥ ४३ ॥ ते आपुलियाचि मती ॥ नाना परीच्या युक्ती चाळिती ॥ परी साधुवचनीं चित्तवृत्ती ॥ देतीचिना ॥ ४४ ॥ ज्यांसी नाहीं साधुभजन ॥ त्यांसी हें तत्त्वज्ञान ॥ उपदेशूं नये पयःपान ॥ भुजंगा जैसें ॥ ४५ ॥ ऐसें ऐकूनि अनुशासन ॥ ह्मणशील मी धरीन मौन ॥ हेंही न करावें आपण ॥ प्राप्तपुरुषें ॥४६॥ शुद्ध सात्विक गुरुभक्त ॥ शुद्धमती आणि

---

आलें. ४१ हेंच वेदाचें सर्वस्व आहे ह्यावर पाखांड्यांना विश्वास नसतो. ( ते ह्मणतात ) ब्रह्मास पोंचल्यावर भक्तीचा हव्यास कशास पाहिजे ? ४२ तर ब्रह्मप्राप्तीची गोष्ट त्यांनीं कानानींच ऐकावी. परंतु सद्‌गुरुसेवेवाचून ते अनुभवपंथास पोंचतच नाहींत. ४३ ते आपल्याच मताप्रमाणें नानाप्रकारच्या कल्पना चालवीत असतात. पण साधूच्या बोलण्याकडे मन देतच नाहींत. ४४ सर्पास दूध पाजल्याप्रमाणें जे साधुसेवा करीत नाहींत, त्यांना ह्या तत्त्वज्ञानाचा बोध करूंच नये. ४५ ही शिक्षा ऐकून तूं ह्मणशील कीं, ‘ आपण आपले मौनच धरून बसूं. ’ छे ! छे ! आपण ब्रह्मत्वास पोंचलेल्या पुरुषानें तसेंही करूं नये. ४६ जो शुद्ध, सात्विक, गुरुभक्त असेल, जो बुद्धीनें निर्मल आणि विरक्त असेल अशा

विरक्त ॥ ऐशिया शिष्यासी यथोक्त ॥ उपदेश करी ॥४७॥ तरी उपयोग होईल ॥ अन्यथा वायां जाईल ॥ परी तुझी स्तुति वाढेल ॥ किंवा ढळेल ऐसें नाहीं ॥ ४८ ॥ तुझिया सहजस्थितीमाजीं पाही ॥ पात्रापात्र आलेंचि नाहीं ॥ तथापि उपदेशसमयीं ॥ पात्रापात्रविचार ॥ ४९ ॥ पूर्वील जे महानुभाव ॥ तैसा आचार तैसाचि भाव ॥ तैसाचि तयां अनुभव ॥ प्राप्त होय ॥ ५० ॥ यालागीं मूळगुरु आरंभून ॥ कीजे पूर्वजांचें कथन ॥ आणि सांगिजेल त्यांचें आचरण ॥ म्हणे मुकुंदराज योगी ॥ ५१ ॥ इति श्रीमद्विवेकसिंधौ संक्षारत्नमे गुरुशिष्यसंवादे सच्चिदानंदपदत्रयविवरणं नाम दशमप्रकरणं समाप्तम् ॥ १० ॥

---

शिष्याला यथाशास्त्र उपदेश करीत जा. ४७ तरच तो सत्कारणीं लागेल. नाहीं तर व्यर्थ जाईल. परंतु त्याच्यायोगानें तुझी स्तुति वाढेल किंवा कमी होईल असें मात्र नाहीं. ४८ हें पहा! तुझ्या सहज स्थितीमध्यें पात्र व अपात्र हें आलेंच नाहीं. तथापि उपदेशाच्या वेळीं पात्रपात्रविचार पहात जावा. ४९ पूर्वीचे महानुभव ( सिद्ध ) असत. तसाच आचार, तसाच भाव, व तसाच अनुभव त्यांस मिळतो.५०योगी मुंकुदराज म्हणतातः—ह्यासाठीं मूळ गुरुपरंपरा सांगून पूर्वजांचे कथन करण्यांत येईल, व त्यांचा आचारही सांगण्यांत येईल. ५१

# प्रकरण अकरावें.

विषयः—गुरुप्रशंसानिरूपण.

श्रीगणेशाय नमः ॥ परमात्मा सर्वेश्वरु ॥ जो सर्वज्ञ परात्परु ॥ तोचि एक आदिगुरु ॥ सकळ जीवांसी ॥ १ ॥ तयाचेनि प्रसादें ॥ सनकादिक योगिवृंदें ॥ तरले लीलाविनोदें ॥ भवसागर ॥ २ ॥ तेथील अनुग्रह जरी घडे ॥ तरी ज्ञान होय रोकडें ॥ मग संसाराचें सांकडें ॥ तें कवणासी पैं ॥ ३ ॥ ईश्वरअनुग्रहाविण ॥ नाहीं पापनिकृंतन ॥ ह्मणूनि तोचि एक जाण ॥ भवनिरसनासी ॥४॥ जैसा दीपापासाव दीप ॥ तेथें नाहीं आणिक आरोप ॥ निजतेजें अन्यरूप ॥ मुख्य बिंबचि तें ॥५॥ वातीचें दळवाडें ॥ तेणें दीप अन्य अन्य घडे ॥

---

श्रीगणेशाय नमः—परमात्मा जो सर्वज्ञ सर्वेश्वर तोच सर्व जीवांना एक परात्पर आदिगुरु होय. १ त्याच्या प्रसादानें सनकादिक योगीमंडळी सहज खेळत खेळत हा संसारसमुद्र तरून गेली. २ त्याचा अनुग्रह झाला तर ज्ञान प्रत्यक्षच हातांत लागतें. मग संसाराचें संकट कोणास पडणार ?३ ईश्वराचा अनुग्रह झाल्यावांचून पापाचा क्षय व्हावयाचा नाहीं ह्मणून संसाराचा नाश करणारा तोच एक आहे असें समज. ४ जसा दिव्यापासून दिवा लागतो. तेथें दुसरी गोष्ट नसते. तें मुख्यबिंबच असून निज ( आपल्या ) प्रकाशानें दुसरें रूप [ दिवा ] तयार होतें. ५ पुष्कळशा वाती

परी तेज तें एकचि फुडें ॥ मुख्य दीपाचें ॥ ६ ॥ एका दीपाचा प्रकाश ॥ घरोघरीं होय बहुवस ॥ परी उणीवेचा सोस ॥ नाहीं मुख्य दीपीं ॥७॥ तैसा ईश्वरासी संबंध ॥ जया घडे दैवें सिद्ध॥ तो जाणावा प्रसिद्ध ॥ ईश्वरावतार ॥८॥ याचि परी शिष्य-परंपरा ॥ ते जाण ईश्वरावतार ॥ अज्ञानाचे अंकुर ॥ तेथें आथीचिना ॥ ९ ॥ ईश्वराचा ज्ञानदाहक ॥ जेथें प्रगटला निःशेष ॥ तेथें जीवित्वाचा कलंक ॥ उरेल कैसेनी ॥ १० ॥ ज्ञानविग्रही ईश्वर ॥ तोचि झाला योगेश्वर ॥ तेथें देहद्वयाचा व्यवहार ॥ तो तंव साच नव्हे ॥ ११ ॥ सृजीत सृष्ट्यादि कार्य ॥ ईश्वराचें सकळ ऐश्वर्य ॥ हें जाणावें बहु आश्च-

---

असल्या ह्मणजे एकामागून एक दिवे तयार होतात. परंतु प्रकाश तो उघड उघड एकच. कोणता ? तर मुख्य दिव्याचा. ६ एकाच दिव्याचा प्रकाश घरोघर हवा तितका होत असतो. परंतु मुख्य दिव्यांत कांहीं कमतरता झाली, अशी गोष्टच नाहीं. ७ त्याचप्रमाणें पूर्वपुण्याईनें ज्यांचा ईश्वराशीं पूर्णपणें योग होतो तो ईश्वराचा प्रसिद्ध अवतारच समजावा. ८ अशाच प्रकारें त्यांची शिष्यपरंपराही ईश्वराचेच अवतार समजावे. कारण तेथें अज्ञानाचा अंकुर राहतच नाहीं. ९ ईश्वराचा ज्ञानाग्नि जेथें परिपूर्ण प्रकट झाला, तेथें जीवित्वाचा कलंक [ पापमल ] कसा राहणार ? १० ज्ञानशरीर ईश्वर तोच योगेश्वर होऊन येतो. तेथें दोन्ही देहांचा व्यापार चाललेलाच असतो, पण तो खरा नसतो. ११ सृष्टि आदिकरून कार्यें करणारें हें ईश्वराचें एकून एक ऐश्वर्य ह्मणजे मोठाच

यें ॥ जयाचें तेणेंचि पैं ॥ १२ ॥ सृष्ट्यादि कार्य करणें ॥ तें योगेश्वर कां नेणे ॥ ऐशा आक्षेपीं शाहणें ॥ तें ऐकजसु ॥ १३ ॥ योगेश्वराचें देहद्वय ॥ तें तंव अविद्यामय ॥ तरी निपजेल सृष्ट्यादि कार्य ॥ कैसेनि पां ॥ १४ ॥ परब्रह्मीं असतां व्यापार ॥ सृष्ट्यादि कार्य करी योगेश्वर ॥ हा अशेष मायिक व्यवहार ॥ नाहीं शुद्ध चैतन्यीं ॥१५॥ परब्रह्मींचेनि अंगलगें । सृष्ट्यादि कार्य माया करूं लागे ॥ ने तयेचेनि योगें ॥ आरोपिती ईश्वरीं ॥ १६ ॥ आणि अविद्येचें महिमान ॥ तें तंव अत्यंत हीन ॥ म्हणूनि सृष्ट्यादि निर्माण ॥ न घडे योगेश्वरीं ॥ १७ ॥ आणिक एक विचार ॥ साच नव्हे सृष्ट्यादि व्यापार ॥ तोहि एक संसार ॥ महास्थूळ

---

चमत्कार आहे.तो ज्याचा तोच जाणे ! १२ सृष्टि आदिकरून कार्य करणें हें योगेश्वराला कां समजत नाहीं ? ह्या आक्षेपाचें समाधान तूं श्रवण कर. १३ योगेश्वराचे दोन्ही देह तर अविद्यामयच असतात. तर तेथें सृष्टि आदिकरून कार्य कसें निपजेल ? १४ परब्रह्मामध्यें विहार करीत असतांना योगेश्वर सृष्टि आदिकरून कार्य करतो, हा सर्व मायेचा खेळ शुद्ध चैतन्याच्या ठिकाणीं नसतो. १५ माया ही परब्रह्माच्या अंगसंगानें सृष्टि आदिकरून कार्य करूं लागते. आणि तिच्यामुळें त्याचा आरोप ईश्वराला लावतात. १६ आणि अविद्येची प्रौढी पाहूं गेलें तर ती कांहींच नाहीं. म्हणून सृष्टिआदिकरून उद्भव योगेश्वराच्या ठिकाणीं संभवत नाहीं. १७ आणखी एक विचार असा आहे, सृष्टिआदिकरून व्यापार

॥ १८ ॥ आतां असो हा युक्तिविस्तार ॥ सृष्ट्यादि कार्यें करी जगदीश्वर ॥ तोहि करीतसे योगेश्वर ॥ तेणेंचि न्यायें ॥ १९ ॥ एकाचि जगदीश्वर ॥ उपाधिवशें विश्वाकार ॥ तैं ईश्वरेंसी कैचें अंतर ॥ जीवन्मुक्तासी ॥२०॥ ईश्वरींचें ईश्वर-पण ॥ तेथें हेंचि परम कारण ॥ जें नलभे आपणया आपण ॥ कवणे काळीं ॥ २१ ॥ स्वरूपातें विसरता ॥ तरी ईश्वर क-वण बोलिजता ॥ जीवाचियापरी सोसिता ॥ यातायाती ॥२२॥ ह्मणोनि ज्ञानविग्रही ईश्वरु ॥ तोचि ब्रह्मविद गुरु ॥ तेथें करितां अन्यथा विचारु ॥ असे महादोष ॥ २३ ॥ यस्य देवे परा भक्ति ॥ यथा देवे तथा गुरौ हे श्रुति ॥ ईश्वर गुरूसी

---

कांहीं खरा नव्हे. तोही एक प्रकारचा महास्थूल संसार आहे. १८ आतां हा युक्तिवादाचा विस्तार फार नको. सृष्टिआदिकरून कार्यें जगदीश्वर जसें करितो, त्याच न्यायानें तें योगेश्वरहि करीत असतो. १९ एकच जगदीश्वर उपाधीमुळें विश्वाकार होत असतो तर मग ईश्वरामध्यें व जीवन्मुक्तामध्यें अंतर तें कशाचें ? २० ईश्वराच्या ईश्वरपणालाही हेंच परम कारण आहे. तें आपलें आपणच कधींही प्राप्त व्हावयाचें नाहीं. २१ स्वरूपाचा विसर पडला असता तर त्याला ईश्वर कोणीं ह्मटलें असतें बरें ? मग तो जीवांप्रमाणें याता-याती भोगीत बसला असता. २२ ह्मणून ज्ञानशरीर ईश्वर हाच ब्रह्मवेत्ता गुरु होय. तेथें भलताच विचार मनांत आणणें महत्पातक होय. २३ ‘ यस्य देवे परा भक्तिः ’ ‘ यथा देवे तथा गुरौ ’, ही श्रुति ईश्वर आणि गुरु दोन्ही एकच आहेत असें सांगतात.

ऐक्यस्थिती ॥ उपदेशीतसे ॥ २४ ॥ कवण एक महामूर्ख ॥ गुरूसी देखे जीवत्वाचा तर्क ॥ तयासी होय महानर्क ॥ रौरवादिक ॥ २५ ॥ जयाचेनि भवव्यथा तुटे ॥ अज्ञानापासोनि सुटे ॥ तो ईश्वर हें न घटे ॥ काय ह्मणुनी ॥ २६ ॥ गुकार तो अज्ञान अंधकार ॥ तयासी निरास करी रुकार ॥ करितसे अज्ञानाचा संहार ॥ म्हणोनि तो गुरु म्हणिजे ॥ २७ ॥ गुरु तो वस्तु घनवट ॥ लघुत्वें बोली हळुवट ॥ गुरु तो ब्रह्म निघोंट ॥ म्हणूनि गुरु ह्मणिजे ॥ २८ ॥ आतां असो हा मतिप्रकाश ॥ शिष्य जाणा गुरुवंश ॥ तेथें धरावा विश्वास ॥ ईश्वरबुद्धी ॥ २९ ॥ जंव नेणिजे गुरुसंतती ॥ तंव न फिटे अज्ञानगती ॥ न प्रकटे स्वयंज्योति ॥ ब्रह्मसूर्य

---

२४ कोणी महामूर्ख गुरूला जर सामान्य जीव कल्पूं लागला तर त्याला रौरवासारखा महानरक प्राप्त होतो. २५ ज्याच्यायोगानें संसार व्याधि निर्मूळ होते, अज्ञानाचा पाश तुटतो, तो ईश्वर नाहीं असें कसें होईल ?२६गुकार ह्मणजे अज्ञानरूप आंधार होय. आणि त्याचा नाश करणारा तो रुकार. अज्ञानाचा संहार करितो म्हणूनच गुरु ही संज्ञा आहे. २७ गुरु ह्मणजे घन—कठीण—वस्तु होय. तेथें लघुत्वाच्या शब्दानें उणेपणा येतो. गुरु ह्मणजे अखंड ब्रह्म होय. म्हणून त्याला गुरु हें नांव आहे. २८ आतां हें बुद्धीचें ज्ञान असूं दे. शिष्य हा गुरूचा वंशच आहे, असें समजावें. त्यावर ईश्वर समजूनच श्रद्धा ठेवावी. २९ गुरुसंतति समजली नाहीं तोंपर्यंत अज्ञानदशा कांहीं चुकावयाची नाहीं, आणि स्वयंप्रकाश

॥ ३० ॥ वेद शास्त्र पुराणें ॥ तयासी बोलती अधःपतन ॥ जयासि नाहीं परिज्ञान ॥ गुरुपरंपरेचें ॥ ३१ ॥ म्हणूनि शिवादि गुरुपर्यंत ॥ जाणावे ते अवधूत ॥ जे अमूर्त मूर्तिमंत॥ परब्रह्म ॥ ३२ ॥ परी सांगिजती अवधूत ॥ जे निजानंद-भरित ॥ जयांची महिमा विख्यात ॥ लोकत्रयीं ॥ ३३ ॥ तरी आदिगुरु श्रीआदिनाथ ॥ तेथूनि श्रीहरिनाथ ॥ तयाचा शिष्य श्रीरघुनाथ ॥ जो गुणसिंधु ॥३४॥ तया सिद्धांचें चरित्र॥ सांगिजेल विचित्र ॥ महापातकच्छेदन पवित्र ॥ श्रवणमात्रें ॥ ३५ ॥ जीवाचें अंतःकरण ॥ झालें कलिमलिन ॥ म्हणून न प्रगटे आत्मज्ञान ॥ स्वस्वरूपाचें ॥३६॥ ते वेळीं कृपाळुवाचा

---

ब्रह्मरूप सूर्य कांहीं प्रकाशमान व्हावयाचा नाहीं. ३० ज्याला गुरु-परंपरेची माहिती नाहीं, त्यास वेदांत शास्त्रांत, पुराणांतसुद्धां अ-धोगति सांगितली आहे. ३१ म्हणून शिवापर्यंत जितके गुरु तितके सारे अवधूत होत. जे प्रत्यक्ष निराकार परब्रह्म होत. ३२जे स्वानंद-परिपूर्ण, ज्यांचा महिमा त्रैलोक्यांत गाजत आहे, असे अवधूत आतां सांगण्यांत येतील ३३ तर श्रीआदिनाथ हे आद्य गुरु होत. तेथून दुसरे श्रीहरिनाथ. आणि त्यांचे शिष्य श्रीरघुनाथ. हा केवळ गुणांचा सागर होता. ३४ त्या सिद्धाचें चरित्र मोठें विलक्षण आहे. त्याच्या पवित्र श्रवणानें महापातकाचा विध्वंस होतो. ३५ जीवाचें अंतःकरण कलीनें मळीण झालेलें असतें. म्हणून स्वस्व-रूपाचें आत्मज्ञान प्रकाशमान होत नाहीं. ३६ अशी वेळ पाहून कृपाळांचे राजे श्रीवैकुंठनाथ, जीवांची मुक्तता करण्यासाठीं, स्वतः

राणा ॥ जीवांची करावया सोडवण ॥ अवतरला आपण ॥ श्रीवैकुंठनाथ ॥ ३७ ॥ बाणगंगेच्या तीरीं ॥ मनोहर अंबा-नगरी ॥ तेथें प्रकटले श्रीहरी ॥ जगदीश्वर ॥३८॥ माध्यंदिनी शाखे ॥ अवतार केला परमपुरुषें ॥ चांपे गोरटेनी वेषें ॥ अतिमनोहर ॥ ३९ ॥ श्रीवत्स पद लपविलें ॥ दक्षिण जंघें समाविलें ॥ कलियुगीं अवतरण केलें ॥ म्हणुनियां ॥ ४० ॥ वर्ततां मनुष्यवेषें ॥ तयातें कोणीच नोळखे ॥ प्रत्यक्ष नि-धान न देखे ॥ जैसा दैवहीन ॥ ४१ ॥ जयांचें नामसंकी-र्तन ॥ करितां पापनिकृंतन ॥ तयासी मेखलाबंधन ॥ पिता करिता झाला ॥ ४२ ॥ वेदशास्त्रांचा अभ्यास ॥ जयांसी करितां नलगे आयास ॥ जो चतुर्विध वाचेचा ईश ॥ तेथें

---

अवतार घेऊन आले. ३७ बाणगंगेच्या काठीं अंबानगर नांवाचें फार सुंदर शहर होतें. तेथें जगदीश्वर श्रीहरिनाथ अवतीर्ण झाले. ३८ माध्यंदिन शाखेमध्यें ह्या परमपुरुषानें अवतार घेतला. चांफ्या-प्रमाणें गौरवर्ण आणि रूप तर अत्यंत सुंदर! ३९ कलियुगांत अवतार घेतला म्हणून श्रीवत्साची खूण लपवून ती उजव्या जांघेंत ठेवून दिली. ४० प्रत्यक्ष ठेवा चालून आला असतांना ज्याप्रमाणें हत-भाग्याला तो दिसत नाहीं, त्याचप्रमाणें मनुष्यरूपानें फिरत असतांना त्यांना कोणीच ओळखीना! ४१ ज्याच्या नांवाचा घोष केला अस-तांना पापाचा उच्छेद होतो, त्याचें पित्यानें मौंजीबंधन केलें. ४२ तो चारी वाणींचा स्वामी असल्यामुळें त्यास वेदाध्ययन करतांना

विस्मय कैंचा ॥४३॥ हरिनामें साक्षात् ॥ अवतरला अनंत ॥ तेथींची महिमा विख्यात ॥ भविष्योत्तरपुराणीं बोलिली ॥ ४४ ॥ माझी अतिमंद वाणी ॥ मी महिमा काय वाखाणीं ॥ जो वर्णित वेदशास्त्रपुराणीं ॥ अगाध महिमा ॥ ४५ ॥ जैसा श्रीकृष्णाचा अवतारु ॥ तेणें संदीपन केला गुरु ॥ वाराणसीये शंकरू ॥ तेणें प्रसन्न केला ॥ ४६ ॥ बारा वर्षें पाशुपत ॥ आचरला महाव्रत ॥ तेणें पार्वतीसहित ॥ शंभु प्रसन्न केला ॥ ४७ ॥ नातरी दत्तात्रेय मुनेश्वरु ॥ जो महाविष्णूचा अवतारु ॥ तेणें प्रसन्न केला गुरु शंकरु ॥ गौतमीतीरीं ॥ ४८ ॥ तयाचि परी अतिगहन ॥ हरीनें आदरिलें अनुष्ठान ॥ तेणें तपें त्रिभुवन ॥ पोळतें

---

मुळींच श्रम पडत नसत. ४३ हरि ह्या नांवानें साक्षात् अनंतच प्रगट झाला. त्याचा प्रसिद्ध महिमा भविष्योत्तर पुराणांत सांगितला आहे. ४४ वेद, शास्त्रें, व पुराणें ह्यांनीं अगाध महिमा वर्णिला असतांना माझी वाणी अतिशय मंद, मी त्या महिम्याचें काय वर्णन करणार? ४५ जसा श्रीकृष्ण अवतरला, आणि त्यानें सांदीपनी गुरु केला, तसेंच त्यांनींही वाराणसी ( काशी ) मध्यें श्रीशंकरांस प्रसन्न करून घेतलें. ४६ पाशुपत नांवाचें महाव्रत बारा वर्षेंपर्यंत आचरण केलें व त्याच्यायोगानें पार्वतीसह शंभू प्रसन्न करून घेतला. ४७ किंवा मुनिश्रेष्ठ दत्तात्रय जे महाविष्णूचे अवतार त्यांनीं गौतमीच्या कांठीं सद्गुरु शंकरांस प्रसन्न करून घेतलें. ४८ त्याचप्रमाणें हरिनाथांनीं अतिशय घोर अनुष्ठान आरंभिलें. त्या तपानें त्रिभुवन

झालें ॥ ४९ ॥ मग आपुलेनि इच्छावशें ॥ अनुष्ठानाचेनि द-
शांशें ॥ हवन आरंभिलें परेशें ॥ हरीनें महाकुंडीं ॥ ५० ॥
तेथें महाधूम प्रकटला ॥ गगनासी उपरमला ॥ तो जैसा
जाणं निघाला ॥ श्रीमहादेवासी ॥ ५१ ॥ होमधूम्रें श्याम-
ळ ॥ झालें नभमंडळ ॥ तिळाहुतीचा परिमळ ॥ फांके दाही
दिशीं ॥ ५२ ॥ नव होतासमवेत ॥ हवन करी हरिनाथ ॥
नवग्रहपरिवारित ॥ पुरंदर जैसा ॥ ५३ ॥ झाली होमाची
समाप्ती ॥ मग आदरिली पूर्णाहुती ॥ तेथें प्रकटला स्वयं-
ज्योति ॥ घृतधारेसरिसा ॥ ५४ ॥ ज्या पूर्णाहुतीची
ज्वाळा ॥ गगनचुंबित विशाळा ॥ कनकवर्ण सोज्वळा ॥
मज तैशी गमली ॥ ५५ ॥ नातरी स्रष्ट्यानें कनकदंड ॥

---

मुद्धां पोळून गेलें. ४९ नंतर अनुष्ठानाचा दहावा हिस्सा राहिला असतां परमात्म्या हरिनाथांनीं आपल्याच इच्छेनें महाकुंडामध्यें हवन सुरू केलें. ५० तेव्हा धुराचा भयंकर लोट उठला, आणि आकाशाला जाऊन भिडला. जणों काय तो श्रीमहादेवासच शोधावयास निघाला आहे. ५१ त्या होमांतील धुरानें आकाश काळेंभोर होऊन गेलें, आणि तिळाच्या आहुतीचा सुवास दशदिशांस कोंदाटला. ५२ तेव्हां होत्यासहवर्तमान करीत असलेले हरिनाथ नवग्रहांमध्यें इंद्र जसा शोभतो, त्याप्रमाणें शोभूं लागले. ५३ होमाची समाप्ति झाली. नंतर हरिनाथांनीं पूर्णाहुति घेतली. तेव्हां तुपाच्या धारेबरोबर स्वयंज्योति प्रकाशमान झाली. ५४ त्या प्रचंड गगनचुंबित पूर्णाहुतीच्या ज्वाळा म्हणजे झगझगीत सोन्याची प्रभाच असावी असें मला वाटतें. ५५ किंवा

गगनछत्रा रोविला प्रचंड ॥ तेथें प्रगटे चंद्रचूड ॥ म्हणूनियां ॥ ५६ ॥ तैसी गगनाच्या देउळीं ॥ ज्वाळा शिवलिंग प्रगटली ॥ मग स्नपनविधि आरंभिली ॥ हरीनें घृतधारें ॥ ५७ ॥ असो तिये ज्वाळे आंत ॥ शंभू प्रकटला न भी म्हणत ॥ जो भक्तांचा वेळाईत ॥ कृपासिंधु ॥ ५८ ॥ तिन्ही देव गुणमूर्ती ॥ तया देवांचिया शक्ति ॥ तो देखिला स्वयंज्योति ॥ श्रीआदिनाथ ॥ ५९ ॥ मग हरीसी गाढ आलिंगन ॥ दिलें जगदीश्वरें आपण ॥ क्षणएक दोघे झाले लीन ॥ आनंदसागरीं ॥ ६० ॥ सुखासी महासुख भेटलें ॥ किंवा स्वानुभवासी पडप जोडलें ॥ तैसें आनंदें फुंजों

---

चंद्रचूड शंकर तेथें प्रगट झाले म्हणून विधात्यानें आकाशाच्या छत्राला तो प्रचंड सोन्याचा दंडच लाविला असें वाटलें. ५६ शिवलिंगाच्या रूपानें आकाशाच्या देवळामध्यें ज्वाळा प्रगट होतांच हरिनाथांनीं तुपाच्या धारेनें स्नपनविधीस आरंभ केला. ५७ असो. त्या ज्वाळेच्या आंत भक्तांच्या संकटास धांवून येणारे करुणेचे समुद्र श्रीशंभु नाभी नाभी ( भिऊं नको, भिऊं नको ) असें म्हणत प्रगट झाले. ५८ त्रिगुणांच्या मूर्ति तिन्ही देव व त्या देवांच्या शक्तिही जेथें एकवटलेल्या आहेत, तो हा स्वयंज्योति श्रीआदिनाथ भेटला. ५९ मग जगदीश्वरांनीं स्वतः हरिनाथांना घट्ट आलिंगन दिलें, आणि क्षणभर दोघेही आनंदसमुद्रांत बुडून गेले. ६० सुखाला महासुख भेटावें, किंवा स्वानुभवाला कोंदण करावें. त्याप्रमाणें ते

लागले ॥ हरिशंकर ते ॥ ६१ ॥ जैसा झालिया विद्युल्ल-
तापात ॥ जग होय विकलित ॥ तैसे रुद्रतेजें मूर्छित ॥
झाले ऋत्विजगण ॥ ६२ ॥ तेथें काय वर्तलें ॥ तें होतां
नाहीं जाणितलें ॥ तरी तेथें जें वितलें ॥ अवधारिजे ॥६३॥
मग सदाशिवें जाणितलें ॥ तंव हरीनें विनाविलें ॥ जी प्रेम
देई आपुलें ॥ श्रीआदिनाथा ॥ ६४ ॥ जी तुमचिया कृपेचे
लवलेशें ॥ फिटलें जीवाचें अज्ञानपिसें ॥ कलें साम्राज्य-
पद आपैसें ॥ गिवसीत पावे ॥ ६५ ॥ ब्रह्मयासी
ब्रह्मपद ॥ विष्णूसी विष्णुपद ॥ रुद्रासी रुद्रपद ॥
प्रसादें जयाचेनी ॥ ६६ ॥ जयाचिया सत्ता ॥ सकळ जी-

---

हरिशंकर आनंदानें उसळू लागले. ६१ विद्युत्पात होतांच सारें जग जसें गर्भगळित होऊन जातें तसेंच रुद्राचें ( शंकराचें ) तेज पाहून ऋत्विजसमुदाय मूर्च्छित होऊन पडला. ६२ तेथें काय झालें तें होत्यांना कांहीं समजलें नाहीं. तथापि तेथें जें घडलें तें श्रवण करावें. ६३ मग श्रीसदाशिवांनीं भाव ओळखला तेव्हां हरिनाथांनीं विनंति केली कीं, महाराज! श्रीआदिनाथ! आपलें प्रेम द्यावें. ६४ महाराज! आपल्या लेशमात्र कृपेनें जीवाचा अज्ञान-भ्रम नाहींसा झाला, आणि जें शोधिलें तरी सांपडावयाचें नाहीं तें सार्वभौम पद आपोआप मिळे असें करून सोडलेंत. ६५ ज्याच्या प्रसादानें ब्रह्मदेवाला ब्रह्मपद, विष्णूला विष्णुपद, व रुद्राला रुद्र-पद प्राप्त होतें; ६६ ज्याच्या सत्तेनें सर्व जीवांना अस्तित्व आलेलें

वांसी आस्तिकता ॥ तें परमचैतन्य तत्त्वतां ॥ तूंचि एक ॥ ६७ ॥ जेथींचिया ज्ञप्तिकळा ॥ जीवासी जाणिवेचा सोहळा ॥ तें परमचैतन्य केवळा ॥ तूंचि एक ॥ ६८ ॥ द्विपदादिकें देह-नगरें ॥ रचूनि वसविलीं तुवां शंकरें ॥ तेथें अहंतेचे वडि-वारें ॥ झालासी जीवरूप ॥ ६९ ॥ स्वस्वरूपीं न विटत ॥ असमी तूं सकळ हेत ॥ जैसा क्षीराब्धि उचंबळत ॥ निज-तरंगीं ॥ ७० ॥ तत्त्वता तूं निर्विकार ॥ परब्रह्म निराधार ॥ तेणें तुवां अधिष्ठिली साकार ॥ सुंदर मूर्ति हे ॥ ७१ ॥ शां-भवी तुझ्या वामांगीं ॥ विश्वमंगला तत्त्वांगी ॥ अविनाशपणें तुज भोगी ॥ शिवानंद हें ॥ ७२ ॥ तूं चैतन्यरूप हे चिती ॥

---

आहे, तें परमचैतन्य निश्चयेंकरून तूंच एक आहेस. ६७ ज्याच्या ज्ञानकलेनें जीवांना जाणिवेचा सोहळा पहावयास मिळतो आहे, तें परमचैतन्य केवळ तूंच एक होस. ६८ तुम्हीं शंकरांनीं द्विपद ( दोन पायांचीं ) आदिकरून शहरें रचना करून बसविलीं. आणि तेथें अहंकाराच्या प्रौढीनें आपणच जीवरूप झालां. ६९ ज्याप्र-माणें क्षीरसमुद्र आपल्या लाटांनीं उचंबळत असतो, त्याचप्रमाणें स्वस्वरूपामध्यें कधींच खंड पडूं देत नाहीं. सर्व हेतु आपणच आहां. ७० तत्त्वतः आपण निर्विकार, आश्रयरहित असें परब्रह्म आहां. त्याच आपण ह्या साकार सुंदर मूर्तीचा आश्रय केला आहे. ७१ जी विश्वाची मंगळागौर, वस्तु हेंच जिचें अंग, ती शिवशक्ति आपल्या डावे बाजूस आहे.ही प्रत्यक्ष शिवाचा आनंद असून आपलें अविनाशपणानें सुख घेत आहे. ७२ आपण चैतन्यरूप असून ती

तूं स्वसंवेद्य हे संविती ॥ तूं परमानंद हे अनुभूति ॥ स्वयं-प्रकाश ॥७३॥ तुह्मी घरौतें वरौतें ॥ दोघें निजानंदभरितें ॥ अमूर्त झाला मूर्तिमंतें ॥ भक्तानुग्रहासी ॥ ७४ ॥ जे पडले संसार घोर बंदीं ॥ नेणती आपुली शुद्धी ॥ जय जय करु-णानिधी ॥ तुवां तारावे जी ॥ ७५ ॥ तरी ज्ञान द्यावें स्वानु-भव ॥ जेणें चुकती भवार्णव ॥ भेटे निराकार निरवयव ॥ परब्रह्म जें ॥ ७६ ॥ ऐसें हरीनें विनविलें ॥ तंव महादेवें हास्य केलें ॥ हें सिद्धचि काय मागितलें ॥ सर्वज्ञराया तुवां ॥७७॥ तथापि तुझा विनोद ॥ तरी दीजे केवळ निजबोध ॥

---

चित्कळा आहे; आपण स्वसंवेद्य असून ती संविती आहे ह्मणजे आपण स्वयंप्रकाश—स्वतःच स्वतःला जाणणारे असून ती जाणण्याची शक्ति-ज्ञानशक्ति आहे. आपण परमानंद आहां, व ती स्वयंप्रकाश अनु-भूति होय. ७३ घरदार, गणगोत, वऱ्हाडी, सर्व कांहीं तुह्मीं दोघें असून निजानंदपूर्ण आहां. भक्तांवर अनुग्रह करण्यासाठीं आपण अमूर्तनिराकार असून मूर्तिमंत सगुणरूप झालां आहां. ७४ हे कृपासागरा ! आपला जयजयकार असो. महाराज ! जे संसाराच्या भयंकर बंदिशाळेंत पडले आहेत, व ज्यांना स्वस्वरूप ज्ञान नाहीं, त्यांचा आपण उद्धार करावा. ७५ तर ज्याच्यायोगानें संसारसमुद्र चुकतो, निराकार व अतींद्रिय असें परब्रह्म हातास येतें, तें स्वानु-भवाचें ज्ञान द्यावें. ७६ अशाप्रकारें हरिनाथांनी विनंति केली असतां महादेव हांसले. ते ह्मणाले ' हें आहेच आहे. हे सर्वज्ञांच्या राजा! ह्मांत तूं काय मागितलेंस? ७७तथापि तुझा विनोद आहे तर

आणीकहि वरप्रसाद ॥ मागशी जो ॥ ७८ ॥ तुझिया संप्रदायाची उंडी ॥ पडेल जयाचे हृदयकुंडीं ॥ तयासी ज्ञानाचीं सांकडीं ॥ कांहींच नाहीं ॥७९॥ तुझ्या वचनीं धरिती विश्वास ॥ तयांसी नाहीं गर्भवास ॥ तयांचा अभिमानी मी महेश ॥ ह्मणवूनियां ॥ ८० ॥ माझें ज्ञान प्रगटेल ॥ तुझ्या वदनीं प्रकाशेल ॥ तें शिष्यदेहीं संक्रमेल ॥ गुरुकृपाद्वारें ॥ ८१ ॥ ऐसें आदिनाथ बोलिले ॥ तंव हरीनें मुख पसरिलें ॥ तेथें तेजोमय प्रकाशलें ॥ जगदीश्वर ॥ ८२ ॥ सदाशिवाचेनि कृपावशें ॥ शांभव तेजाचेनि समावेशें ॥ ते वेळीं चित्त समरसे ॥ हरीचें परब्रह्मीं ॥ ८३ ॥ निर्विकल्प समाधी प्रगटली ॥ दृष्टि अर्धोन्मीलित झाली ॥ अहंता निःशेष नि-

---

केवळ निजबोध. आणखीही तूं मागशील तो वरप्रसाद तुला दिला आहे. ७८ तुझ्या सांप्रदायाची उडी ज्याच्या हृदयरूप कुंडांत पडेल, त्याला ज्ञान अगदीं सुलभ होईल. ७९ तुझ्या वचनावर ज्याची पूर्ण श्रद्धा असेल, त्यांचा अभिमानी मी महादेव आहें ह्मणून त्यास गर्भवास नाहीं ८० माझें ज्ञान प्रगट होऊन तुझ्या तोंडांत प्रवेश करील आणि गुरुकृपेच्या द्वारानें तें शिष्याच्या देहांत शिरेल. ८१ येणेंप्रमाणें आदिनाथ बोलले तेव्हां हरिनाथांनीं तोंड पसरलें. तों त्यांत जगदीश्वर तेजासहवर्तमान प्रकाशमान झाले. ८२ श्रीसदाशिवाच्या कृपेच्या भरानें, आणि शंभूचें तेज संचरल्यानें त्यावेळीं हरिनाथांचें चित्त परब्रह्मामध्यें समरस झालें. ८३ निर्विकल्प समाधि प्रगट झाली; दृष्टि अर्धोन्मीलित झाली; अहंता तर त्या

माली ॥ ब्रह्मानंदसागरीं ॥ ८४ ॥ प्राणाचें स्फुरण स्फुंदन ॥ मनासरिसें झालें लीन ॥ तेथींचिया आनंदातें कवण ॥ निवडील पैं ॥ ८५ ॥ तैसें महाप्रळयीं जळ ॥ उठलिया भरे ब्रह्मगोळ ॥ तेथें बुडाले सकळ ॥ कोण जाणे ॥ ८६ ॥ तेथें ब्रह्मानंदें चेवविंतें ॥ आणीक नाहीं राखतें ॥ ब्रह्मानंदचि आपणातें ॥ अनुभवीतसे ॥ ८७ ॥ एकाची जिव्हा अमृतें विटे ॥ तयासी अन्नरसाचा पांग फिटे ॥ कांहीं एक हे उपमा घटे ॥ तया स्वानुभवासी ॥८८॥ ना तां क्षीरसागरु ॥ आपुली चवी जाणे निर्धारु ॥ तरी हे उपमा येईल करूं ॥ स्वानुभवासी ॥ ८९ ॥ अथवा निरालंब गगन ॥ जरी जाणे आपुलें पूर्णपण ॥ तरी हे उपमा सामान्य ॥ तया स्वानुभ-

---

ब्रह्मानंदसमुद्रांत सर्वथैव बुडून गेली. ८४ प्राणाचें स्फुरण पावणें आणि उचंबळणें मनाबरोबरच लयास गेलें. तेथला वृत्तांत कसा आहे हें कोण सांगणार?८५जसा महाप्रळयांतला पूर आला म्हणजे सर्व ब्रह्मांड व्यापून सर्व कांहीं बुडून जातें. तेथचा वृत्तांत कोण समजणार ? ८६ तेथें ब्रह्मानंदानें स्फुरण पावणारें आणखी कांहीं राहतच नाहीं. ब्रह्मानंदच स्वतःला अनुभवीत असतो ८७ एकाद्याची जिव्हा अमृतानें विटली आणि त्याचा अन्नरसाचा पांग फिटला, तर ही उपमा त्या स्वानुभवाला कांहींशी जमेल. ८८ किंवा क्षीरसमुद्रानें निश्चयानें आपली रुचि जाणली, तर ती उपमा त्या स्वानुभवाला कदाचित् देतां येईल. ८९ अथवा निराधार आकाशाला जर आपला पूर्णपणा समजेल, तर ती उपमा त्या स्वानुभवा-

वासी ॥ ९० ॥ आतां असो हे ऋत्विजगण ॥ पडिले होते संज्ञाहीन ॥ ते होऊनि लब्धस्मरण ॥ उठते झाले ॥ ९१ ॥ तेथें ब्रह्मग्रह प्रगटला ॥ तेणें हरीसी बळी घेतला ॥ ऐसें म्हणूनि पळता झाला ॥ होतासमूह ॥ ९२ ॥ तंव येरीकडे दिवसां बाविसां ॥ हरीसी सुलीन दशा ॥ मग समाधी विसर्जूनि आपैसा ॥ उठता झाला ॥९३॥ जडचर्या आचरत ॥ पिशाचवत् खेळत ॥ निजानंदें डुल्लत ॥ हरि योगिराज ॥९४॥ ढाळें ढाळें चालणें ॥ विसरत विसरत बोलणें ॥ कांहीं नेणोनि हांसणें ॥ हरिनाथासी ॥९५॥ कर्मवासना सरली ॥ विवेकीं इच्छा निमाली ॥ हरीसी पूर्ण दृष्टी झाली ॥ ह्मणवूनियां ॥ ९६ ॥ नाहीं वस्त्रपरिधान ॥ कोणासी गोष्टी संभाषण ॥

---

ला साधारणशी होईल. ९० आतां हें असो. ऋत्विजसमुदाय जो निश्चेष्ट होऊन पडला होता तो इतक्यांतच देहभानावर येऊन उठून बसला. ९१ तेव्हां ' ब्रह्मसमंध प्रगट होऊन त्यानें तेथें हरीचा बळी घेतला असें म्हणून होत्यांनीं तेथून पळ काढला. ९२ तों इकडे बावीस दिवस गेल्यानंतर हरिनाथांस सुलीनावस्था प्राप्त झाली. मग आपोआप समाधि उतरून उठले. ९३ जडभरताप्रमाणें वागणूक व पिशाचवत् लीला करूं लागले आणि योग्यांचे राजे हरिनाथ निजानंदानें डुलत राहिले. ९४ अडखळत अडखळत चालावें, चुकत चुकत बोलावें, आणि हरिनाथांनीं उगीचच्या उगीच हंसत असावें. ९५ हरिनाथांना पूर्ण ज्ञान झालें म्हणून कर्माची वासना संपली आणि इच्छा विवेकामध्यें बुडून गेली. ९६

जेथें थोर ना कांहीं सान ॥ तें आर्थीचिना ॥ ९७ ॥ त्रिका-
ळीं निरंजन ॥ हरि करी अर्चन ॥ हें आश्चर्य सकळ जन ॥
देखते झाले ॥ ९८ ॥ समस्त देवता ॥ घरीं पुरविती वस्तु-
जाता ॥ उपतिष्ठती चिंतितां ॥ ऋद्धिसिद्धी ॥ ९९ ॥ अचिंत्य
अनंत शक्ती ॥ हरीतें ओळंगती ॥ महासिद्धी खेळती ॥
दृष्टीपुढां ॥ १०० ॥ जयातें अवलोकन करी ॥ परमपुरुष
श्रीहरी ॥ तया स्वानुभवाची भरोवरी ॥ होय आपसयाचि
॥ १ ॥ सुरेंद्र भारती मुख्य ॥ हरीनें बोधिले शिष्य ॥ परी
कृपा असंख्य ॥ फळली रामचंद्रीं ॥ २ ॥ कृपादृष्टीसरसी ॥
समाधि प्रवर्तली रामासी ॥ उन्मेष घेऊनि मानसीं ॥ ब्रह्मा-

---

वस्त्र अंगावर घेणें, कोणाशीं बोलणें, चालणें किंवा हा थोर हा ल-
हान हें तेथें कांहींच राहिलें नाहीं. ९७ हरिनाथ गुप्तपणें त्रिकाळ
पूजन करीत. हा चमत्कार सर्व लोक पाहत असत. ९८ सर्व देवता
एकूणएक वस्तु घरीं आणून देत असत. त्यांनीं चिंतन केल्याबरो-
बर ऋद्धिसिद्धि पुढें येऊन उभ्या रहात. ९९ अचिंत्य व अनंत
शक्ति हरिनाथांस प्राप्त झाल्या. आणि महासिद्धि नजरेसमोर खेळूं
लागल्या. १०० तो परमपुरुष श्रीहरी ज्यावर नजर फेंकी, त्याला
आपोआपच स्वानुभवाची सामुग्री मिळे. १ हरिनाथांनीं उपदेश
दिलेले मुख्य शिष्य म्हटले म्हणजे सुरेंद्रभारती हे होत. परंतु राम-
चंद्रांच्या ठिकाणीं त्यांची अगणित कृपा झाली. २ त्यांच्या
कृपाकटाक्षाबरोबर मनामध्यें स्वरूपज्ञान व तो ब्रह्मानंद प्रगट हो-

नंद तो ॥ ३ ॥ अठरा दिवसपर्यंता ॥ झाली उन्मनी अवस्था ॥ मनाचिया वृत्ति समस्ता ॥ खुंटलिया पैं ॥ ४ ॥ मग समाधि विसर्जिली ॥ तुरीयावस्था प्रवर्तली ॥ जियेचेनि सकळ सृष्टि झाली ॥ शिवात्मक हे ॥५॥ वर्णाश्रमाचा पांग ॥ न करी राम निःसंग ॥ अखंड फळला राजयोग ॥ म्हणूनिया ॥६॥ कर्माचरणीं आचरणीं॥प्रत्यवाय गेला जळोनी॥ पापवासना हे मनीं ॥ आथीचिना ॥ ७ ॥ राम गुणाचा सागर ॥ कीं महिमेचा आगर ॥ ब्रह्मविद्या देता उदार॥ तोचि एक ॥८॥ एकमुखी चतुरानन ॥ कीं द्विभुज मधुसूदन ॥ ना तो समदृष्टि महेशान ॥ श्रीरामचंद्र ॥ ९ ॥ गर्वरहित महेंद्र ॥

---

ऊन रामाची समाधि लागली, ३ अठरा दिवसपर्यंत उन्मनी अवस्था होती व मनाच्या एकूणएक वृत्ति लयास गेल्या होत्या. ४ नंतर समाधि उतरली, तों तुर्यावस्था प्राप्त झाली. तिच्या योगानें ही सर्व सृष्टि शिवरूपच होऊन गेली. ५ राजयोग अखंड फळास आला म्हणून संगरहित राम वर्णाश्रमाची यातायात करीत नसत. ६ पापवासना म्हणून मनांत उरलीच नाहीं. त्यामुळें कर्माचरणांतला व आचरणांतला विधिनिषेध जळून खाक झाला. ७ राम हा गुणांचा समुद्र, किंवा केवळ महिम्याचें आगर होतें. ब्रह्मविद्या देणारा दाता एक तोच. ८ एक तोंड असलेला ब्रह्मदेव, किंवा दोन हात असलेला मधुसूदन किंवा सर्वांवर सारखी दृष्टि ठेवणारा महेशानच श्रीरामचंद्र म्हटले पाहिजेत. ९ किंवा ते श्रीरघुनाथ गर्वरहित इंद्र, किंवा लहरर-

कीं उर्मिरहित ज्ञानसमुद्र ॥ ना तो निष्कलंक चंद्र ॥ श्री-
रघुनाथ ॥१०॥ श्रीरघुनाथाच्या गुणीं ॥ समान नाहीं त्रिभु-
वनीं ॥ ह्मणूनि तोचि एक योगीजनीं ॥ वंदिजे रामचंद्र
॥ ११ ॥ अनेक शिष्यांप्रति बोधिले ॥ ते ब्रह्मसुखें निवाले ॥
ब्रह्मविद्येचें तारूं केलें ॥ सकळ जनांसी ॥ १२ ॥ मेघांच्या
धारा गणवती ॥ पृथ्वीचे परमाणू मोजवती ॥ परी श्रीरघुना-
थाचे गुण न वर्णवती ॥ शेषादिकां ॥ १३ ॥ माझ्या मतीचा
विस्तार ॥ तो विवेक मंद थोर ॥ राम महिमेचा पार ॥ केवीं
वर्णवेल ॥ १४ ॥ म्यां सांगितली गुरुसंतती ॥ ऐकतां होय
पापनिवृत्ति ॥ ह्मणूनी श्रद्धापूर्वक चित्तीं ॥ ऐकावें पैं ॥१५॥

---

हित ज्ञानसमुद्र किंवा तो कलंकरहित चंद्रच होता ह्मटलें तरी
चालेल. ११० श्रीरघुनाथाच्या गुणांला त्रिभुवनांत तुलना नाहीं
ह्मणून योगिजनांनीं त्या रामचंद्राला वंदन करावें. ११ अनेक
शिष्यांना उपदेश दिला. ते ब्रह्मानंदानें शांत झाले. सर्व लोकांना
ब्रह्मविद्येची नाव करून सोडली. १२ मेघांच्या धारा एकपरी
मोजतां येतील, पृथ्वीच्या परमाणूंचाहि हिशेब निघेल, परंतु श्रीरघु-
नाथाचे गुण शेषादिकांना सुद्धां वर्णन करितां येणार नाहींत. १३
माझ्या बुद्धीचा विशाळपणा पाहिला तर मी अगदीं विवेक-
मंद ! तेव्हां रामाच्या महिम्याचा पार माझ्यानें कसा वर्णवेल ?
१४ मीं गुरुपरंपरा सांगितली. ती ऐकली असतां पातकें धुवून
जातात. ह्मणून चित्तांत विश्वास धरून श्रवण करावें. १५ सूर्य
बाहेरचा अंधार नाहींसा करतो. पण उजेड कांहीं अंतरांत पडत

सूर्य बाह्यतम निरसी ॥ परी अंतरीं न प्रकाशी ॥ तें अज्ञान तम आपैसीं ॥ फिटे गुरुप्रसादें ॥ १६ ॥ नलगे वेदशास्त्राचा पांग ॥ अभ्यासावा नलगे अष्टांग ॥ जरी पाविजे राजयोग ॥ श्रीगुरुप्रसादें ॥ १७ ॥ तपतीर्थांचीं डांगोरें ॥ श्रुतिस्मृतीचीं कामारें ॥ त्यांचें अज्ञानकाविरें नुरे ॥ एके ज्ञानेंविण ॥१८॥ निर्वाळलया भक्त एक चांग ॥ जरी आचरेल राजयोग ॥ परी न फिटतां अज्ञानपांग ॥ सुटिका नाहीं ॥ १९ ॥ भक्तचक्रचूडामणि ॥ उद्धव एक त्रिभुवनीं ॥ तोहि अपरोक्षज्ञान देऊनी ॥ सोडविला श्रीकृष्णें ॥ १२० ॥ भलतसें तप कीजे ॥ भलता जप जपिजे ॥ परी ज्ञानेंवीण न सुटिजे ॥ अज्ञान-

---

नाहीं. तो अज्ञानांधकार सद्गुरुप्रसादानें आपोआप लयास जातो. १६ तर श्रीगुरुप्रसादानें राजयोग प्राप्त झाला तेथें वेदाचे किंवा शास्त्राचे श्रम करावे लागत नाहींत; व अष्टांगयोगाच्या अभ्यासाची गरज नाहीं; १७ तपतीर्थांचा डंका, किंवा श्रुतिस्मृतींचीं काम्यकर्में, किंवा त्यांचा अज्ञानभ्रम–एका ज्ञानावांचून कांहींच रहात नाहीं. १८ एखादा उत्तम भक्त निवटला आणि त्यानें राजयोगाचें आचरण केलें, तरी अज्ञानाची खटपट चुकल्यावांचून सुटका नाहीं. १९ भक्तसमुदायांतील शिरोमणि त्रिभुवनांत एक उद्धवच होऊन गेला. त्यालाहि श्रीकृष्णांनीं अपरोक्ष ( वस्तु ) ज्ञान देऊन मुक्त केला. २० वाटेल तें तप केलें, किंवा वाटेल तो जप जपला तरी अज्ञानानें जो बहिर्मुख आहे त्याला ज्ञानावांचून सुटका नाहीं.

बहिर्मुखीं ॥ २१ ॥ ह्मणूनि सहसा जन्मावें ॥ ईश्वरातें ओळखावें ॥ तेणें चित्तशुद्धिद्वारें पावावें ॥ ज्ञान अपरोक्ष तें ॥२२॥ भवपाश तोडितें शस्त्र ॥ ज्ञान खड्ग ईश्वराचें विचित्र ॥ परी जीवाचें कैसें कर्मसूत्र ॥ जी अनावड जेथें ॥ २३ ॥ तें स्वानुभवज्ञान ॥ न पाविजे गुरुकृपेवीण ॥ ह्मणूनि तेथींचें महिमान ॥ अगाध असे ॥ २४ ॥ आतां असो हें बोली ॥ म्यां जी गुरुस्तुति केली ॥ ती प्रीती पावली ॥ गुरुपरंपरें ॥ २५ ॥ मज चातुर्यदशा न जोडे ॥ ह्मणूनि हे बोबडे ॥ जैसे ऊंस दिसती वाकुडे ॥ परी अंतरीं रसाळ ॥ २६ ॥ शृंगारादि नवरस ॥ हे जेथें दिसती विरस ॥ तें परब्रह्म एकरस ॥ जाणावें पैं ॥ २७ ॥ कस्तुरी कीर काळी ॥ परिमळता सौभरे

---

२१ ह्मणून जन्माला तर यावें; ईश्वराला ओळखावें; आणि चित्तशुद्धीच्या द्वारानें तें अपरोक्षज्ञान प्राप्त करून घ्यावें. २२ संसारबंधन तोडणारें ज्ञानखड्ग हें ईश्वराचें एक विलक्षण हत्यार आहे. परंतु जीवाची कर्मरेषा पहा कशी आहे ती? कीं त्याची त्यास आवड ह्मणून नाहीं! २३ तें स्वानुभवज्ञान गुरुकृपेवांचून प्राप्त व्हावयाचें नाहीं म्हणून त्याचा महिमा अगाध आहे. २४ असो. आतां हें भाषण पुरे. मीं जें गुरूंचें स्तवन केलें, तें गुरुपरंपरेस आवडलें. २५ माझ्या अंगीं चातुर्याची कला नाहीं, म्हणून हें सारें भाषण बोबडें समजावें. ऊंस वांकडेतिकडे असतात पण आंत जसे अगदीं रसभरित असतात; २६ जेथें शृंगारादि नऊ रसहि रसहीन होतात तें एकरस परब्रह्म जेथें आहे, हें ध्यानांत ठेवावें. २७

आगळी ॥ तैसी आर्ष ही बोली ॥ परी ब्रह्ममुखाची॥२८॥ सद्यज्ञानोत्पत्ति ऐशी प्रतिज्ञा ॥ तरी तेथें न करावी अवज्ञा॥ ग्रंथ श्रवणमात्रें सर्वज्ञा ॥ होइजे पैं ॥ २९ ॥ रसिक मुद्रा बोलिजेल ॥ तरी ग्रंथाचा विस्तार पविजेल ॥ परी परमार्थ न कळेल ॥ मथिताक्षरेंविण ॥ ३० ॥ ये ग्रंथींचें हेंचि आश्चर्य ॥ जें रोकडें स्वानुभवसौंदर्य ॥ ह्मणूनि ऐकती मुनिवर्य ॥ विवेकसिंधु ॥ ३१ ॥ जयांसी नाहीं प्रतीति ॥ नेणती तर्कमुद्रेची स्थिति ॥ तयांलागीं मराठिया उक्ती ॥ केली ग्रंथरचना ॥ १३२ ॥ उपार्जनेचा श्रम नेणे बाळ ॥ तयाचे मुखीं मिष्टान्नकवळ ॥ सुये जेवीं जननी कृपाळ ॥

---

कस्तुरी खरोखर काळी असते, परंतु सुवासानें विशेष दाटलेली असते, त्याचप्रमाणें हें बोलणें जरी आर्षपणाचें आहे तरी तें ब्रह्म-मुखीचें आहे. २८ तावडतोब ज्ञान प्राप्त होईल अशी प्रतिज्ञा आहे. म्हणून तेथें अवज्ञा ( अवमान, आज्ञाभंग ) करूं नये. तर ह्या ग्रंथाच्या श्रवणानें सर्वज्ञ होऊन रहावें. २९ रसिकांची मुद्रा सांगावयास गेलें तर ग्रंथाचा विस्तार मात्र होईल. पण सारभूत अक्षरांवांचून परमार्थ कांहीं समजावयाचा नाहीं. १३० ह्या ग्रंथाचा हाच मोठा चमत्कार आहे कीं, येथें प्रत्यक्ष स्वानुभवसौंदर्य आहे. म्हणून मुनिश्रेष्ठ विवेकसिंधु श्रवण करितात. ३१ ज्यांना अनुभव नाहीं, तर्क कसा चालवावा, हें ज्यांस माहित नाहीं, त्यांच्यासाठीं मराठी भाषेमध्ये ही ग्रंथरचना केली आहे. ३२ मिळविण्याचे श्रम कांहीं बालकाला माहित नस-

अपत्याविषयीं ॥ ३३ ॥ उपनिषदांचें निर्मित ॥ काढूनि केला हा ग्रंथ ॥ तेंचि करीत शिष्यजात ॥ सिद्ध भोक्ते ॥ ३४ ॥ वेदांतशास्त्राचा मथितार्थ ॥ जो बोले परमार्थ ॥ येणें ओळखिजे हृदयांत ॥ श्रोतेजनीं ॥३५॥ या संप्रदायाचा अभिमानी ॥ स्वयें आपण शूळपाणी ॥ तरी प्रीति पावो तेथ वचनीं ॥ सर्वेश्वरीं ॥ ३६ ॥ संपलें या ग्रंथाचें उत्तरार्ध ॥ जें निर्गुण निरुपम प्रसिद्ध ॥ ह्मणती राजयोगी सिद्ध ॥ मुकुंदराज ॥ १३७ ॥ इतिश्रीमद्विवेकासिंधौ गुरुशिष्यसंवादे गुरुप्रशंसानिरूपणं नाम एकादश प्रकरणं समाप्तम् ॥ ११ ॥ श्रीगुरु प्रसन्न ॥ इति विवेकसिंधु उत्तरार्ध समाप्त ॥ श्रीमत्सच्चिदानंदगुरुचरणारविंदाभ्यां नमः ॥

---

तात. परंतु अपत्यावर माया-प्रेम-करणारी आई त्याच्या तोंडांत ज्याप्रमाणें मिष्टान्नाचा घास घालते, ३३त्याचप्रमाणें उपनिषदांचें सार काढून हा ग्रंथ रचला आहे. सिद्ध व भोक्ते असे सर्व शिष्य तेच करणारे होत. ३४ वेदांतशास्त्राचें रहस्य जो परमार्थ तो जो सांगेल तो अशाप्रकारें श्रोतेजनांनीं मनांत ओळखून ठेवावा. ३५ ह्या सांप्रदायाचे अभिमानी स्वतः शूळपाणी शंकर आहेत त्यांचींच तर भाषणें त्य. सर्वेश्वराला मान्य होवोत. ३६ सिद्ध व राजयोगी मुकुंदराज ह्मणतात "निर्गुण" ज्याला उपमाच नाहीं असें ह्या ग्रंथाचें प्रख्यात उत्तरार्ध संपूर्ण झालें.' ३७

समाप्त.

# सार्थ अध्यात्मरामायण.

हा भावीक लोकांचा नित्यपाठाचा ग्रंथ आहे. हा आह्मीं पोथीसाईझ मूळ संस्कृत व मराठी भाषांतरासह ( गुटका ) छापला आहे व बांधणी जाड व रेशमीपुठ्याची केली आहे. टाईप मोठा घातला आहे. याचीं पृष्ठें ९०० वर झालीं आहेत. याची किंमत पांच रुपये आहे. तरी चालू महिनाअखेर जो घेईल त्यास पुढील १० पुस्तकें बक्षीस मिळतील.

मुकुंदरायकृत सार्थ परमामृत किंमत आठ आणे.

वामनीटीका व मराठी अर्थासह.

सार्थ शृंगारशतक किं० ०६ आणे.
सार्थ नीतिशतक किं० ०६ आणे.
सार्थ वैराग्यशतक किं० ०६ आणे.

रा. रा. बाबागर्देकृत

गीतपंचदशी. किं० ८ आणे.

गीतामृतशतपदी किं० ८ आणे.

कालिदासकृत

सार्थ मेघदूत काव्य किं० ८ आणे.

गीतामाधुरी अथवा गीतेवर संगीत पदें किंमत १ रु.

महासाधु माधवदासकृत

प्राकृत योगवासिष्ठ किं० १॥ रु.

भजनतरंगिणी अथवा सर्व संतांच्या भजनी पदांचा संग्रह किं. ६ आणे.

गजानन चिंतामण शास्त्री देव.

श्रीमत्सद्गुरुचरणारविंदाभ्यां नमः ।

# सार्थ परमामृत.

## प्रकरण पहिलें.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ नमो श्रीसद्गुरुनाथा ॥ तूं परमप्राप्तीचा दाता ॥ कृपासिंधू जी समर्था ॥ अनंता अपारा ॥ १ ॥

हे सद्गुरो तुला नमस्कार असो ! तूं मोक्षाची प्राप्ति करून देणारा आहेस, तूं दयेचा समुद्र आहेस. तूं समर्थ आहेस, अनंत आहेस, तुझा पार लागत नाहीं ! ॥ १ ॥

तूं आनंदमय स्वयंप्रकाश ॥ कैवल्यदाता परम ईश ॥
तूं निजरूपें अविनाश ॥ निराकार ॥ २ ॥

तूं आनंदाचाच बनलेला आहेस. तूं आपल्याच तेजानें प्रकाशित होतोस. तूं मोक्ष देणारा आहेस. तूं सर्वांचा धनी आहेस. तूं केवळ ब्रह्मस्वरूप आहेस म्हणून तुझा नाश होत नाहीं. तूं आकाररहित आहेस. ॥ २ ॥

तूं निःसंग निरंजन ॥ तूं निरंतर अभिन्न ॥
नाहीं तुजसमान ॥ कोणी देवा ॥ ३ ॥

तूं विषयोपभोगांपासून अलिप्त आहेस. सर्व कर्मांच्या पलीकडचा

आहेस. तूं जिकडे तिकडे एकसारखा भरलेला आहेस. तुझ्याहून वेगळें असें कांहीं नाहीं. हे देवा, सदगुरो! तुझ्यासारखा दुसरा कोणीही नाहीं. ॥ ३ ॥

**तूं जंव कृपा करिसी ॥ तंव संसारबंधना तोडिसी ॥**
**अविद्येपासूनि सोडविसी ॥ तारिसी जीवां ॥ ४ ॥**

तूं कृपा केलीस कीं लागलींच संसाराचीं बंधनें तोडून टाकतोस. जीवांना अविद्येपासून ( मायेपासून ) सोडवून त्यांचा उद्धार करतोस. ॥ ४ ॥

**न होय जें देवां असुरां ॥ तें तुझें करणें दातारा ॥**
**समर्थ न देखों दुसरा ॥ तुजवांचुनी ॥ ५ ॥**

जें देव किंवा राक्षस,यांच्याही हातून व्हावयाचें नाहीं, तें तूं सहज करितोस. तूं मोठा दाता आहेस. तुझ्याशिवाय आह्माला दुसरा कोणीही समर्थ दिसत नाहीं. ॥ ५ ॥

**आणिका कवणा नमस्कारूं ॥ कवणाचें स्तवन करूं ॥**
**जय जया जी श्रीगुरु ॥ अगाध महिमा ॥६ ॥**

यासाठीं दुसऱ्या कोणाला नमस्कार करूं बरें? स्तुति कोणाची करूं! हे गुरो, तुझें सामर्थ्य किती आहे, याचा थांग लागावयाचा नाहीं. तुझा जयजयकार असो. ॥ ६ ॥

**जैसा सर्व पटांमाजीं येक तंतू ॥ तैसा तूं विश्वीं विश्वभरितु ॥**
**सर्व व्यापूनि विरहितु ॥ अलिप्त तूं ॥ ७ ॥**

ज्याप्रमाणें एक सूतच सर्व वस्त्रभर पसरलेलें असतें, त्याप्रमाणें तूंच या सर्व जगामध्यें भरलेला आहेस. जरी हें सर्व विश्व तूं व्या-

पून टाकलें आहेस, तरी तूं त्यापासून अगदीं वेगळा आहेस.॥७॥

हीं अनेक सगुण रूपें ॥ तूं धरिसी आपुलेनि व्यापें ॥
शिवशक्तीचीं साकार रूपें ॥ दाविसी तूं ॥ ८ ॥

अनेक प्रकारचीं हीं जगामध्यें दिसणारीं सगुण रूपें तूं आपल्या इच्छेप्रमाणें धारण करतोस. शिव आणि शक्ति ( ब्रह्म आणि माया ) यांचीं आकार पावलेलीं रूपें कशीं आहेत, हें तूं दाखवितोस. ॥८॥

तुजविण अन्य न देखों कोणी ॥ म्हणोनि आणिकातें न मानीं ॥
हा मस्तक तुझिये चरणीं ॥ ठेविला सत्य ॥ ९ ॥

हे गुरो, तुझ्याखेरीज दुसरा कोणी मी पहात नाहीं. म्हणून इतर कोणीही माझ्या मनांत येत नाहीं. खरोखर, हें माझें मस्तक तुझ्या पायांवर ठेविलें आहे. ॥ ९ ॥

तूं शुद्धात्मा स्वयंज्योती ॥ तुझी सर्वत्र ज्ञानदीप्ती ॥
नमो नमो जी श्रीगुरुमूर्ती ॥ आनंद विभो ॥ १० ॥

तूं शुद्ध असा आत्मा आहेस. तूं आपल्याच तेजानें प्रकाशमान होणारा आहेस. तुझ्या ज्ञानस्वरूपाचा सर्व ठिकाणीं प्रकाश पडलेला आहे. हे आनंदरूपा ! विश्वव्यापका ! हे गुरो ! तुला माझा वारंवार नमस्कार असो ! ॥ १० ॥

तूं ब्रह्मारूपें उत्पत्ति करिसी ॥ विष्णुरूपें प्रतिपाळिसी ॥
रुद्ररूपें संहारिसी ॥ पुनरपि रचावया ॥ ११ ॥

तूं ब्रह्मदेव होऊन सर्व जग उत्पन्न करतोस. विष्णु होऊन त्याचें पालन करतोस आणि रुद्र ( शंकर ) होऊन त्याच जगाचा सं·

हार करतोस. आणि असा ज्याचा संहार केलास तेंच जग तूं पुनः उत्पन्न करितोस. ॥ ११ ॥

तूं सर्वसाक्षी सर्वज्ञ ॥ तूं सर्वविद्याविद प्राज्ञ ॥
तूं तत्त्वार्थ जीव सर्वज्ञ ॥ सर्वेश्वर ॥ १२ ॥

तूं हें सर्व जग साक्षिरूपानें पहातोस. तूं सर्वज्ञ, सर्व विद्या जाणणारा आहेस. तूं अत्यंत जाणता आहेस. तत्त्वार्थ ( तत् व त्वं या पदांचा लक्ष्यार्थ ) तूंच. जीव तूंच. सर्वेश्वर तूंच. ॥ १२ ॥

तूं जाणशी स्वरूपासी ॥ ह्मणोनि जाणीव स्फुरविसी ॥
परमात्मा ह्मणविसी ॥ यया उपाधिस्तव ॥ १३ ॥

तूं आत्मस्वरूप जाणतोस, ह्मणून जाणिव ( ज्ञान ) प्रगट करतोस. ह्या उपाधीमुळेंच तुला परमात्मा असें ह्मणतात. ॥ १३ ॥

तुझिये इच्छेचा विस्तारू ॥ विस्तारलें हें चराचरू ॥
जीव अंश अपारू ॥ स्फुरसी तूंची ॥ १४ ॥

हें सर्व स्थावर व जंगम सर्व जग केवळ तुझ्या इच्छेनेंच वाढलें आहे. तूंच अनेक जीवांचीं रूपें घेऊन प्रगट होतोस. ॥ १४ ॥

सर्व जीवांची ज्ञप्तिकळा ॥ जगासि जाणे सकळा ॥
तो ज्ञानात्मा जिव्हाळा ॥ त्वंपदाचा तूं ॥ १५ ॥

जीवांच्या अंगीं असणारी जी ज्ञानशक्ति ती तूंच आहेस. तूं 'त्वं' पदाचा मथितार्थ असा ज्ञानस्वरूप आत्मा आहेस. तूं सर्व जगाला जाणत असतोस. ॥ १५ ॥

मायाअविद्यासंबंधें ॥ जीव ईश्वर होसी भेदें ॥
हाहि आपुलेनि विनोदें ॥ खेळ तुझा ॥ १६ ॥

तूं मायेची उपाधि धरून ईश्वर होतोस, आणि अविद्येची उपाधि धारण करून जीव होतोस; पण हा तुझाच विनोद आहे. तुझा खेळ आहे. ॥ १६ ॥

**तूं स्वानंद सदोदित ॥ असिपदीं तदात्मा अलिप्त ॥**
**पदातीत स्वयंभरित ॥ कैवल्य तूं ॥ १७ ॥**

तूं केवळ आपल्याच आनंदानें युक्त आहेस. ' तत् ' ह्या पदाचें व ' असि ' ह्या पदानें होणाऱ्या ऐक्याचें तूं स्थान आहेस. तथापि तूं अलिप्त आहेस. तूं पद व पदार्थ यांच्या पलीकडचा आहेस. तूंच तुझ्या ठिकाणीं भरलेला आहेस. तूं केवळ मोक्षच आहेस. ॥ १७ ॥

**ऐशी करितां तुझी स्तुती ॥ मुकावल्या वेदश्रुती ॥**
**मग मी प्राकृत किती ॥ वर्णावया योग्य तुज ॥ १८ ॥**

अशा प्रकारें तुझें स्तवन करीत असतां प्रत्यक्ष वेदालाही मौन पडलें ! मग मी तर विषयी व जड असा जीव असल्यामुळें तुझें वर्णन करावयास कसा बरें योग्य होईन ? ॥ १८ ॥

**तूं प्रेमभरित परमपुरुष ॥ चतुर्विधा वाचेचा ईश ॥**
**आतां देईं देवा मतिप्रकाश ॥ तुज जाणावया ॥ १९ ॥**

हे गुरो, तूं मोठा प्रेमळ आहेस, श्रेष्ठ आहेस. चारी वाणी तुझ्या ताब्यांत आहेत. यासाठीं हे देवा, तुझें स्वरूप जाणतां यावें असें माझ्या बुद्धीला सामर्थ्य दे. ॥ १९ ॥

**तूं कृपासिंधू जरी वरद होसी ॥ तरी अज्ञान जीवाचें फेडिसी ॥**
**मग लोपलें प्रगटविसी ॥ शिवत्व सिद्ध ॥ २० ॥**

तूं दयेचा समुद्र आहेस. तूं जर वर दिलास, तर जीवांच्या

अज्ञानाचा तात्काळ नाश होतो. आणि जें तुझें शिवत्व लोपलेलें आहे तें उघड दिसूं लागतें. ॥ २० ॥

**ह्मणोनि मी विनवीं शरणागत ॥ तूं ज्ञानसूर्य हृदयीं उदित ॥**
**तरी अविद्यातम क्षणांत ॥ फिटेल स्वामी ॥ २१ ॥**

यासाठीं शरण आलेला मी तुझी विनवणी करीत आहें. तूं ज्ञानाचा सूर्य आहेस म्हणून हृदयांत तुझा उदय झाला, ह्मणजे अज्ञानरूपी अंधकाराचा एका क्षणांत नाश होऊन जाईल ॥ २१ ॥

**यावरी श्रीगुरु झाले प्रसन्न ॥ करविती परमार्थाचें कथन॥**
**बोलेन सकळ शास्त्रांचें मथन ॥ निर्वाण तेंची ॥ २२ ॥**
**इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते मंगलाचरणं नाम प्रथमं प्रकरणं संपूर्णम् ॥ १ ॥**

अशा प्रकारची विनंति ऐकून सद्‌गुरू प्रसन्न झाले; आणि त्यांनीं परमार्थाचा उपदेश माझ्याकडून करविला. सर्व शास्त्रांचें मंथन करून जें हें उत्तम असें ' परमामृत ' काढलें आहे, तेंच आतां सांगेन. त्याचेंच नांव मोक्ष आहे. ॥ २२ ॥

---

## प्रकरण दुसरें.

**॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ जें जाणोनि सर्व कीजे ॥ जें सर्वदा अभ्यासिजे॥जेथें परतोनि चित्तें राहिजे ॥ बुडी देउनी॥१॥**

प्रथम जें समजून घेऊन नंतर सर्व कांहीं करावयाचें, ज्याचा

सर्वदा अभ्यास करावयाचा, मनानें मागें वळून ज्या ठिकाणीं निमग्न होऊन राहावयाचें, ॥ १ ॥

**तें अभ्यंतरींचें ज्ञान ॥ प्रकट बोलेन साधन ॥**
**जेथें रतले योगीजन ॥ निरंतर ॥ २ ॥**

तें जें आत्मज्ञान, तें प्राप्त होण्याचें साधन आतां सांगेन. त्या आत्मज्ञानामध्येंच योगी सर्वदा रममाण होतात. ॥ २ ॥

**जैसें सागरींचें अमृत ॥ कां पय मथूनि काढिजे नवनीत ॥**
**तैसें सार सर्वांत ॥ तेंचि सांगेन ॥ ३ ॥**

ज्याप्रमाणें समुद्रांतून महाप्रयासानें काढलेलें अमृत, किंवा दूध घुसळून त्यांतून काढलेलें लोणी, हें त्याचें सार आहे, त्याप्रमाणें सर्व प्रकारें विचार करून त्यांत जें सार निघेल, तेंच मी सांगेन. ३

**नलगे यापरतें कांहीं करणें ॥ नाना परींचीं अभ्यासनें ॥**
**संकल्पविकल्पात्मक साधनें ॥ सर्व त्यजिजे ॥ ४ ॥**

या आत्मविचाराखेरीज दुसरें कांहीं करावयास नको. अनेकप्रकारचे अभ्यासही करावयास नकोत. ज्यांमध्यें अमुक करावें किंवा अमुक करूं नये, असे संशय येतात, तीं सर्व साधनें टाकून द्यावींत. ॥ ४ ॥

**संकल्पविकल्पात्मक मतें ॥ नाना दर्शनें कष्टतें ॥**
**जंव महावाक्याचें विवरण चित्तें ॥ अनुभविलें नाहीं ॥ ५ ॥**

अनेकप्रकारचे वादविवाद, अनेकप्रकारच्या शास्त्रांचा अभ्यास करणें हे बिनाकारण कष्ट आहेत. जोंपर्यंत मनानें महावाक्याचा

नीट विचार करून त्याचा अनुभव घेतला नाहीं, तोंपर्यंत त्यांचा कांहींच उपयोग नाहीं. ॥ ५ ॥

जों निरुपाधि स्वरूप ॥ अनुभावलें नाहीं आपेंआप ॥
तोंवरी कष्टासि माप ॥ कवण करी ॥ ६ ॥

ज्याला कोणत्याही प्रकारची उपाधि नाहीं असें जें आत्मस्वरूप त्याचा जोंपर्यंत आपणास अनुभव आला नाहीं, तोंपर्यंत जीवास जे कष्ट होतात, त्यांची गणना कोण बरें करील ? ॥ ६ ॥

व्रतें तपें नियमांचिया सांकडी॥ संदेहीं गुंतलीं बापुडीं॥
तीं केवीं पावतील पैल थडी ॥ संसारसागराचिये॥ ७॥

व्रतें, तपें, नियम इत्यादि कर्मांच्या संकटांमध्यें जे बिचारे जीव पडले, ते संशयांत गुंतून गेले. ते या संसाररूपी समुद्राच्या पलीकडच्या तीरास कसे बरें जातील ? ॥ ७ ॥

पूजा स्नानें तीर्थें दानें ॥ मंत्र यंत्र योग हवनें ॥
कीजे तितुकें फळ भोगणें ॥ स्वर्गादिक सर्वथा ॥ ८ ॥

पूजा, स्नानें, तीर्थें, दानें, मंत्र, यंत्रें, योग, यज्ञयाग, इत्यादि केलीं असतां त्यांच्यापासून नुसतें स्वर्गप्राप्ति वगैरे फळ मात्र प्राप्त होईल. ॥ ८ ॥

जप तप अनुष्ठानें ॥ आणि नानापरीचीं साधनें ॥
मोक्ष न पाविजे आत्मज्ञानें ॥ वांचोनिया सर्वथा ॥ ९ ॥

जप, तप, अनुष्ठानें, आणि अनेक प्रकारचीं साधनें यांनीं मोक्ष होत नाहीं. पूर्णपणें आत्मज्ञान झालें, तरच मोक्ष मिळतो. ॥ ९॥

**जोंवरी जीवेश्वरउपाधि ॥ निरसूनि नेणिजे ऐक्यसिद्धी ॥**
**भेद सांडूनि शबल विरोधी ॥ शुद्धस्वरूप न प्रकाशे ॥ १० ॥**

जोंपर्यंत जीव आणि ईश्वर हा भेद होण्यास कारण ज्या अविद्या आणि माया ह्या उपाधि त्यांचें निरसन होऊन आत्मस्वरूपाचें ऐक्य ध्यानांत भरलें नाहीं, जोंपर्यंत भेद व उपाधि यांनीं मलिन झालेलें आत्मस्वरूप शुद्धस्वरूपानें ध्यानांत आलें नाहीं, ॥ १० ॥

**त्वंपद तत्पदींचें लक्ष ॥ शबल सांडोनि परोक्ष ॥**
**नेणिजे शुद्ध अपरोक्ष ॥ तंववरी मोक्ष कैंचा ॥ ११ ॥**

जोंपर्यंत 'त्वं' पद व 'तत्' पद ह्या दोन पदांचा लक्ष्यार्थ समजला नाहीं, उपाधियुक्त आणि अप्रत्यक्ष ( सांगोसांगीचें ) ज्ञान हें खरें नव्हे असें समजून तें सोडून दिलें नाहीं, जोंपर्यंत शुद्ध आणि प्रत्यक्ष ( अनुभवाचें ) ज्ञान झालें नाहीं, तोंपर्यंत मोक्ष कोठून मिळणार ? ॥ ११ ॥

**जोंवरी तो एक मी एक ॥ हा न तुटेचि कळंक ॥**
**जंव न प्रकाशे सम्यक ॥ तंव परमप्राप्ति न घडे ॥ १२ ॥**

जोंपर्यंत आत्मा वेगळा आणि मी वेगळा, हा भ्रम नाहींसा झाला नाहीं, आणि खऱ्या ऐक्यज्ञानाचा अनुभव आला नाहीं, तोंपर्यंत त्या श्रेष्ठ अशा मोक्षाची प्राप्ति घडणार नाहीं. ॥ १२ ॥

**जंववरी त्रिपद शोध न घडे॥ अर्धमात्रापर तें न सांपडे॥**
**क्षराक्षर निवाडा न घडे ॥ उत्तम पुरुषीं समरस ॥ १३ ॥**

जोंपर्यंत तत्, त्वं व असि, या तीन पदांचा पूर्ण विचार करतां आला नाहीं, आणि ( ॐकारांतील ) अर्धमात्रेच्या पलीकडे

असणारें तें ब्रह्म सांपडलें नाहीं, क्षर आणि अक्षर या दोघांच्याही पलीकडे असणारा जो उत्तम पुरुष, त्याचा लाभ घडला नाहीं, १३

सच्चिदानंदाविवरण ॥ जंव नेणिजे कार्य कारण ॥
विवळेना शुद्ध आत्मज्ञान ॥ तंव मोक्ष कैंचा ॥ १४ ॥

सत्, चित् व आनंद, या पदांचें विवरण समजलें नाहीं, कार्य कोणतें व कारण कोणतें हें कळून शुद्ध आत्म्याचें ज्ञान झालें नाहीं, तोंपर्यंत मोक्ष कोठून मिळणार ! ॥ १४ ॥

सद्‌गुरुमुखें वेदांतश्रवण ॥ न घडे तयाचें मनन ॥
जवं न पाविजे निदिध्यासन ॥ तंववरी मोक्ष कैंचा ॥ १५ ॥

सद्गुरूच्या मुखानें वेदांताचें श्रवण करून नंतर स्वतः त्याचें मनन व निदिध्यासन ( एकसारखा अभ्यास ) हीं केलीं नाहींत, तर हीं करीपर्यंत मोक्ष कोठून मिळणार ? ॥ १५ ॥

सांडूनि वेदांतासिद्धांत ॥ जे कां बोलती पाखांडमत ॥
त्यांची नायकावी मात ॥ महावाक्यार्थ अनुभविजे ॥ १६ ॥

वेदांताचे ( उपनिषदांचे ) जे सिद्धांत आहेत ते टाकून देऊन जे कोणी नास्तिक मतांप्रममाणें बोलत असतात, त्यांचें तें बोलणें ऐकूं सुद्धां नये. केवळ महावाक्यांच्या अर्थाचा अनुभव घेत असावें. ॥ १६ ॥

वेद बोलिला सृष्टिक्रम ॥ तो सांडुनी सकळ धर्म ॥
वेदांताचें निजवर्म ॥ लाहिजे गुरुमुखें ॥ १७ ॥

वेदांनीं सृष्टिक्रम चालावा म्हणून कर्ममार्गाचा उपदेश केला आहे, पण तो सोडून देऊन वेदांनीं शेवटीं सांगितलेलें जें मर्म (ज्ञा-

नमार्ग ) त्याचा श्रीगुरूच्या मुखांतून लाभ करून घ्यावा. ॥१७॥

वेदांताचें अबोलणें ॥ सिद्धांतींचें जाणोनि नेणणें ॥
जेथें मिळणी होय तें पावणें ॥ कैवल्यपद ॥ १८ ॥

ज्याठिकाणीं वेदसुद्धां मुके होतात, शास्त्रांना जें कळूनही न कळल्यासारखें वाटतें, अशाप्रकारें वेद व शास्त्रें यांची मति जेथें कुंठित होते, तोच मोक्ष. तोच मिळवावयाचा. ॥ १८ ॥

जीवेश्वराची मिळणी ॥ होय परमपद निर्वाणीं ॥
तेथें द्वैतबुद्धीची कडसणी ॥ तुटोनि जाय ॥ १९ ॥

इति श्रीपरमामृते मुकुंदराजाविरचिते
अन्यमतखंडनं नाम द्वितीयं प्रकरणं संपूर्णम् ॥

जीव आणि शिव यांची एकता त्या परमात्मस्वरूपामध्येंच होते. आणि ती एकता एकदा झाली, म्हणजे द्वैतबुद्धिमुळें वाटणारें संकट नाहींसें होऊन जातें. ॥ १९ ॥

---

## प्रकरण तिसरें.

॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ करूनि आदिशक्तीचा अंगिकारू ॥
जो करी उत्पत्ति स्थिति संहारू ॥ सर्वसाक्षी सर्वेश्वरू ॥
तो शबल बोलिजे ॥ १ ॥

आदिशक्ति जी माया, तिचा अंगीकार करून जो उत्पत्ति स्थिति आणि लय हीं करितो, त्या सर्वसाक्षी व सर्वसत्ताधारी परमात्म्याला शबल असें म्हणावें. ॥ १ ॥

**स्थूलदृष्टीचें जाणणें ॥ तितुकेंही निरसणें ॥**
**उरे अदृश्य जो द्रष्टेपणें ॥ तोचि शुद्ध परमात्मा ॥ २ ॥**

स्थूलदृष्टीला ( चर्मचक्षूंला ) दिसणारे जे जे पदार्थ ते ते सर्व सोडून देऊन त्या सर्वांच्या पलीकडे असलेला, व न दिसणारा, परंतु स्वतः सर्व पहाणारा, तोच शुद्ध परमात्मा होय. ॥ २ ॥

**सर्वज्ञ आणि सर्वेश्वरू ॥ ऐसा सकळ शास्त्रांचा निर्धारू ॥**
**तोचि जाणिजे परात्परू ॥ ज्ञप्तिमात्र ॥ ३ ॥**

तो सर्वज्ञ आहे, आणि सर्व सत्ताधारण करणारा आहे, असा सर्व शास्त्रांचा सिद्धान्त आहे. तोच केवळ ज्ञानमय आणि सर्वांच्या पलीकडचा आत्मा आपणास जाणावयाचा आहे. ॥ ३ ॥

**अनंतशक्तींचा द्रष्टा ॥ स्थानमानविरहित प्रतिष्ठा ॥**
**जया अपरमित घनदाटा ॥ पार नेणिजे ॥ ४ ॥**

तो अनेक प्रकारच्या शक्ति पाहतो. त्याला कोणतीही जागा नसतां तो राहतो. त्याला मोजण्याचें प्रमाण नाहीं. तो या विश्वामध्यें जिकडे तिकडे ओतप्रोत भरलेला आहे. त्याचा अंत लागत नाहीं. ॥ ४ ॥

**तया बोलिजे शुद्ध ॥ निरसिजे शबलत्व अशुद्ध ॥**
**ज्ञानघनानंदसिद्ध ॥ परमेश्वर ॥ ५ ॥**

अशा प्रकारच्या आत्म्यास शुद्ध असें म्हणावें. मायोपाधिक आत्मा अशुद्ध आहे, असें समजून त्याचा त्याग करावा. तो परमात्मा ज्ञानमय आणि अतिशय आनंदमय आहे. परमेश्वर तो तोच.॥५॥

**ब्रह्मांड हिरण्यगर्भ माया ॥ जो वेगळा या देहत्रया ॥**
**मूळ प्रकृति महामाया ॥ यां विलक्षण जो ॥ ६ ॥**

ब्रह्मांड, हिरण्यगर्भ ( विराट् ), माया, तीन देह, मूळ प्रकृति, किंवा शुद्ध सत्वगुणयुक्त माया या सर्वांहून तो अगदीं वेगळा आहे. ॥ ६ ॥

**उत्पत्ति स्थिति संहार ॥ सर्वसाक्षित्वाचा व्यवहार ॥**
**या अवस्थातीत अपार ॥ आपेंआप जो ॥ ७ ॥**

उत्पत्ति, पालन व नाश आणि साक्षित्वानें सर्व व्यवहार करणें, या सर्व अवस्थांच्या तो अगदीं पलीकडचा आहे. तो आपला आपण (एक) अद्वितीय आहे. ॥ ७ ॥

**ब्रह्मा विष्णु रुद्र ॥ आणि चौथा हा सर्वेश्वर ॥**
**यावेगळा अपरंपार ॥ शुद्ध ब्रह्म जो ॥ ८ ॥**

ब्रह्मा, विष्णु व शंकर आणि चौथा सर्वेश्वर यांच्याहूनही तो निराळा आहे. आणि त्याचा अंत लागत नाहीं. तोच शुद्ध आत्मा होय. ॥ ८ ॥

**याचिपरी पाहतां ॥ जीव अविद्याविरहिता ॥**
**काम्यकर्मातीता ॥ जाणिजे ऐसा ॥ ९ ॥**

याप्रमाणें पाहिलें असतां जो अविद्येपासून मोकळा झाला, ज्यानें फलांची इच्छा धरून करावयाच्या कर्मांचा त्याग केला, त्याच जीवाला याचें ज्ञान होईल. ॥ ९ ॥

**स्थूळ सूक्ष्म कारण ॥ चौथा देह महाकारण ॥**
**जागृति स्वप्न सुषुप्ती जाण ॥ तुरीया चौथी ॥ १० ॥**

स्थूल, सूक्ष्म, कारण व चौथा महाकारण, असे चार देह; जागृति, स्वप्न. निद्रा व तुर्या या चार अवस्था आहेत. ॥ १० ॥

**विश्व तैजस प्राज्ञ ॥ प्रत्यगात्मा सर्वज्ञ ॥**
**हे अभिमानी संज्ञ ॥ शबल त्वं पदार्थी ॥ ११ ॥**

विश्व, तैजस, प्राज्ञ, आणि सर्वज्ञ असा प्रत्यगात्मा हे चार अभिमानी आहेत; देह, अवस्था व अभिमानी यांनीं युक्त असा जो जीव, तोच मायोपाधिक ' त्वं ' पदाचा अर्थ होय. ॥ ११ ॥

**या इतुकियाचा द्रष्टा ॥ तो ज्ञानघन तया प्रगटा ॥**
**शुद्ध बोलिजे प्रतिष्ठा ॥ जीवत्वनिरासें ॥ १२ ॥**

या सर्वांला जो पहाणारा, तो केवळ ज्ञानस्वरूप आहे. जीवत्वाचा--मायेच्या उपाधीचा--निरास करून जो प्रकट होतो, त्यालाच शुद्ध असें म्हणावें. ॥ १२ ॥

**शबल तो वाच्य पक्ष ॥ शुद्ध बोलिजे लक्ष्य ॥**
**लक्ष्यीं ऐक्य जाणितल्या मोक्ष--॥ सिद्धीचि लाभे ॥ १३ ॥**

शबल जो ' त्वं ' पदार्थ तो वाच्य ( शब्द उच्चारितांच ध्यानांत येणारा ) अर्थ आहे. आणि शुद्ध असा जो ' तत् ' तो लक्ष्य ( विचार करून पाहिला असतां ध्यानांत येणारा ) अर्थ आहे. लक्ष्य असा जो परमात्मा त्याच्याशीं वाच्य अशा जीवाचें ऐक्य आहे, असें जाणलें कीं लागलींच मोक्षाची प्राप्ती होते. ॥ १३ ॥

**दोन्हीं नयनीं एक दृष्टी ॥ दोहीं श्रवणीं एक नाद उठी ॥**
**दोहीं अधरपुटीं ॥ एकचि शब्द ॥ १४ ॥**

जरी डोळे दोन असले, तरी पहाण्याची शक्ति ती एकच, दोन

कान असले, तरी ऐकण्याची शक्ति ती एकच, दोन ओठ असले तरी शब्द निघतो तो एकच, ॥ १४ ॥

**तैसें दोहीं पदींचें एक विवरण ॥ करितां जीवेश्वरांचें निरसन ॥**
**शुद्ध लाधे तया कवण ॥ द्वैत कल्पी ॥ १५ ॥**

त्याप्रमाणें 'तत्' व 'त्वं' या दोन्ही पदांचा विचार केला असतां तीं एकच आहेत असें ज्ञान होतें. जीव व ईश्वर यांचें निरसन केलें असतां जें एक शुद्धस्वरूप बाकी राहतें, त्याच्या ठिकाणीं दुजाभाव कोण कल्पील बरें? ॥ १५ ॥

**जैसें महदाकाश अखंड पूर्ण ॥ घटमठीं दिसे भिन्न ॥**
**घटमठाकाश ऐसें जाण ॥ बोलती तया ॥ १६ ॥**

महदाकाश जसें एकच असूनही घट व मठ या उपाधींच्या योगानें भिन्न दिसतें म्हणून एकाला घटाकाश व दुसऱ्याला मठाकाश असें म्हणतात, ॥ १६ ॥

**ते घट मठ दोन्ही भंगतां ॥ ठायींचींचि ऐक्य तत्त्वतां ॥**
**तैसें जीवेश्वर उपाधी निरसतां ॥ स्वस्वरूप एक ॥ १७ ॥**

पण तो घट व तो मठ या दोहोंचाही नाश झाला असतां त्यांचें महदाकाशामध्यें ऐक्य होतें, तसें जीव व ईश्वर या उपाधींचा नाश झाला, म्हणजे केवळ एकटें आत्मस्वरूप मात्र शिल्लक राहतें. ॥ १७ ॥

**माया अविद्या नाशीं ॥ ऐक्य होय जीवेश्वरांसीं ॥**
**तैसें बुझोनिया मानसीं ॥ सुखिया होइजे ॥ १८ ॥**

माया व अविद्या या उपाधींचा नाश झाला, म्हणजे जीव व ईश्वर

यांचें ऐक्य होतें, असें मनामध्यें पक्कें समजून आपण सुखी व्हावें.॥ १८॥

माया अविद्येसि पाहतां ॥ विरोध भासे उभयतां ॥
म्हणोनि शबलत्यागें शुद्ध घेतां ॥ अखंड एकरस ब्रह्म ॥ १९॥

माया व अविद्या यांच्यासंबंधानें विचार केला म्हणजे त्या दोन्ही भिन्न भिन्न आहेत असें समजतें. म्हणून शबल असे जे जीव व ईश्वर त्यांचा त्याग केला असतां अखंड, एकचएक अशा शुद्ध-ब्रह्माचा लाभ होतो. ॥ १९ ॥

ऐसेनि महावाक्यविवरणें ॥ त्वंपद तत्पद शोधणें ॥
असिपदीं पावणें ॥ ऐक्य सिद्ध ॥ २० ॥

अशाप्रकारें 'तत्त्वमसि' या महावाक्याचा विचार करावा. त्वंपद आणि तत्पद यांचा विचार करून त्या दोन्ही पदांचें असि या पदामध्यें ऐक्य करावें. ॥ २० ॥

म्हणूनि या दृष्टीविण ॥ सकळ भेदमतें जाण ॥
तें बोलिजे खंडज्ञान ॥ मायिक व्यवहार ॥ २१ ॥

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते ॥
महावाक्यविवरणं नाम तृतीयं प्रकरणं संपूर्णम् ॥

यासाठीं, अशाप्रकारच्या विचारावांचून जे इतर विचार तीं भेदवाद्यांचीं ( कुतर्कांनीं जीव व शिव हे निरनिराळे आहेत असें ठरविणाऱ्यांचीं ) मतें आहेत असें समजावें. तीं मतें पूर्ण विचार करून सिद्ध होत नाहींत. म्हणून त्यांस अर्धवट समजावें. तीं भुरळ घालणारीं आहेत. ॥ २१ ॥

---

# प्रकरण चवथें

आतां अद्वैत पाहणें ॥ तें दुसरें करूनियां जाणणें ॥
पुनरपि मुरवणें ॥ ठायींच्या ठायीं ॥ १ ॥

आतां अद्वैताचें जें ज्ञान करून घ्यावयाचें तें प्रथम द्वैताचें ज्ञान करून घेऊन त्यापासून संपादन करावयाचें आहे. पण पुनः तें द्वैत अद्वैतामध्येंच जिरवून टाकावयाचें. ॥ १ ॥

उफराटे दृष्टीनें पाहाणें ॥ जे दृष्टीमाजीं दृष्टि मुरवणें ॥
पाहातया मुळासि जाणणें ॥ स्वस्वरूपासी ॥ २ ॥

हें उलटया दृष्टीचें पहाणें आहे. दृष्टीमध्यें दृष्टि मिळवून टाकावयाची ( द्वैत ज्ञान हेंच अद्वैत आहे, अशी कल्पना करावयाची. ) आणि सर्वांला पाहणारें असें जें मूळचें स्वरूप त्या स्वरूपाचें ज्ञान करून घ्यावयाचें. ॥ २ ॥

तेथूनि परतें पाहतां ॥ नाहीं पाहाणें सर्वथा ॥
दुमदुमीत अखंडिता ॥ माजीं पडिजे ॥ ३ ॥

आत्मस्वरूपाचें दर्शन घेतल्यावर तेथून मागें पाहूं लागल्यास कांहींच दृष्टीस पडत नाहीं. कारण जिकडे तिकडे एकच्या एक भरलेलें असें जें ब्रह्म त्या ब्रह्मामध्येंच जीव लीन होऊन जातो. ॥ ३ ॥

जेथें नाहीं माया अविद्या ॥ जे अपरिमित स्वसंवेद्या ॥
ते सांगों ब्रह्मविद्या ॥ सावधान परियेसा ॥ ४ ॥

ज्या ठिकाणीं माया आणि अविद्या ह्या उपाधी नाहींत, जें मो-

जतां येत नाहीं, जें स्वतःचें स्वतःच जाणावयाचें आहे, अशा प्रकारचें जे ब्रह्मज्ञान तें आतां सांगतों. तें सावधपणानें ऐका. ॥ ४ ॥

जे घनानंदसुखाची रासी ॥ प्रवेशोनि तये स्वप्रकाशीं ॥
असिजे गमनागमनासी ॥ नासोनि सदा ॥ ५ ॥

जें केवळ अत्यंत सुखाची रास आहे, जें स्वतःच प्रकाशित होतें, त्या आत्मस्वरूपामध्यें प्रवेश करून जन्ममृत्यूचे फेरे चुकवावे. ५

तें साधावें कवणे रीती ॥ जेणें होय नित्यतृप्ती ॥
ते युक्ति ऐकावी सुनिश्चितीं ॥ एकाग्र होउनी ॥ ६ ॥

ज्याच्या योगानें सदोदित तृप्ति होते, तें ज्ञान साधकानें कोणत्या प्रकारें प्राप्त करून घ्यावें, ती युक्ति आतां सांगतों, ती एकाग्र मनानें ऐका. ॥ ६ ॥

परी आधीं सांगों साधन ॥ आत्मस्वरूपाचें परिज्ञान ॥
तें जाणितल्याविण ॥ काय ध्यावें ॥ ७ ॥

पण आधीं जीवाच्या स्वरूपाचें ज्ञान होण्याचें साधन सांगतों. तें प्रथम समजल्याखेरीज ब्रह्माचें ध्यान कसें करतां येईल ? ॥ ७ ॥

आधीं आत्मयातें जाणावें ॥ मग तयातें साधावें ॥
येरवीं नुसतें अनुभवावें ॥ काय धरूनी ॥ ८ ॥

आधीं आपण कोण हें समजून घ्यावें आणि नंतर तें ब्रह्मज्ञान साध्य करावें. एरव्हीं त्याचा अनुभव येण्यास आधार काय ? ॥ ८ ॥

ज्या युक्ती स्वरूप एक ॥ जाणणें ते बुद्धि ऐक ॥
मी आहें हें तंव निष्टंक ॥ जाणसी तूं ॥ ९ ॥

ज्या युक्तीनें तुला जीवाचें स्वरूप समजेल, ती युक्ति ऐक. मी

कोणी तरी आहे, एवढें मात्र तुला खात्रीनें समजत आहे. ॥ ९ ॥

**ऐसें तंव जाणसी ॥ परि मी कोण हें नेणसी ॥**
**तरी कां आपआपणासी ॥ बुझेसिना ॥ १० ॥**

एवढें तुला समजतें खरें, पण मी कोण हें मात्र तुला समजत नाहीं. तर तूं आपणच आपणाला कां बरें ओळखीत नाहींस? १०

**तूं कोण कोठूनि कैंचा ॥ आला गेलासि तरी साचा ॥**
**परी पालव न धरिसी विचाराचा ॥ आपणा जाणावया ११**

तूं कोण, कोठून व कधीं आलास, केव्हां गेलास, या विचाराच्या पिच्छेस लागून तूं आपलें स्वरूप आपण कां ओळखीत नाहींस? ॥ ११ ॥

**तूं देह कीं देहाचा जाण॥देह तुज जाणे कीं तुज याचें ज्ञान॥**
**पाहता द्रष्टा तूं आपण ॥ देह तुज दृश्य ॥ १२ ॥**

तूं देह आहेस, कीं देहाचा कोणी आहेस? तूं देहाला जाणतोस, कां देह तुला जाणतो? याचा जर विचार केलास तर पाहणारा म्हणजे द्रष्टा तो तूं आहेस व देह हा तुला दिसणारा-दृश्य आहे. १२

**देहा सबाह्य अभ्यंतरीं ॥ तूं जाणशी गा विचारीं ॥**
**देह अळंकाराचे परी ॥ मिरविशी तूं ॥ १३ ॥**

या देहाचा जर तूं विचार केलास, तर तो आंत बाहेर कसा आहे, हें तुझ्या ध्यानांत येईल. एकाद्या दागिन्याप्रमाणें तूं हा देह धारण करून डौलानें मिरवत आहेस. ॥ १३ ॥

**लेवोनि खोळि पंचभूतांची ॥ भूतीं मिरविशी तूंची ॥**
**जाणीव असे कीं याची ॥ तुजचि कीं ॥ १४ ॥**

हें पंचमहाभूतांचें पांघरूण घेऊन तूं मिरवत आहेस, हें तुझें तुला समजतें आहे का? ॥ १४ ॥

ऐसा आपणीया जाण ॥ निरसी हा दृश्यगुण ॥
जे देह मी ह्मणतोसि आपण ॥ ते सांडी भ्रांती ॥ १५॥

अशा प्रकारें तूं आपलें आपण ज्ञान करून घे. आणि देह हा दृश्य आहें, असें ओळखून देह तोच मी असें समजूं नको. मी देह आहें असें ह्मणतोस, ती भ्रांति आहे, ती सोडून ॥ दे. १५ ॥

देहाचिया अवयवां समस्ता ॥ तूंचि एक जाणता ॥
तो तुझा तूं आइता ॥ विचारूनि पाहीं ॥ १६ ॥

देहाला असणारे सर्व अवयव जाणणारा तूंच आहेस. म्हणून तूं देहाहून वेगळा आहेस, ह्या गोष्टीचा विचार करून पहा. ॥ १६ ॥

रोम त्वचा नाडी मांस ॥ आस्थि हे पांच अंश ॥
कठिण हा धरणीचा भास ॥ जाणशी तूं ॥ १७॥

केस, कातडी, शिरा, मांस व हाडें हे देहांतील पांच कठिण भाग पृथ्वीच्या अंशापासून झाले आहेत, हें तूं जाणतोसच. ॥१७॥

लाळ मूत्र शोणित ॥ मज्जा रेत हें आप द्रवत ॥
या पांचां अंशातें निश्चित ॥ जाणता तूं एक ॥ १८ ॥

लाळ, मूत्र, रक्त, मेंदु व रेत, हे पांच पातळ पदार्थ उदकाचे अंश आहेत; हें जाणणारा तूं वेगळाच आहेस. ॥१८॥

क्षुधा तृषा आलस निद्रा॥ मैथुन हे अंश वैश्वानरा ॥
या पांचांचिया व्यवहारा ॥ जाणशी तूं ॥ १९ ॥

भूक, तहान, आळस, निद्रा व मैथुन हे पांच तेजाचे अंश

आहेत, हे पांचही व्यवहार तुझ्या ओळखीचे आहेत. ॥ १९ ॥

**चलन धावन निरोधन ॥ प्रसरण आणि आकुंचन ॥**
**हे चंचळ पांचही गुण ॥ वायूचे देखणा तूं ॥ २० ॥**

चालणें, धांवणें, अडविणें, पसरणें व आंखडणें, हे पांच वायूचे धर्म आहेत, हें तूं पहातोसच. ॥ २० ॥

**काम क्रोध शोक जाण ॥लोभ भय हे पांच गुण ॥**
**तें आकाशाचें लक्षण ॥ देखणा तूं ॥ २१ ॥**

काम, क्रोध, शोक, लोभ आणि भय, हे पांच गुण आकाशाचे आहेत व ते तुला समजतात. ॥ २१ ॥

**ऐसे पंचभूतांचे अंश ॥ जाणसी पंचविस ॥**
**ते सर्वही तुज दृश्य ॥ स्थूल देह हा ॥ २२ ॥**

याप्रमाणें पांच भूतांचे पंचवीस अंश मिळून हा स्थूल देह झालेला आहे. याला पहाणारा तूं वेगळाच आहेस. ॥ २२ ॥

**याचे साही विकार जाण ॥ जायते अस्ति विवर्धन ॥**
**विपरिणमते वार्धक्य संहरण ॥ यासीच असे ॥ २३ ॥**

या स्थूल देहाला सहा विकार असतात. हा उत्पन्न होतो, आहे, वाढतो, पक्क होतो, म्हातारा होतो, आणि नाश पावतो. ॥ २३ ॥

**याचे वर्णव्यक्तिरूपासी ॥ जाणशी याचिया नामासी ॥**
**म्हणोनी तुज आत्मयासी ॥ हे विजाती कैंची ॥ २४ ॥**

याचा रंग, याचा वेगवेगळेपणा, याचें रूप, याचें नांव हीं तूं सगळीं जाणतोस. म्हणून हा देह तुला जीवाला विजातीय आहे. हा देह तूं नव्हेस. ॥ २४ ॥

**तूं आत्मा निराकार ॥ जाणसी या देहाचा आकार ॥**
**जरी काष्ठीं अग्नीचा संसार ॥ तरी वेगळा कीं ॥ २५ ॥**

तूं जीव आकाररहित आहेस, आणि या देहाचे आकार तूं जाणत असतोस. जरी लांकडामध्यें अग्नि गुप्त रूपानें राहातो, तरी तो लांकडाहून वेगळा आहे. ॥ २५ ॥

**तैसा तूं यांसी व्यापुनी ॥ असशी या स्थूळातें भरूनी ॥**
**रोमांच आदि अग्र करूनी ॥ जाणता तूं ॥ २६ ॥**

त्याप्रमाणें तूं या स्थूळ देहास व्यापून सर्व देहभर राहिला आहेस. या देहाच्या केंसाचें अग्र देखील तुला समजतें. ॥ २६ ॥

**परी हें तुज नेणे ॥ तूंचि असती जाणपणें ॥**
**तो तूं आत्मा आपण ॥ नव्हसी नर नारी ॥ २७ ॥**

पण हें शरीर अज्ञानी असल्यामुळें तें तुला ( जीवाला ) ओळखीत नाहीं ? पण तूं ज्ञानी आहेस. तर अशाप्रकारचा जो तूं तो स्थूळ देहामुळें भासणारा पुरुष किंवा स्त्री नाहींस. ॥ २७ ॥

**आत्मयाचेनि जागेपणे ॥ बाह्य व्यापार करणें ॥**
**इंद्रियद्वारा भोगणें ॥ विषयाचें घडे ॥ २८ ॥**

जीव जेव्हां जागृत असेल, तेव्हांच देहाचे बाहेरचे व्यापार होतात, आणि इंद्रियांच्या द्वारें मनाला विषयांचें सुख घेतां येतें ॥२८

**मी अमुका नामरूपाचा ॥ ऐसा हा अभिमान विश्वाचा ॥**
**तूं जाणता या सर्वांचा ॥ विलक्षण आत्मा ॥ २९ ॥**

**इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते स्थूलदेहनिरसनं नाम चतुर्थ प्रकरणं संपूर्णम् ॥ ४ ॥**

मी अमका, माझें नांव अमकें, असा जो अभिमान आहे, तो 'विश्व' या संज्ञेनें जो शास्त्रांत सांगितला आहे, त्याचा होय. म्हणजे स्थूल शरीराच्या अभिमान्यास विश्व असें म्हणतात. ॥ २९ ॥

---

## प्रकरण पांचवें.

तुज श्रवणांतूनि ऐकणें ॥ त्वचेंतूनि स्पर्श घेणें ॥
नयनांतूनि देखणें ॥ नानारूपांतें ॥ १ ॥

तूं कानांनीं ऐकतोस, त्वचेनें स्पर्श जाणतोस, आणि डोळ्यांनीं अनेक प्रकारचीं रूपें पाहतोस. ॥ १ ॥

जिव्हेंतूनि स्वाद घेसी ॥ घ्राणांतूनि परिमळ जाणसी ॥
वाचेंतूनि उच्चारीसी ॥ अक्षरें सर्व ॥ २ ॥

जिभेनें गोडी जाणतोस, नाकानें सुवास घेतोस, आणि तोंडानें सर्व अक्षरांचा उच्चार करतोस. ॥ २ ॥

करांतूनि देणें घेणें ॥ पायांतूनि चालणें ॥
शिश्नांतूनि रति भोगणें ॥ गुदीं मळविसर्ग ॥ ३

हातांनीं देतोस किंवा घेतोस. पायांनीं चालतोस, शिश्नानें रतिसुखाचा उपभोग घेतोस, आणि गुदद्वारानें मळाचा त्याग करतोस. ३

या इंद्रियांतूनि तूंचि जाण ॥ प्रकाशसी आड ठाकोन ॥
तो तूं इंद्रियांसि विलक्षण ॥ साक्षीरूप ॥ ४ ॥

या सर्व इंद्रियांच्या आड राहून तूं हीं इंद्रियांचीं कर्मे करीत

असतोस. तर अशाप्रकारचा जो तूं, तो इंद्रियांहून भिन्न आहेस, आणि तिन्हाइताप्रमाणें तूं तीं पाहतोस. ॥ ४ ॥

**श्रवण स्पर्शन दर्शन ॥ स्वाद अवग्रहण ॥**
**या ज्ञानेंद्रियेंकरून ॥ सकळ पांचही विषय ॥ ५ ॥**

ऐकणें, स्पर्श करणें, पहाणें, चव घेणें व हुंगणें हीं ज्ञानेंद्रियांचीं कर्में पांच आहेत. यांच्या द्वारानें शब्द, स्पर्श, रूप, रस गंध या पांचही विषयाचें ग्रहण करतां येतें. ॥ ५ ॥

**शब्द स्पर्श रूप रस गंध ॥ वचन आदान गमन आनंद॥**
**मळविसर्ग हे पंचविध ॥ कर्मेंद्रियां जाणता तूं ॥ ६ ॥**

यांचे शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध असे पांच विषय आहेत. बोलणें, देणेंघेणें, चालणें, आनंद पावणें आणि मलाचा त्याग करणें हीं पांच कर्में कर्मेंद्रियांचीं आहेत. या कर्मेंद्रियांचा जाणता तूंच आहेस. ॥ ६ ॥

**प्राण अपान व्यान ॥ उदान आणि समान ॥**
**यांचीं स्थानें स्थिति संपूर्ण ॥ जाणसी तूंचि एक॥ ७॥**

प्राण, अपान, व्यान, उदान व समान, हे पांच प्राण आहेत, यांचीं स्थानें व कर्में काय आहेत, हें सर्व तुला एकट्याला समजतें. ७

**अंतःकरण मन बुध्दि ॥ चित्त अहंकार या पांचा भेदीं ॥**
**स्फुरसी जाणसी तूं या आदी ॥ ठांईचाचि उभा ॥ ८ ॥**

अंतःकरण, मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार, या पांच गुणांनीं तूंच स्फुरण पावतोस. पण तूं या सगळ्यांच्या पलीकडे राहणारा—साक्षी—आहेस. ॥ ८ ॥

अंतःकरणींचा आठव सपुर॥ वरी उठती वृत्तीचे उद्गार॥
तयांसि जाणे तो अक्षर ॥ सिद्धाचि असे ॥ ९ ॥

अंतःकरणाचा मुख्य गुण आठवण ठेवणें हा आहे. पण या अंतःकरणावर कामक्रोधादि वृत्तींची गडबड चाललेली असते. पण या अंतःकरणाला जाणणारा तो--अक्षर--वेगळाच आहे. ॥ ९ ॥

वृत्तींचें स्फुरण झालें ॥ तयामागुनि जाणणें उठिलें ॥
हें ह्मणों नये पाहिलें ॥ आइतेंचि असे ॥ १० ॥

प्रथम वृत्ति उत्पन्न झाल्या, आणि त्यांमागून ज्ञान झालें असें म्हणण्याचें कारण नाहीं. ज्ञान हें पूर्वींचें व आयतेंच आहे. (कोणी केलेलें किंवा कोणापासून झालेलें नव्हे. ॥ १० ॥

अंतःकरणवृत्तींचें स्फुरण ॥ तें संकल्पविकल्पात्मक मन ॥
तेंचि निश्चयात्मक ह्मणोन ॥ बुद्धि ह्मणविजे ॥ ११ ॥

अंतःकरण व त्यावर उठणाऱ्या वृत्ति, यांचें ज्ञान ज्याला होतें, तें संकल्पविकल्पात्मक मन होय. त्या मनाचा संशय नाहींसा होऊन निश्चय ठरला, म्हणजे तिला बुद्धि म्हणतात. ॥ ११ ॥

निश्चयात्मक जो अर्थु ॥ तेथें अनुसंधानात्मक हेतु ॥
तें चित्त हें जाण तूं ॥ तत्प्रवृत्ति तो अहंकारु ॥ १२ ॥

बुद्धीनें ठरविलेला जो निश्चयात्मक अर्थ, त्या अर्थाकडे रोख ठेवून तो घेणारें तें चित्त होय. या चित्ताची जी प्रवृत्ति तोच अहंकार होय. ॥ १२ ॥

ऐशी अंतःकरणपंचकस्फूर्ती ॥ तूं जाणसी स्वयंज्योती ॥
यालागिं स्वसंवेद्य मूर्ति ॥ आत्मा तूंची॥१३॥

अशाप्रकारें अंतःकरणपंचकाचे व्यवहार तुला स्वतःच्या ज्ञानानें समजतात. यासाठीं स्व-संवेद्य—आपणच आपणाला जाणावयास योग्य—असा आत्मा तूंच आहेस. ॥ १३ ॥

**जैसा कापुसापासूनि निघे दोरा ॥ तोचि तया भासे दुसरा ॥**
**तैसें मन बुद्धि चित्त अहंकारा ॥ होणें स्वरूपापासुनी ॥ १४ ॥**

ज्याप्रमाणें कापसापासून उत्पन्न झालेला दोरा कापसाहून अगदीं वेगळा दिसतो, त्याप्रमाणें, तुझ्यापासून होणारे जे मन, बुद्धि, चित्त, अहंकार, ते तुजहून अगदीं भिन्न दिसूं लागतात. ॥ १४ ॥

**तो पीळ नुकालितां दोरा ॥ ह्मणावा परी कापूस खरा ॥**
**उकालितां नुकालितां दुसरा ॥ भासु नाहीं ॥ १५ ॥**

जोंपर्यंत पीळ काढला नाहीं तोंपर्यंत तो दोरा. पीळ काढला कीं तो कापूसच. यासाठीं पीळ असो कीं नको, एका कापसाशिवाय दोऱ्यामध्यें कांहीं नाहीं. ॥ १५ ॥

**नातरी उदकाचा तरंग ॥ तेथें दुसरा नाहीं भाग ॥**
**तो विरलीया चांग ॥ उदक उदकीं ॥ १६ ॥**

किंवा दुसरें उदाहरणः—पाण्यावर तरंग उठतो तो वेगळा भासला, तरी पाणीच तें. तो कांहीं दुसरा पदार्थ नव्हे. तो तरंग नाहींसा झाला कीं पाणीच पाणी होऊन जातें. ॥ १६ ॥

**परी जळावांचोनि कांहीं ॥ आणिक विजातीय नाहीं ॥**
**तैसें मन माघारें आत्मयाचे ठायीं ॥ तंव तें नाहींच होय १७**

मग पाण्यावांचून दुसरा कोणताच पदार्थ बाकी रहात नाहीं.

त्याप्रमाणें मन हें आत्म्याकडे मागें वळलें, कीं तें आत्म्याशीं एकरूप होऊन नाहींसेंच होऊन जातें. ॥ १७ ॥

तो तरंग कां दोरा ॥ उठवी पीळ आणि वारा ॥
तैसा हा लिंगदेहाचा उभारा ॥ कारण माया करी ॥ १८

पाण्याचा तरंग वाऱ्यामुळें भासतो, आणि कापसाचा दोरा पिळामुळें बनतो. त्याप्रमाणें सूक्ष्म देहाची उत्पत्ति मायेपासून होते.॥१८॥

उकलालिया कां भुरालिया ॥ पीळ वारा जाय लया ॥
तैसी आत्मज्ञानें कारण माया ॥ मिथ्या होय ॥ १९ ॥

उलगडल्यामुळें पिळाचा आणि जिरून गेल्यामुळें वायूचा नाश होतो. त्याप्रमाणें आत्मज्ञान झालें म्हणजे सूक्ष्मदेहाच्या उत्पत्तीला कारण अशी जी माया, ती नाहींशी होते. ॥ १९ ॥

तरंग जळ दोरा कापूस ॥ ऐक्य होतां जाय दुजा भास ॥
तैसें होय मन स्वरूपीं समरस ॥ तेथें अज्ञान हारपे ॥ २० ॥

तरंग व उदक व दोरा, व कापूस यांचें ऐक्य झालें असतां मग त्यांच्यामधील भिन्नपणा जसा नाहींसा होतो, त्याप्रमाणें मन आत्मरूपाशीं एकरूप झालें, कीं, अज्ञान नाहींसें होऊन जातें. ॥ २० ॥

असो हे स्फूर्तिकल्पना ॥ बोलिजे लिंगदेह अंतःकरणा ॥
तेथें स्वप्नावस्था जाणा ॥ वासनामय ॥ २१ ॥

सध्यां ही स्फूर्तिसंबंधाची कल्पना राहूं दे. अंतःकरणादि समूहाला लिंगदेह ( सूक्ष्मदेह ) असें म्हणावें. त्या लिंगदेहाची वासनामय अशी स्वप्नावस्था असते. ॥ २१ ॥

**मन प्रवर्ते इंद्रियद्वारें ॥ तें वासना अभ्यंतरीं विवरे ॥**
**तें स्वप्नावस्था मांडे बारे ॥ श्रुत दृष्ट आभास ॥ २२ ॥**

मन इंद्रियांच्या साह्यानें विषयांचा उपभोग घेतें. त्या विषयांच्या वासना त्यामध्यें व्यवहार करीत असतात, त्यावेळीं स्वप्नाच्या स्थितीस प्रारंभ होतो. पूर्वीं जें पाहिलेलें किंवा ऐकिलेलें असतें, त्याचे त्यावेळीं भास होत असतात. ॥ २२ ॥

**तैजस अभिमानी दृश्य ॥ या इताकिया ओळखीस ॥**
**असे अंतःकरणीं चिदाभास ॥ व्यापक तो ॥ २३ ॥**

' तैजस ' या नांवाचा अभिमानी पहाणारा असतो त्याला ही ओळख पटते. चिदाभासरूपी तो तैजस त्यावेळीं अंतःकरण व्यापून राहतो. ॥ २३ ॥

**जैसा आदित्यलोहीं पडे अग्नी ॥ तो नव्हे काय दिनमणी ॥**
**तैसा बिंबला जो अंतःकरणीं ॥ तो स्वयंप्रकाश ॥ २४ ॥**

अग्नीमध्यें तापून लाल झालेल्या लोखंडामध्यें सूर्याचें जें प्रतिबिंब पडतें, तो सूर्यच नव्हे काय ? त्याप्रमाणें जो अंतःकरणांत बिंबला, तो स्वयंप्रकाश आत्माच नव्हे काय ? ॥ २४ ॥

**यांत तुझी एक जाणीव नाहीं ॥ तरी हें इत्यादिक न स्फुरे कांहीं ॥**
**यालागीं चिदाभासें आभास पाही ॥ भासविला ॥ २५ ॥**

तुझ्या ठिकाणीं असणारी जी एक जाणीव ( ज्ञानशक्ति ) ती जर नसेल, तर तुला हें कांहींच समजणार नाहीं. म्हणून सांगतों. हा सर्व भास चिदाभासामुळें भासूं लागतो. ॥ २५ ॥

तुझी एक जाणीव खंडे ॥ तरी कांहीं न पुढें मांडे ॥
तेथें तुवांचि उरिजे अखंडें ॥ स्वस्वरूपें ॥ २६ ॥

हें तुझें एक ज्ञान जर नाहींसें होईल, तर मुळीं पुढें कांहीं उरणार नाहीं. तूं मात्र अगदीं एकटा आत्मस्वरूपानें बाकी रहाशील २६

तूंचि स्फुरशी बोलशी ऐकशी ॥ अंतरींचें अंतर जाणशी ॥
तूंचि पाहे तुजशीं ॥ विचारूनियां ॥ २७ ॥

तूंच जाणतोस, ऐकतोस, बोलतोस, मनाच्या पलीकडचेंही जाणतोस. यासाठीं तूं कोण, हें तुझें तूंच विचार करून पहा. ॥२७॥

जयाचेनि प्रकाशें ॥ अंतःकरण प्रकाशे ॥
जो निजतेजें स्फुरतसे ॥ तें जाण तूंचि ॥ २८ ॥

ज्याच्या ज्ञानामुळें अंतःकरण ज्ञानयुक्त होतें, जो आपल्याच ज्ञानाच्या योगानें आपण ज्ञाता होतो, तोच तूं, हें समजून घे. २८

तेचि जाणीव धरूनि उल्हासें । तरी नसतेंचि दृश्य भासे॥
जैं ते जाणीव निरसे ॥ तैं आत्मा लाभे ॥ २९ ॥

जी ही ज्ञानशक्ति तिचा अभिमान धरिला, कीं कांहीं नसूनही सर्व विषय दिसूं लागतात. म्हणून ज्यावेळीं ही अभिमानयुक्त ज्ञानशक्ति नाहींशी होईल, त्यावेळीं आत्म्याचा लाभ होईल. ॥ २९ ॥

जाणिवेचिये वेळे ॥ जें तियेपुढें आभासलें ॥
तें दृश्य म्हणोनि त्याजिलें ॥ तेथें उरलें तेंचि ॥ ३० ॥

ही ज्ञानशक्ति जेव्हां जागी असते तेव्हां जें जें म्हणून तिच्यापुढें भासेल, तें तें दिसणारें आहे, असें समजून त्याचा त्याग करावा. नंतर जें कांहीं उरेल, तें तूं आहेस. ॥ ३० ॥

**जें जें भासे जाणविये ॥ तें तें जरी निरसूनि जाये ॥**
**तरी जाणीवचि आहे ॥ तोचि पाहे तियेतें ॥ ३१ ॥**

जें जें ज्ञानशक्तीला भासतें, तें तें सर्व जर टाकून दिलें, तर ती पाहील तरी कोणाला? अशी शंका येण्याचें कारण नाहीं. ती ज्ञानशक्ति आपणच आपणास पाहत राहील. ॥ ३१ ॥

**ते जाणीवचि आत्मयाची प्रभा ॥ तो स्वयंभू तियेतें उभा॥**
**दीप आपुलिया शोभा ॥ आपण जैसा ॥ ३२ ॥**

ती ज्ञानशक्ति हा आत्म्याचा प्रकाश आहे. तो आत्मा तर तिच्या पुढें उभा आहे. ज्याप्रमाणें दिवा आपल्या प्रकाशानें शोभिवंत होऊन राहतो, त्याप्रमाणेंच हा प्रकार समजावा. ॥ ३२ ॥

**दृश्य मृगजळ आभासन ॥ तें करूनियां निरसन ॥**
**तूं पाहें बा कवण ॥ आपण ऐसें ॥ ३३ ॥**

**इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते लिंगदेहनिरसनं नाम पंचम प्रकरणं संपूर्णम् ॥ ५ ॥**

जसें कांहीं नसतां तेथें मृगजळ भासतें, त्याप्रमाणेंच हे सर्व विषय भासत असतात. त्यांचा त्याग करून नंतर आपण कोण आहों, हें तूं पहा. ॥ ३३ ॥

---

## प्रकरण साहावें.

**श्रीगुरुभ्यो नमः ॥ नेणें म्हणणी ते नेणीव ॥**

तो मिथ्या भ्रमभाव ॥ रूपासारिखा अवयव ॥
छायेस असे ॥ १ ॥

' मला समजत नाहीं ' असें जें म्हणतोस हें अज्ञान आहे. तो खोटा भ्रम आहे. मूळच्या पदार्थाला जितके अवयव असतात, तितकेच छायेस असतात. ॥ १ ॥

आपआपणिया जाणता ॥ सदैव असे सर्वथा ॥
ना तरी न कळण्याची अवस्था ॥ कवण सांगे ॥ २ ॥

आपण आपणांस नेहमीं जाणतच असतो. नाहींतर आपणास कळत नाहीं, असें जें समजतें तें कोणी दुसरा येऊन सांगतो कीं काय? ॥ २ ॥

आपआपणा जाणतो निकें ॥ तेथें नेणीव आड ठाके ॥
तरी इयेचें पारखें ॥ पण कवण सांगे ॥ ३ ॥

वास्तविक सर्व जीव आपण आपणास जाणतच आहेत. पण मध्यें थोडेंसें अज्ञान आडवें येतें. असें जर आहे, तर या अज्ञानाचा हा परकेपणा आपणास समजावा कसा? ॥ ३ ॥

नकळे ऐसें जाणवलें ॥ तें न कळण्यासी नाहीं कळलें ॥
म्हणोनि नेणणें जया विवळे ॥ तोचि जाण आत्मा ॥ ४ ॥

' हें मला कळत नाहीं, ' असें जें कळतें, तें कांहीं आपल्या ठिकाणच्या न कळण्यास समजत नाहीं ( आपल्या ज्ञानास समजतें ) म्हणून हें अज्ञान ज्याला समजतें, तोच आत्मा असें समज. ॥ ४ ॥

आपुलिया जाणिवा । धरिशी नेणीवभावा ॥
याकारणें गोंवा ॥ पडे जयाचा तयासी ॥ ५ ॥

आपल्या ठिकाणीं असणाऱ्या ज्ञानालाच जीव अज्ञान असें ह्मण-तात. यामुळें त्यांना आपलें खरें स्वरूप ध्यानांत येण्यास मोठा घो-टाळा पडतो. ॥ ५ ॥

आपआपलिया नकळे हे नेणीव ॥
ऐसें ह्मणावें तरी तोचि जाणीवभाव ॥
ह्मणोनिया नेणीव ॥ मिथ्या भ्रांती ॥ ६ ॥

बरें आपण कोण हें आपणाला कळत नाहीं, असें जें आपण म्हणतों तेंच अज्ञान; पण असें जर ह्मटलें, तर त्याला ज्ञान असें म्हणावें लागतें. यासाठीं अज्ञान हा खोटा भ्रम आहे, असें आम्हीं ह्मटलें आहे. ॥ ६ ॥

नेणीव जरी जाणितली ॥ तरी ते नेणीव मिथ्या झाली ॥
तेथील जाणीव उरली ॥ आत्मप्रभा ॥ ७ ॥

जें अज्ञान, त्याचें जर ज्ञान झालें, तर तें अज्ञान नव्हे, असेंच ह्मणावयाचें. कारण, मग अज्ञान खोटें ठरून केवळ आत्म्याचा प्रकाश असें जें ज्ञान तेंच कायतें बाकी उरतें. ॥ ७ ॥

तूंचि आपणां नेणसी ॥ ऐसें तूंचि जाणसी ॥
तरी नेणिवे कां गुंतसी ॥ नाथिलाची ॥ ८ ॥

मी आपणाला जाणत नाहीं, असें जर तुला समजतें, तर तूं विनाकारण त्या अज्ञानामध्यें कां गुंतून पडतोस ? ॥ ८ ॥

तूं आत्मा स्वयंप्रकाश ॥ तेथें नेणीव मिथ्या आभास ॥
तो निरसतां तूं अविनाश ॥ स्वतःसिद्ध ॥ ९ ॥

तूं स्वतः स्वयंप्रकाश असा आत्मा आहेस. तुला, मी अज्ञान

आहे, असा जो भास होतो, तो निव्वळ भ्रम आहे. तो भ्रम घाल-वून टाकिला, म्हणजे ज्याचा कधींही नाश होत नाहीं, अशा प्रका-रचा जो आत्मा, तो तूं आपणच आहेस. ॥ ९ ॥

या सर्वांसी जो जाणे ॥ तो काय आपणातें नेणे ॥
नेणिवेस तरी कळणें ॥ असेचिना ॥ १० ॥

तर, अशा रीतीनें सर्व प्रकारचें ज्याला ज्ञान असतें, तो काय आपणालाच जाणणार नाहीं? कारण जें अज्ञान, त्याच्या ठिकाणीं ज्ञानाची शक्ति असणें संभवनीय नाहीं. ॥ १० ॥

ऐशी नेणीव तेंचि कारण ॥ कार्य स्थूळ सूक्ष्म जाण ॥
तिये कारण सुषुप्तीचें लक्षण ॥ ऐक आतां ॥ ११ ॥

याप्रमाणें जिचें वर्णन केलें आहे, ती नेणीव म्हणजे अज्ञान, हाच कारण देह होय. स्थूल देह, आणि सूक्ष्म देह हीं त्या कारणा-चीं कार्यें आहेत. या देहाची सुषुप्ति ही अवस्था आहे, म्हणून आतां सुषुप्तीचें लक्षण सांगतों, तें ऐक. ॥ ११ ॥

मन [illegible] ॥ बाह्य विषयीं व्यवहारे ॥
[illegible] प्रवर्ते इंद्रि[illegible] स्पष्ट ॥ १२ ॥
तें जागृती हें खरें ॥ जाणिज [illegible] भव घेत असे[illegible]

मन हें इंद्रियांसह बाहेरील विषयांचा अनु[illegible] हें तर त्या अवस्थेस जागृति–जागेपणा–असें म्हणतात, [illegible] अनुभवाला येतें. ॥ १२ ॥

तो आभास घेऊनि अंतरीं ॥ मन सूक्ष्म कल्पना क[illegible]
तेधवां स्वप्नावस्था बरी ॥ मांडे तेथें ॥ १३ ॥

जागेपणामध्यें जे व्यवहार घडतात, त्यांची कल्पना धरून मन

सूक्ष्मरूपानें सर्व विषयांचा उपभोग घेत असतें, तेव्हां स्वप्न पडा- वयास प्रारंभ होतो. ॥ १३ ॥

परी जाणीव दोहींची एक ॥ ते आपणिया करी निःशेख।
तेव्हां सुषुप्ती अवस्था देख ॥ अज्ञान गडद ॥ १४ ॥

पण या दोन्ही अवस्थेंत मनाचे व्यापार एकच तऱ्हेचे चालले असतात. ते आपोआप जेव्हां बंद होतात, तेव्हां झोंप लागते. त्या- वेळीं सर्व प्रकारच्या व्यवहारासंबंधानें अगदीं अज्ञान असतें. ॥१४॥

ते नेणीवचि आहे जाणीव ॥ परी धरिला विपरीत भाव ॥
आप आपणा नाठव ॥ अज्ञानवशें ॥ १५ ॥

तें तरी एकप्रकारचें ज्ञानच आहे. पण तें आपल्या उलट्या क- ल्पनेमुळें अज्ञान आहे असें वाटतें. केवळ त्या अज्ञानामध्यें आपण गुरफटून गेल्यामुळें आपणास विसर पडतो. ॥ १५ ॥

आप आपणा विसरलीं ॥
मग प्रपंचाचा आभास कल्पूं लागलीं ॥
मी जीव हीच भुली ॥ सुषुप्तीसि १६ ॥

तूंचि तावस्थेंत जीव आपणांस विसरून जातात. स्वप्न- तरी प्रपंचाचा भासरूपानें अनुभव घेतात. आणि निद्रेमध्यें मी आपणांस ' मी जीव ' ही सुद्धां भुरळ पडलेली असते. १६

बिनाकार व जें फिटे ॥ तें स्वयंभ स्वरूप उमटे ॥
स किडाळ जळालिया पुटें ॥ शुद्ध राहे ॥ १७ ॥

ज्यावेळीं तें अज्ञान नाहींसें होतें, त्यावेळीं आपल्या शुद्ध स्वरू-

पाचें ज्ञान होतें. ज्याप्रमाणें हिणकस सोन्याला पुटें देऊन विस्तवां‑त घातलें असतां त्याचा हिणकस भाग जाऊन शुद्ध सोनें राहतें त्याप्रमाणें ॥ १७ ॥

नेणिवे पासाव उगवता ॥ अभिमान होय धरिता ॥
तो प्राज्ञ हे व्यवस्था ॥ कारणदेहाची ॥ १८ ॥
इति श्री परमामृते मुकुंदराजविरचिते कारणदेहनिरसनं नाम षष्ठं प्रकरणं संपूर्णम् ॥

या अज्ञानापासून उत्पन्न होणारा, आणि अज्ञानाचा अभिमान धरणारा तो प्राज्ञ होय. हा कारणदेहाचा अभिमानी आहे. ही कारणदेहाची व्यवस्था झाली. ॥ १८ ॥

---

## प्रकरण सातवें.

हा अवघा दृश्याकार ॥ भासे जाणिवे समोर ॥
तो निरसूनि तूंचि उर ॥ ज्ञानस्वरूप ॥ १ ॥

जें जें म्हणून आकारानें युक्त किंवा दिसणारें आहे, अथवा जाणतां येणारें आहे, तें तें आपलें स्वरूप नव्हे, असें समजून तूं त्याचा त्याग कर. आणि मग जें बाकी राहील, तेंच आत्मस्वरूप असें समजून तूं आनंदानें राहा. ॥ १ ॥

नेणिवेच्या नेणीवभावा ॥ तूंचि जाणसी स्वयमेवा ॥
ते जाणीव धरूनि आपलिया खेवा ॥ आपण रिगावें ॥२॥

अज्ञानाच्या ठिकाणीं असणारा जो अज्ञानपणा हा धर्म, त्या

धर्माला तूं जाणतोस. तें ज्ञान होय. हें ज्ञान अगदीं घट्ट जिवाशीं धरून, त्यांतच गढून जावें. ॥ २ ॥

**आप आपणासि जाणतां ॥ नेणीव आहे कीं आतां ॥**
**स्वयेंचि होऊनि ज्ञाता ॥ निरशी नेणीव ॥ ३ ॥**

आपण आपणास जाणूं लागल्यावर मग नेणीव उरेल कोठें? यासाठीं तूं स्वतः ज्ञानी होऊन अज्ञानाचा नाश कर. ॥ ३ ॥

**नेणीव जेथें निरसली ॥ तेथें जाणीव राहिली ॥**
**ते निजदृष्टि बोलिली ॥ आत्मरूप ॥ ४ ॥**

ज्या ठिकाणचें अज्ञान नाहींसें झालें, तेथें फक्त एक ज्ञान मात्र कायतें बाकी राहील. तिलाच आत्मदृष्टि असें ह्मणावें आणि तिनें आपलें रूप पहावें. ॥ ४ ॥

**जो आपलिया जाणिवा ॥ जाणे प्रपंचा सर्वा ॥**
**तया आपणा जाणावया गोंवा ॥ पडे नेणिवेचा ॥ ५ ॥**

जो जीव आपल्या ज्ञानशक्तीनें सर्व प्रपंच जाणतो, त्याला आपलें स्वतःचें स्वरूप जाणावयास मध्यें अज्ञान आड येतें. ॥ ५ ॥

**ते नेणीव फिटे गुरुखुणा ॥ जाणे आपण आपणा ॥**
**बोलिजे या अनुसंधाना ॥ महाकारण ऐसें ॥ ६ ॥**

हें अज्ञान श्रीगुरूनें सांगितलेल्या उपदेशाच्या अनुभवावरून नाहींसें होतें आणि जीव आपण आपणास ओळखूं लागतो. अशा प्रकारच्या या अवस्थेस महाकारण देह, असें ह्मणतात. ॥ ६ ॥

**फिटोनियां नेणणें ॥ आप आपणा जाणणें ॥**
**तिही देहाचेनि साक्षीपणें ॥ महाकारण देह ॥ ७ ॥**

अज्ञान नाहींसें होऊन आपलें आपणांस होणें, आणि तिन्ही देहांहून भिन्न होऊन त्यांना तिन्हाईतपणें पहाणें, अशाप्रकारच्या देहास महाकारण देह असें ह्मणतात. ॥ ७ ॥

**तिहीं अवस्थांचें जाणपण॥तियेशीं तुर्या अवस्था ऐशी ह्मण॥**
**तिही देहांचें अवलोकन ॥ तें महाकारण देह ॥ ८ ॥**

तिन्ही देहांचें ज्ञान होतें अशी जी अवस्था, तिला तुर्यावस्था असें ह्मणतात. तिन्ही देहांला पाहाणारा जो देह, त्या देहाला महाकारण असें ह्मणतात. ॥ ८ ॥

**मी सर्वसाक्षी आपण ॥ हा प्रत्यगात्म्याचा अभिमान ॥**
**सर्वांचें जेथें खुंटलें स्फुरण ॥ तें शुद्धस्वरूप ॥ ९ ॥**

मी स्वतः पाहणारा आहे अशाप्रकारचा जो अभिमान तो प्रत्यगात्म्याचा आहे. ज्या ठिकाणीं सर्व अभिमान्यांची ज्ञानशक्ति कुंठित होते, तें शुद्ध ब्रह्म समजावें ॥ ९ ॥

**कार्यकारणाचें कारण ॥ यालागीं बोलिजे महाकारण ॥**
**कार्यकारण झालिया शून्य ॥ महाकारण कवण ह्मणे ? १०**

स्थूल सूक्ष्म देह हीं कार्यें, आणि कारण देह यांचेंही हा कारण आहे, ह्मणून याला महाकारण असें ह्मणतात. ज्या वेळीं कार्य व कारण यांचा नाश होईल, तेव्हां महाकारण ह्मणून कांहीं तरी असण्याची काय गरज आहे ? ॥ १० ॥

**आहे स्वयंभ आपण ॥ जाणे आपली आपण ह्मण ॥**
**परब्रह्म निर्वाण ॥ निजस्वरूप ॥ ११ ॥**

या सर्व देहांपलीकडचें जें आत्मस्वरूप, परब्रह्म, मोक्ष, तें उत्पत्ति

नाश इत्यादि दोषांपासून अलिप्त आहे; आणि तें आपणच आपणाला जाणणारें ( स्वसंवेद्य ) असें आहे. ॥ ११ ॥

**ऐसें आपुलें अनुसंधान ॥ करितां होय विज्ञान ॥**
**प्रपंचाचें मिथ्यापण ॥ प्रत्यया ये ॥ १२ ॥**

अशाप्रकारें आपण आपला विचार करूं लागलें म्हणजे, आपणास पूर्ण ज्ञान होतें, आणि प्रपंच मिथ्या आहे, असा आपणाला अनुभव येतो. ॥ १२ ॥

**मी शुद्धात्मा आपण ॥ ऐसा वर्ते जो अभिमान ॥**
**तयाचाही साक्षी कवण ॥ तुजवांचोनि ॥ १३ ॥**

मी शुद्ध आत्मा आहें, असा जो अभिमान भासतो त्याचा तरी साक्षी तुझ्यावांचून दुसरा कोण आहे? ॥ १३ ॥

**म्हणोनि जाणिवेचें निजज्ञान ॥ तें शुद्ध स्वरूप आपण ॥**
**सर्वनिरासीं परिपूर्ण ॥ निजात्मा तूं ॥ १४ ॥**

यासाठीं जें ज्ञानाचेंही ज्ञान–विज्ञान, तेंच आपलें शुद्ध स्वरूप होय. या सर्व अभिमानाचा नाश केलास म्हणजे मात्र तूं आत्मरूप होशील खरा. ॥ १४ ॥

**ज्ञान जेथूनि स्फुरावें ॥ तें आपणचि स्वभावें ॥**
**ऐसें स्वरूप अनुभवावें ॥ जाण पैंगा ॥ १५ ॥**

जेथून ज्ञानाची उत्पत्ति होते तेंच आपलें खरें स्वरूप आहे, असा आपण अनुभव घ्यावा हें तूं पक्कें लक्षांत ठेव. ॥ १५ ॥

**जेथें जाणीव खुंटे ॥ तें तुझें स्वरूप नेटेंबोटें ॥**
**घनानंद चढे ना वोहटे ॥ अपरिमित ॥ १६ ॥**

ज्या ठिकाणीं ज्ञानाची मजल खुंटते तेंच तुझें स्वरूप आहे, असें निःसंशय ध्यानांत ठेव. त्या ठिकाणीं केवळ आनंद आहे; तो कधीं कमी किंवा अधिक होत नाहीं. ॥ १६ ॥

**जें अमर्याद अमूप ॥ तें जाणिजे आपेआप ॥**
**अविनाश स्वरूप ॥ अखंडित ॥ १७ ॥**
**इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते महाकारणदेहनिरसनं नाम सप्तमं प्रकरणं संपूर्णम् ॥ ७ ॥ ॥ ॥ ॥**

जें अमर्याद आहे, ज्याचें माप घेतां येत नाहीं, ज्याचा भाग करितां येत नाहीं, ज्याचा विनाश कधींही व्हावयाचा नाहीं, अशा-प्रकारचें जें आत्मस्वरूप आहे, तें त्या ज्ञानस्वरूपानेंच जाणलें जा-णारें आहे. ( त्या स्थितीचा लाभ झाल्याखेरीज तें समजावयाचें नाहीं, किंवा सांगतांही यावयाचें नाहीं. ) ॥ १७ ॥

---

## प्रकरण आठवें.



( सर्व जगाच्या उत्पत्तीचें कारण. )

**श्री गुरुभ्यो नमः ॥ जरी तें शून्य भाविजे ॥**
**तरी कल्पूनि नांव ठेविजे ॥ जें आपण आपणा सुजे ॥**
**तें शून्य कीजे ॥ १ ॥**

बरें जर हें शून्य आहे अशी कल्पना केली, तर तेंही योग्य नाहीं. कारण प्रथम त्याची कल्पना करावयाची, नंतर त्याला नांवही

द्यावयाचें; व अशाप्रकारें जें आपणास जाणतां येतें, त्याला शून्य असें ह्मणावयाचें, हें युक्तीला अनुसरून नाहीं. ॥ १ ॥

**जो सर्व शून्यातें जाणे ॥ तया शून्य ऐसें कवण ह्मणे ॥**
**जें कांहीं नाहीं तेणें ॥ आपण केवीं जाणिजे ॥ २ ॥**

जो सर्वत्र शून्य आहे, असें जाणतो, तो कोण ? तो शून्या-वेगळा असें जर ह्मटलें तर सर्व शून्य आहे, असें कोण ह्मणेल ? जें शून्यापासून झालें तें शून्यच असणार. मग शून्यानें शून्य कसें जाणावयाचें ? ॥ २ ॥

**जया स्वरूपीं नुरे दृश्य ॥ दृश्यासि द्रष्टृत्व अदृश्य ॥**
**जयाचें तयासीच प्रकाश ॥ स्वस्वरूप सदा ॥ ३ ॥**

ह्मणून त्या आत्म्याच्या ठायीं दृश्य असें कांहींच असत नाहीं, तसेंच जें दृश्य त्याचे ठिकाणीं द्रष्टेपणा असत नाहीं, यासाठीं तें आत्मस्वरूप केवळ आपलें आपणच एकत्र भरलेलें आहे. ॥ ३ ॥

**सर्वही निरसूनि जाणीव ॥ उरलें सांडून नेणीव ॥**
**तया ज्ञाना जाणावया भाव ॥ न स्फुरे कांहीं ॥ ४ ॥**

जें सर्व अज्ञानाचा नाश करून ज्ञानाच्याही पलीकडे गेलें, त्याला जाणावयास समर्थ असें दुसरें कोणतेंही ज्ञान असणें शक्य नाहीं. आहे असें ह्मटलें, तर अनवस्था होईल. ॥ ४ ॥

**ह्मणोनि अभाव ऐसा भासे ॥ परि शून्य ह्मणावें कैसें ॥**
**जें सर्वांसि जाणोनि असे ॥ शून्यासमवेत ॥ ५ ॥**

यासाठीं आत्मस्वरूप हें अभावरूप आहे, असा भास होतो खरा,

पण त्याला शून्य असें कसें ह्मणतां येईल; कारण तें शून्य सुद्धां सर्व वस्तूंस जाणून राहणारें आहे. ॥ ५ ॥

**शून्यातें शून्यपण ॥ जाणीव कल्पी आपण ॥**
**ते स्वरूपीं होय लीन ॥ शून्यासहित ॥ ६ ॥**

शून्य हें शून्यच आहे, हें तरी जाणिवेलाच समजतें. पण ती जाणीव देखील शून्यासह आपणामध्यें लीन होते. ॥ ६ ॥

**तें शून्य ना जाणीव ॥ दृश्य ना नेणीव ॥**
**ज्ञप्तिमात्र भरीव ॥ स्वस्वरूप ॥ ७ ॥**

तें शून्य नाहीं, जाणिव नाहीं, दृश्य नाहीं, अज्ञान नाहीं, तर केवळ ज्ञप्तिमात्र असें तें आत्मरूप आहे. ॥ ७

**जें निरंतर निर्मळ ॥ ज्ञानघन केवळ ॥**
**चिदाकाश अखिल ॥ अगोचर ॥ ८ ॥**

यासाठीं तें आत्मस्वरूप खंडरहित, निर्मळ, ज्ञानमय, एक, चिदाकाश, संपूर्ण इंद्रियांस न समजणारें असें आहे, हें सिद्ध होतें.॥८॥

**जेथें शून्य दृश्याकार ॥ अज्ञान निरसुनि आनिवार ॥**
**जें सूक्ष्माहूनि सूक्ष्म सपुर ॥ निज ज्ञान ॥ ९ ॥**

ज्याला शून्यही दिसतें असें जें गाढ अशा अज्ञानाचाही नाश करतें, जें सूक्ष्माहूनही सूक्ष्म, तेंच आत्मज्ञान होय. ॥ ९ ॥

**जें निष्कळंक ज्ञानाकाश ॥ करी शून्याकाशाचा ग्रास ॥**
**तो निजद्रष्टा स्वयंप्रकाश ॥ परमात्मा तूं ॥ १० ॥**

अत्यंत शुद्ध असें जें ज्ञानरूपी आकाश, तें शून्य कशालाही

खाऊन टाकतें. म्हणून ज्ञानस्वरूप असा जो तूं तो स्वयंप्रकाश, सर्व पाहणारा असा परमात्माच आहेस. ॥ १० ॥

**तो तूं निरालंब साक्षी ॥ निर्लेपक सर्वपक्षीं ॥**
**पारावाररहित निरीक्षी ॥ देखणा तूं होउनी ॥ ११ ॥**

तुला कांहीं आधार नाहीं, तूं सर्व पाहणारा आहेस; तूं मलरहित आहेस; तुझा अंत लागत नाहीं; असें जें तुझें स्वरूप तें पाहणारा होऊन तूंच पहा. ॥ ११ ॥

**जें ज्ञानाचें जिव्हार ॥ आस्तिक्याचें घर ॥**
**सुखाचें सागर ॥ घनानंद तूं ॥ १२ ॥**

ज्ञानाचें गुह्य, श्रद्धा ठेवण्याचें स्थान, सुखाचा समुद्र, असा तूंच आनंदरूप आहेस. ॥ १२ ॥

**जें सर्वसाक्षीचें दीपन ॥ जें प्रकाशाचें कोंदण ॥**
**जें आत्मानंदाचें निधान ॥ तें कैवल्य तूं ॥ १३ ॥**

सर्वसाक्षी असणाऱ्या आत्म्याचा आभास, प्रकाशाचें मूळस्थान, निजानंदाचा ठेवा, असा जो मोक्ष तो तूंच आहेस. ॥ १३ ॥

**जें सकळनिरासें शुद्धबुद्ध ॥ जेथें नुरे त्वंपद ॥**
**सरे तत्पद शुद्ध ॥ असि पदेंसी ॥ १४ ॥**

सर्व प्रपंचाचा कलंक गेल्यामुळें जें शुद्ध आहे, ज्ञानरूप आहे, जेथें जीवपणाचा आभास राहिला नाहीं, ईश्वरत्वही नाहींसें झालें, ॥ १४ ॥

**ऐसा तूं परमात्मा ॥ परी तुझा त्वां हारविला महिमा ॥**
**आतां मिळनि राहिजे निजधामा ॥ कैसिया परी ॥ १५ ॥**

असा परमात्मा तूंच आहेस. पण तुझा मोठेपणा तूं हरवून बसला

आहेस. आतां पुनः तूं आपल्या मूळच्या जागेवर कशाप्रकारें जाशील, ॥ १५ ॥

**तो लक्षांश अनुवादणें ॥ परिसावा शुद्ध अंतःकरणें ॥**
**नित्य जैसें अभ्यासणें ॥ तैसें सांगूं ॥ १६ ॥**

तो तात्पर्यार्थ सांगतों. तो शुद्ध अंतःकरणानें ऐकून ध्यावा; आणि त्याचा रोज अभ्यास करावा. अशा प्रकारचेंच हें आमचें सांगणें आहे. ॥ १६ ॥

**जेणें स्वरूपीं निश्चय बैसे ॥ शुद्ध परमात्मा प्रकाशे ॥**
**सदा चित्त रमोनि समरसे ॥ कैवल्यामाजीं ॥ १७ ॥**
**इति श्री परमामृते मु० शून्यखंडनं नाम ८ प्र० सं०**

असें केलें असतां आत्मस्वरूपाचा निश्चय ठसेल, शुद्ध परमात्माच जिकडे तिकडे भासूं लागेल. आणि मन नेहमीं मोक्षसुखामध्यें बुडून जाईल. ॥ १७ ॥

---

## प्रकरण नववें.

### निदिध्यासन.

**तरी हें सांगितल्यापरी ॥ नें स्वरूप निर्धारीं ॥**
**मग ऐसाच अभ्यास करी ॥ नित्य नेमेंसी ॥ १ ॥**

यासाठीं, येथें सांगितल्याप्रमाणें त्या आत्मस्वरूपाचा निश्चय कर, आणि नेहमीं नियमानें आत्मस्वरूपाचाच अभ्यास कर. ॥ १ ॥

**पाहिजे एकांतस्थान ॥ जेथें चंचळ न होय मन ॥**
**सकळ वृत्तींतें आवरून ॥ बैसावें तेथें ॥ २ ॥**

प्रथम एकांतस्थान पहावें; जेथें मन चंचळ होणार नाहीं अशा ठिकाणीं मनाचा सर्व चंचळपणा आवरून स्वस्थ बसावें. २॥

**करूनि विषयाची निवृत्ति ॥ चित्तासि प्रत्यागवृत्ति ॥**
**धरी दृश्यमात्रीं विरक्ती ॥ त्यागबुद्धी ॥ ३ ॥**

सर्व विषयांचा त्याग करून मन विषयांपासून मागें फिरवावें. जेवढे ह्मणून दिसणारे पदार्थ आहेत, त्यांबद्दल त्यागबुद्धि धारण करावी. त्यांवर प्रीति करूं नये. ॥ ३ ॥

**बैसोनी आसनीं सावकाशें ॥ अंतरामाजीं प्रवेशे ॥**
**एकवटीं इंद्रियद्वारीं बैस ॥ मनोवृत्ति जे ॥ ४ ॥**

स्वस्थपणें आसनावर बसावें. आणि मन जें इंद्रियांकडे वेधलेलें असतें तें तेथून मागें वळवून अंतर्मुख करावें. ॥ ४ ॥

**सांडूनि अभिमान स्थूळाचा ॥ भाव धरी अंतराचा ॥**
**अभाव करूनि सर्वांचा ॥ गगन पाही ॥ ५ ॥**

स्थूल देहावर असणारा अभिमान सोडून द्यावा. आणि त्याच्या पलीकडे जे सूक्ष्म, कारण, महाकारण हे देह आहेत, त्यांबद्दलही पूर्वीं सांगितल्याप्रमाणें विचार करून त्यांच्याही ठिकाणचा अभिमान टाकावा, आणि जिकडे तिकडे आकाशच भरलेलें आहे, असें पहावें. ॥ ५ ॥

**स्थूळ इंद्रियांमधून ॥ युक्तीनें एकवटी मन ॥**
**अंतराकाशीं नेऊन ॥ स्थिर करी ॥ ६ ॥**

अशाप्रकारें इंद्रियांपासून मन मागें फिरवून मोठ्या युक्तीनें त्याला अंतराकाशामध्यें नेऊन स्थिर करावें. ॥ ६ ॥

**जे जे वृत्ति बाहेर धांवे ॥ तियेतें परतोनि आणावें ॥**
**येणें अभ्यासें स्थिरावें ॥ आपेंआप ॥ ७ ॥**

मनाला जो विषय हवासा वाटेल, तो त्याला न देतां त्याला मागें फिरवावें. अशाप्रकारचा अभ्यास केला, म्हणजे मन आपो-आप स्थिर होतें. ॥ ७ ॥

**नातरी जिकडे मनाची राहाटी॥न लागावें तयाचे पाठीं॥**
**माघारी घालोनियां दृष्टी ॥ स्वस्वरूपेंसी ठेविजे ॥ ८ ॥**

मन जिकडे धांवूं लागेल त्या विषयामागें लागूं देऊं नये. त्याला मागें फिरवून आत्मस्वरूपाकडे आणून ठेवावें. ॥ ८ ॥

**मन जो जो विषय धरी ॥ तो तो विवेकें विदारी ॥**
**तरी तें स्थिरावे अंतरीं ॥ सांडूनि कल्पना ॥ ९ ॥**

मन ज्या ज्या विषयाची आवड धरील, त्या त्या विषयाचा विचार करून तो विषय वाईट आहे, असें ठरवून त्या विषयाचे तुकडे तुकडे करून टाकावे. असें केलें म्हणजे तें कल्पना टाकून देऊन स्थिर होईल. ॥ ९ ॥

**तेथें हृदयाकाशीं ॥ मीपण स्फुरे जीवासी ॥**
**तेंचि विवेकेंसी ॥ पाहिजे जंव ॥ १० ॥**

याप्रमाणें मन विषयांपासून मागें वळविलें कीं तें जीवाचा अभिमान धरून तेथेंच गढून जाऊं लागेल. पण पुनः विचार करून पाहूं लागल्यास, ॥ १० ॥

**तंव तें निरालंबीं स्फुरे ॥ पुनरपि तेथेंचि मुरे ॥**
**तरी जीवदशा बारे ॥ नास्तिक्य पावे ॥ ११ ॥**

त्याला आत्मस्वरूपाचें ज्ञान होईल, आणि तें आत्म्यामध्यें एकरूप होऊन जाईल. असें झालें, म्हणजे बाबारे, त्याच्या ठिकाणचा जीवाचा अभिमान आपोआप नाहींसा होईल. ॥ ११ ॥

**नदी उगमीं स्थिरावे ॥ तरी सिंधूपण कां न पावे ॥**
**तैसें जीवाचें ब्रह्म कां न व्हावें ॥ या स्थिति राहतां १२**

नदीचा प्रवाह जर उगमापाशींच संथपणानें वाहूं लागला, तर तिला शेवटीं समुद्रपणा प्राप्त होण्यास उशीर कां लागेल? त्याप्रमाणें जर अशाप्रकारें मन स्थिर झालें, तर जीवाला ब्रह्म कां होतां येणार नाहीं! ॥ १२ ॥

**म्हणूनि परतावें अभ्यंतरीं॥अभ्यास करावा ऐशिया परी॥**
**मग कल्पना अभ्यंतरीं ॥ समरसोनि जाय ॥ १३ ॥**

म्हणून मनाला विचाराकडे वळवावें आणि अशाप्रकारें अभ्यास करावा. मग मनाच्या सर्व कल्पना आत्मस्वरूपाशीं एकवटून जातील. ॥ १३ ॥

**सोडून स्थूळ गती ॥ ऐसी राहे अंतरस्थिति ॥**
**तोंवरी अभ्यास निगुती ॥ करावाचि लागे ॥ १४ ॥**

जोंपर्यंत मनानें स्थूल विषयांची गोडी सोडून तें अंतर्मुख झालें नाहीं, तोंपर्यंत असा अभ्यास केलाच पाहिजे. ॥ १४ ॥

**तेथें जें जें दृश्य स्फुरे ॥ तें तें सोडून होई माघारें ॥**
**ज्ञानस्वरूप निर्धारें ॥ आपण होइजे ॥ १५ ॥**

जो जो पदार्थ समोर दिसेल, तो तो मिथ्या आहे, असें समजून तेथून मागें परतावें. म्हणजे मग तें मन निश्चयानें ज्ञानस्वरूप होईल. ॥ १५ ॥

**देखणेंचि देखण्यावरी ॥ परतोनि राहे जरी ॥**
**तरी दृश्याकार उरी ॥ कैसेनि होय ॥ १६ ॥**

जो पहाणारा तो जर आपणासच पहात राहील, तर मग त्याला इतर पदार्थ दिसतील तरी कसे ? ॥ १६ ॥

**साकारादि आघवें ॥ शून्य होय स्वभावें ॥**
**तेथें आपण पाहावें ॥ आत्मस्वरूप ॥ १७ ॥**

ज्याला म्हणून कांहीं तरी आकार आहे, तें तें सर्व मिथ्या आहे असें एकदां सिद्ध झाल्यावर मग त्याच्याकडे पहावयासच नको. मग आपणच आपणास पहात राहावयाचें. ॥ १७ ॥

**जैसें वाढलिया नीर ॥ नुरे कांहीं आकार ॥**
**अंतःकरणादि व्यवहार ॥ तैसा होय ॥ १८ ॥**

ज्याप्रमाणें पाणी अपरंपार वाढलें, म्हणजे त्यामध्यें सर्व पदार्थ बुडून दिसेनासे होतात, त्याप्रमाणें एक ब्रह्मच सर्वच भरलेलें आहे, असें ज्ञान झालें कीं मनाचे सर्व व्यापार आपोआपच त्यामध्यें बुडून जातात. ॥ १८ ॥

**जैसें कूर्में आकुंचन केलें ॥ कर चरण शिर अंतरीं नेलें ॥**
**मग आपणिया आपण उरलें ॥ अखंडित ॥ १९ ॥**

किंवा ज्याप्रमाणें कांसवानें आपले हात, पाय व डोकें आवरून

आंत ओढले ह्मणजे तें जसें आपणच आपणांत गुप्त होतें, त्याप्रमाणेंच मनाची स्थिति होते. ॥ १९ ॥

जाणावें याचि परी ॥ प्रवेशतां अंतरीं ॥
तेथें एकलीच उरे उरी ॥ आपणियाची ॥ २० ॥

याचप्रकारचा विचार करून ज्ञान करून घ्यावें. एकदां मनानें आंत प्रवेश केला, कीं मग तेथें तें मनही नाहींसें होऊन केवळ आत्मस्वरूप मात्र बाकी राहातें. ॥ २० ॥

आपण एकीं एकला ॥ दुजा नाहीं देखिला ॥
ज्ञानमात्र संचला ॥ आत्माराम ॥ २१ ॥

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते अभ्यासयोगे निदिध्यासनं नाम नवमं प्रकरणं संपूर्ण ॥

तात्पर्यार्थ असा, कीं आपण केवळ ज्ञानस्वरूपानें जिकडे तिकडे भरून आपल्याच आनंदांत गढून राहिलों आहों. अशाप्रकारचा जो सतत विचार त्याला निदिध्यासन ह्मणावें ॥ २१ ॥

---

## प्रकरण दहावें.

### दृश्य–भास खडंन.

ऐसा उमज न होतां ॥ अज्ञान गडदामाजीं पडतां ॥
न कळे ह्मणोनि भ्रमतां ॥ वेड लागे ॥ १ ॥

अशा प्रकारचें ज्ञान न होतां, जो कोणी अज्ञानामध्यें गुरफटून

गेलेला असतो, त्याला आत्मस्वरूप कळत नाहीं व उलट वेड्याप्रमाणें त्याची अवस्था होते. ॥ १ ॥

**तो भ्रम आपणचि वाहे ॥ नाथिलें अज्ञान धरूनि राहे॥**
**वायां संदेहीं पाहे ॥ न कळे ह्मणोनि ॥ २ ॥**

अशाप्रकारचा जीव सदोदित भ्रमिष्ट झालेला असतो. कारण आपण अज्ञानी आहों असें त्याला उगीच वाटत असतें. आणि आपणास कांहीं कळत नाहीं, ह्मणून तो उगीच संशयांत मात्र पडलेला असतो ॥ २ ॥

**उजेडींचा घरांत आला ॥ तंव दृष्टी आंधार भरला ॥**
**डोळे असतां अदेखणा झाला ॥ आपणासि तो ॥ ३ ॥**

ज्याप्रमाणें एकादा मनुष्य बाहेरच्या लख्ख उजेडांतून घरांत आला ह्मणजे तेथील अंधार त्याच्या डोळ्यांत भरतो, आणि त्याला डोळे असूनही कांहीं दिसत नाहीं असें होतें, त्यांतलाच हा प्रकार आहे. ॥ ३ ॥

**कां निशीचिया दोन प्रहरीं ॥ डोळयां गडद पडे भारी ॥**
**तैसा अज्ञान आंधारीं ॥ गुंतों नको ॥ ४ ॥**

यासाठीं भर मध्यरात्रीं ज्याप्रमाणें डोळ्यांपुढें गडद काळोखच भासत असतो, त्याप्रमाणें या अज्ञानाचा अंधकार तुला दिसतो खरा, पण त्यांत तूं गुरफटूं नको. ॥ ४ ॥

**तेथें मनासि जें जें कल्पणें ॥ तें तें सन्मुख देखणें ॥**
**दृश्या निरसोनि राहणें ॥ स्वस्वरूपीं निश्चलत्वें ॥ ५ ॥**

अज्ञानाच्या अवस्थेंत ज्या ज्या कल्पना मनांत येतात, ते ते

पदार्थ डोळ्यांपुढें दिसूं लागतात. ह्मणून अज्ञानामुळें भासणारें जें हें सर्व दृश्य तें तें सर्व मिथ्या आहे असें समज आणि आत्मरूपीं निश्चळ होऊन रहा. ॥ ५ ॥

बोले आपण आपणाशीं॥ अंतरीं आपणां आपण उपदेशी॥
पाहे तया विवेकेंसी ॥ कांहीं आकार असेना ॥ ६ ॥

तूं आपणच आपणाशीं बोल, आपणच आपणास उपदेश कर, आणि अशाप्रकारच्या विवेकयुक्त बुद्धीनें पहा, ह्मणजे मग कोणत्याही प्रकारचा आकार दिसणार नाहीं. ॥ ६ ॥

जेथूनि उपजे विवेकमातु ॥ पाहे तंव अंतःकरणांतु ॥
तेंहि धरूनि जाणीव हेतु ॥ जाणतें होय ॥ ७ ॥

जेथून विवेक उत्पन्न होतो, तें तुझ्या मनामध्येंच पहा. तें मनच ज्ञानाचा अभिमान धरून ज्ञानी होतें. ॥ ७ ॥

देहासहित ब्रह्मांड शून्य ॥ झालिया उरे परिपूर्ण ॥
कांहीं न दिसे स्थानमान ॥ कवणे ठायीं ॥ ८ ॥

आपल्या स्थूल देहासह सर्व ब्रह्मांडाचा निरास झाला, ह्मणजे मग दुसरें कांहीं ठिकाण, किंवा पदार्थ कांहींच कोठें दिसत नाहीं.८

साकार हा त्रिलोकु ॥ नेणों काय झाला सकळिकु ॥
संचलों मीं एकाएकु ॥ चिदाकाश ॥ ९ ॥

अनेक प्रकारच्या आकारांनीं युक्त असें त्रैलोक्य कोठें गेलें, त्याचें काय झालें, हें मग समजत नाहीं. चिदाकाशरूपी मीच मात्र जिकडे तिकडे भरलेला आहें असें भासूं लागतें. ॥ ९ ॥

**अंतरबाह्य परिपूर्ण ॥ शून्य झालें दृश्याचें भान ॥**
**असणें आपणिया आपण ॥ एकत्वरहित ॥ १० ॥**

जें जें ह्मणून दृश्य आहे, त्यासंबंधाचें पूर्णपणें ज्ञान झालें, ह्मणजे मग तें नाहीं असें वाटूं लागतें, आणि मग ' मी एकच आहें ' अशाप्रकारचें ज्ञानदेखील तेथें रहात नाहीं. ॥१० ॥

**तेथें अंधारी गेली ॥ मन बुद्धि मावळलीं ॥**
**आत्मप्रभा उजळली ॥ चिदादित्याची ॥ ११ ॥**

या स्थितींत अज्ञान नाहींसें होतें, मन व बुद्धि हीं मावळतात, आणि ज्ञानरूपी सूर्याचा उदय होऊन त्याचा प्रकाश दिसूं लागतो. ॥ ११ ॥

**येणें परी स्थूळाचा ॥ पर्वत मोडला जागृतीचा ॥**
**आतां निरास लिंगदेहाचा ॥ तैसाच कीजे ॥ १२ ॥**

याप्रमाणें स्थूल देह व त्याची जागृति ही अवस्था, यांजमध्यें होणारा जो कांहीं व्यवहार तो आपण नाहींसा करून टाकला. आतां अशाच विचारानें सूक्ष्म देहाचाही व्यवहार नाहींसा करून टाकला पाहिजे. ॥ १२ ॥

**स्फूर्ति स्फुरे जेथुनी ॥ तें पहिलेंचि असे अस्फूर्तिपणीं ॥**
**मज देखतां उमटोनि ॥ मावळे स्फूर्ती ॥ १३ ॥**

जेथून जाणीव उत्पन्न होते, तेथें ती उत्पत्तीपूर्वीं नेणीवच असते. तिला एकदां आपण कोण हें ज्ञान झालें म्हणजे ती जाणीव उत्पन्न होऊन पुनः नाहींशी होते. ॥ १३ ॥

**तूं तये स्फूर्तीचा जाण ॥ संकल्पविकल्पात्मकाचें जीवन॥**
**निश्चयाचें कारण ॥ तूंचि असे ॥ १४ ॥**

त्या स्फूर्तीला जाणणारा ( अंतःकरण ) तूंच आहेस. संकल्प व विकल्प यांची उत्पत्ति करणारा ( मन ) तूंच आहेस. निश्चयाचेंही कारण ( बुद्धि ) तूंच आहेस. ॥ १४ ॥

**अनुसंधान पूर्वींच असे ॥ ह्मणूनि तें उपजतां तुज दिसे॥**
**अहंता तुझेनि आंगें वसे ॥ तेहि तूंचि जाण ॥ १५ ॥**

देहादिकांच्या ठिकाणीं तुझें लक्ष पूर्वींपासूनच लागलेलें असतें ह्मणून उपजल्याबरोबर तुला दिसूं लागतें. हें सर्व दृश्य आणि पाहणारा असा जो अभिमान ( अहंकार ) तुझ्या अंगीं आहे, तो तुला माहीतच आहे. ॥ १५ ॥

**ऐसें पांचां भेदीं अंतःकरण ॥ हेंहि तूंचि स्फुरे जाण ॥**
**तें सांडितां काय तुजविण ॥ वेगळें पडे ॥ १६ ॥**

अशाप्रकारें अंतःकरणाचे पांच भेद आहेत, हें तुझें तुलाच समजतें. हें पंचक जर सोडून दिलेंस, तर मग तुझ्याशिवाय ( आत्मस्वरूपाशिवाय ) दुसरें काय बरें वेगळें आहे असें दिसेल ?१६॥

**जळें तरंग केवीं सांडावा॥आकाशें वायु केवीं दवडावा ॥**
**तेवीं तुझ्या स्फूर्तिभावा ॥ कैसोनि दवडिजे ॥ १७ ॥**

उदकानें तरंग कसा टाकावा ? आकाशानें वायु कोठें टाकावा ? त्याप्रमाणें तुझ्या ठिकाणीं असणाऱ्या स्फूर्तीस कोठें बरें टाकावें?१७

**तरंग जळीं विरे ॥ वायु गगनीं मुरे॥**
**तैशी तुझी स्फूर्ति स्फुरे ॥ तुजमाजीं ॥ १८ ॥**

जसा तरंग उदकांत जिरतो, किंवा वायु आकाशांत लीन होतो, त्याप्रमाणें तुझ्या ठिकाणची स्फूर्ति तुझ्यामध्येंच गुप्त होईल.॥१८॥

**झाडितां आपला हात ॥ तंव आंगासि असे जडित ॥**
**तैशी अंतःकरणस्फूर्ति मूर्तिमंत ॥ कैशी सांडिशी ॥ १९॥**

आपला हात अंगावरून काढावा असें जर म्हटलें तर, तो अंगाला चिकटलेलाच आहे. तो जसा काढून टाकतां यावयाचा नाहीं, त्याप्रमाणें तुझ्या अंतःकरणावरील स्फूर्ति तुला काढून टाकतां यावयाची नाहीं. ॥ १९ ॥

**सांडूं पाहाशी तंव तेचि स्फूर्ति॥करूं पाहशी तंव तेचि वृत्ति॥**
**विचारूं पाहासी तंव तेच मति ॥ मन चित्तें ॥ २० ॥**

कारण जें सोडावें म्हणतोस ती सुद्धां स्फूर्तीच नव्हे का? जो करतोस तोच व्यवहार व जो विचार करतोस तीच मति आहे, याचा मनांत नीट विचार करून पहा. ॥ २० ॥

**चिंतूं पाहाशी तंव तें चित्त ॥ मी म्हणतां अहंकार होत ॥**
**उगाचि असतां स्वस्थ ॥ स्वस्थता स्फुरे ॥ २१ ॥**

जेव्हां चिंता करतोस तेव्हां तें चित्त, मी असें म्हणतोस तेव्हां तो अहंकार, बरें उगीच असलास तर ती स्वस्थताच आहे.॥२१॥

**जरी उगाचि असता ॥ तरी कां आठवू स्फुरता ॥**
**संकल्पविकल्प करितां ॥ कासयासी ॥ २२ ॥**

जर हा जीव स्फूर्तिरहित असता, तर याला आठवण तरी कशाची झाली असती? आणि हा संकल्प व विकल्प तरी कशाबद्दल करीत बसता? ॥ २२ ॥

**एक निश्चय धरिता ॥ तरी कां पुनः पुनः चिंतिता ॥**
**देहत्वें कां आंगवता ॥ मी ह्मणोनि ॥ २३ ॥**

जर यानें एकत्वाचा निश्चय धरिला असता तर पुनः पुनः विचारांत कां पडला असता ? आणि देह हाच मी असा अभिमान तरी यानें कां धरला असता ? ॥ २३ ॥

**ह्मणोनि हें असंतचि सरे ॥ ऐसें वर्म आहे बारे ॥**
**तें ज्ञान नसतें तरी अहंकारें ॥ केवीं उठिजे ॥ २४ ॥**

यासाठीं हा सगळा खोटा व्यवहार नाहींसा होईल, असें जें वर्म तें कांहीं वेगळेंच आहे. तें ज्ञान जर नसतें, तर अहंकार तरी कोठून उत्पन्न झाला असता ? ॥ २४ ॥

**आठव चित्तीं जो राहे ॥ तें ज्ञान नव्हे तरी काये ॥**
**ज्ञानेंविण स्थिरत्व आहे ॥ बुद्धीस कोठें ॥ २५ ॥**

मनांत जी आठवण राहाते, तें ज्ञान नव्हें तर काय ? ज्ञानावांचून बुद्धीच्या ठिकाणीं स्थिरता आली काय ? २५ ॥

**तें ज्ञान जरी अधिष्ठान ॥ तरी संकल्पविकल्पात्मक मन ॥**
**तेंचि ज्ञान परिपूर्ण ॥ यालागीं स्फुरण असेना ॥ २६ ॥**

यासाठीं ज्ञान ह्मणून जर कांहीं एक ठिकाण असेल, तरच त्याचा आश्रय करून संकल्प विकल्पात्मक मन राहील. पण तें ज्ञान जर परिपूर्ण असेल तर त्याच्या ठिकाणीं कोणतेंच स्फुरण असणार नाहीं. ॥ २६ ॥

**तें स्मरतां नये स्मरण ॥ स्मरण जयाचें विस्मरण ॥**
**तें ज्ञान ना अज्ञान ॥ ज्ञप्तिमात्र जें ॥ २७ ॥**

तें काय आहे ही आठवण केल्यास तें आठवत नाहीं. कारण स्मरण हेंच विस्मरण आहे! तें ज्ञानही नाहीं आणि अज्ञानही नाहीं. तें केवळ ज्ञप्तिमात्र आहे! ॥ २७ ॥

**कांहीं वृत्तिभास भासे ॥ तो स्फुरतांचि तया दिसे ॥**
**परी स्वतः आपण असे ॥ निराभास ॥ २८ ॥**

कांहीं व्यवहार व भास असे त्याच्या ठिकाणीं भासतात खरे, पण तें स्वतः स्फुरण पावेल तरच ते त्याला भासतील. पण तें आपण तर भासरहित आहे. ॥ २८ ॥

**तो निराभास ह्मणावा कवण ॥ तेंचि तया असे जाण ॥**
**जाणीवही जिरऊन ॥ आंगींचे आंगीं ॥ २९ ॥**

पण तें निराभास असें तरी कसें ह्मणावें? कारण भास व निराभास सगळें तेंच आहे. कारण ज्ञानशक्ति देखील त्याचमध्यें जिरून गेलेली आहे. ॥ २९ ॥

**यालागीं जाणीव ना नेणीव ॥ भाव ना अभाव ॥**
**तेंचि तें स्वयमेव ॥ स्वस्वरूप ॥ ३० ॥**

**इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचित दृश्यभासखंडने निदिध्यासनं नाम दशमप्रकरणं संपूर्णम् ॥ १० ॥**

ह्मणून तें जाणीवही नाहीं व नेणीवही नाहीं. तें भावरूपही नाहीं आणि अभावरूपही नाहीं. तर तें आपण स्वतः आपल्याच रूपानें रहाणारें असें कांहीं तरी ) अनिवर्चनीय ) आहे. ॥ ३० ॥

# प्रकरण अकरावें.

## अज्ञान–खंडन.

**आपण आपणासि नेणे ॥ ऐसें आपणचि जाणे ॥**
**जाणपण हें नुमजणें ॥ तेंचि पैं तें ॥ १ ॥**

मी आपणास आपण जाणत नाहीं, असें तरी तो जीव स्वतः-सच जाणतो; पण हें जें अज्ञानपण तेंही ज्ञानच होय. ॥ १ ॥

**नेणिवेच्या ग्रासें ॥ जाणीव उरली दिसे ॥**
**तेचि तेथें वसे ऐसें ॥ केवीं घडे ॥ २ ॥**

ह्या प्रसंगीं सर्व अज्ञानाचें आकलन करून ज्ञानमात्र अवशिष्ट राहिलें आहे, असें दिसून येतें. मग अज्ञान हें त्या ज्ञानांतच आहे, असें कसें ह्मणतां येईल ? ॥ २ ॥

**जाणिवा नेणिवा ॥ दोहीं विरहित भावा ॥**
**दोहीं बीजा वोलावा ॥ विस्तारिता तो ॥ ३ ॥**

पण आत्मस्वरूप हें जाणिव आणि नेणीव या दोन्ही स्थितींच्या पलीकडचें आहे. जाणीव आणि नेणीव या दोहोंच्याही बीजांस ओलावा देऊन वाढविणारा तोच आहे. ॥ ३ ॥

**तो जाणिवा नेणिवा ॥ नातळे दोन्ही भावां ॥**
**आधींच असे तो जाणावा ॥ स्वरूपानंद ॥ ४ ॥**

तो ज्ञान व अज्ञान या दोन्ही भावांस सांपडत नाहीं. तो त्यांच्या पूर्वींचाच आहे. तोच आत्मस्वरूपाचा आनंद होय. ॥ ४ ॥

**कांहींच न स्फुरतां आदि ॥ जें स्थळ असे अनादि ॥**
**जे ज्ञानाची कंदी ॥ ज्ञप्तिमात्र ॥ ५ ॥**

त्याच्या पूर्वी कांहींच असत नाहीं, ह्मणून त्याला अनादि—सर्वा-पूर्वीचा असें म्हणतात. तो ज्ञानस्वरूप असून ज्ञानाचें वसतिस्थान आहे. ॥ ५ ॥

**जें निष्कळंक ज्ञान घनानंद॥आपणचि आपण स्वतःसिद्ध॥**
**निजरूप विशुद्ध ॥ स्वसंवेद्य ॥ ६ ॥**

तें आत्मस्वरूप कलंकरहित आहे. ज्ञानानें व आनंदानें परिपूर्ण भरलेलें आहे. तें आपलें आपणच स्वतः बनलेलें आहे. अत्यंत शुद्ध असें तें आपलेंच रूप आहे, तें आपलें आपणच जाणावयाचें आहे. ॥ ६ ॥

**जें जाणेचि जाणणें ॥ ह्मणूनि नाहीं तेथें नेणणें ॥**
**तें आप आपण एकपणें ॥ जाणे ना नेणे ॥ ७ ॥**

तें ज्ञानासच जाणतें, म्हणून तेथें अज्ञान असत नाहीं. वास्त-विक तें आपलें आपण एकच आहे, ह्मणून तें जाणतही नाहीं आणि नाहीं जाणत असेंही नाहीं. ॥ ७ ॥

**तें परिपूर्ण एकलें ॥ ह्मणोनि दिसावें हें खुंटलें ॥**
**घनानंद कोंदाटलें ॥ स्वस्वरूप ॥ ८ ॥**

तें ज्ञान केवळ परिपूर्ण एकच भरलेलें आहे, ह्मणून त्या ज्ञानानें कांहीं पहावें असें दुसरें असतच नाहीं. तें आपल्या परिपूर्ण आनं-दानें व त्याच आपल्या स्वरूपानें भरलेलें आहे. ॥ ८ ॥

**दिसतें तें दुसरें ॥ तेंहि तेथें सरे ॥**
**मग देखणेंचि उरे ॥ तेंचि तया केवीं दिसे ॥ ९ ॥**

जो पदार्थ दिसतो, तो पहाणारा वेगळा असतो, पण येथें दुसरें कांहींच नाहीं. ह्मणून जो पहाणारा ज्ञानरूपी आत्मा तो आपणच आपणास कसा पाहील ? ॥ ९ ॥

**तें देखणेंचि देखणें ॥ ह्मणोनि तयासि तें पाहाणें ॥**
**जें जाणवलें तें निरसणें ॥ उरे तेंचि ॥ १० ॥**

बरें तो ज्याअर्थी पाहणारा आहे, त्या अर्थी त्यानें कांहीं तरी पाहिलेंच पाहिजे असें ह्मणाल तर तो आपणच आपणास पाहतो असें समजा. पण जें जें ह्मणून ज्ञान असें समजतें, त्याचा त्याचा त्याग करावयाचा आहे, ह्मणून मग एक आत्मस्वरूप मात्र बाकी राहातें. ॥ १० ॥

**दृश्य द्रष्टा दर्शन ॥ या तिन्ही भावां विलक्षण ॥**
**एकलेंचि आपण ॥ ज्ञप्तिमात्र ॥ ११ ॥**

दृश्य ( पहावयाचा पदार्थ ) द्रष्टा ( पहाणारा ) व दर्शन ( पहाणें ) या तिन्ही कल्पनांहून तो अगदीं वेगळा आहे. तो एकटा आपला आपण आहे व केवळ ( ज्ञाता व ज्ञेय यांखेरीज ) ज्ञानमात्र आहे. ॥ ११ ॥

**दृश्य दर्शन हरपे ॥ उरिजे स्वस्वरूपें ॥**
**अखंडित आपआपे ॥ निरायम ॥ १२ ॥**

दृश्य व दर्शन हीं दोन्ही जेथें नाहींशीं झालीं, तेथें आत्मस्वरूप मात्र राहिलें. तें स्वरूप खंडरहित स्वतःसिद्ध व क्लेशरहित आहे. १२

**जाय लया सर्व दिसणें ॥ तेथें खुंटलें देखणें ॥**
**मग देखणें आपुलेया खुणे ॥ सदोदित ॥ १३ ॥**

दिसण्याचे पदार्थ नाहींसे झाल्यावर पहातेपणा ( दर्शन ) आपोआपच नाहींसा होतो. मग पहाणारा मात्र आपली आपण ओळख धरून सर्वदा असतो. ॥ १३ ॥

**तें आपणाचि आपण ॥ अविनाश परिपूर्ण ॥**
**ऐसें ओळखावें परतोन ॥ स्वस्वरूप ॥ १४ ॥**

तें आत्मस्वरूप आपणच आहों, त्याचा कधीं नाश होत नाहीं, अशा प्रकारचा विचार—सर्व दृश्य पदार्थांपासून मागें परतून करावा. ॥ १४ ॥

**नेणिवेच्या निरासें ॥ कारण शरीर नासे ॥**
**जाणीवही समरसे ॥ महाकारणीं ॥ १५ ॥**

अज्ञानाचा नाश झाला कीं कारण शरीराचाही नाश होतो. आणि ज्ञानही महाकारण शरीरामध्यें एकवटून जातें ॥ १५ ॥

**सुषुप्ति आणि तुर्या ॥ प्राज्ञ प्रत्यगात्मा अभिमानिया ॥**
**विश्व तैजस गेलिया ॥ जाग्रत्स्वप्न कैंचें ॥ १६ ॥**

सुषुप्ति ( निद्रा ) आणि तुर्या या अवस्थांचे प्राज्ञ व प्रत्यगात्मा हे अभिमानी आहेत व जागृति व स्वप्न या अवस्थांचे विश्व आणि तैजस हे अभिमानी आहेत. हे अभिमानी नष्ट झाल्यावर मग या सर्व अवस्था कोठून उत्पन्न होतील ? ॥ १६ ॥

**एवं देहचतुष्टयाचा निरास ॥ करूनि जाणिजे अविनाश ॥**
**तंव आपणाचि स्वयंप्रकाश ॥ ज्ञानघन ॥ १७ ॥**

याप्रमाणें चारी देहांचा निरास करून तें कधींही नाश न होणारें, स्वयंप्रकाश आणि ज्ञानानें भरलेलें आत्मस्वरूप जाणून घ्यावें. तेंच आपलें स्वरूप होय. ॥ १७ ॥

**सांडूनि आपले जाणिवेशी ॥ जैं स्वस्थ उगा राहासी ॥**
**तैं काय आहे मग जाणशी ॥ निःसंगपणें ॥ १८ ॥**

आपल्या ठिकाणीं असलेली ज्ञानशक्ति सोडून देऊन जर तूं स्वस्थ राहिलास, तर तूं निःसंग झालास. मग तूं दुसरें काय बरें जाणशील ? ॥ १८ ॥

**जेव्हां जाणिवेतें सोडिलें ॥ तेव्हां स्फुरणचि खुंटलें ॥**
**उठलें ठायीं लया गेलें ॥ तुजचि माजीं ॥ १९ ॥**

जेव्हां तूं जाणीव सोडून दिलीस, तेव्हांच तिची ज्ञानशक्तिही नाहींशी झाली. ती ज्ञानशक्ति मागें परतून तुझ्यामध्येंच लय पावली. ॥ १९ ॥

**जाणीव शून्यासहित ॥ तुजमाजीं सामावत ॥**
**तो तूं आत्मा अपरिमित ॥ स्वयंभमूर्ति ॥ २० ॥**

आपल्या अभावासह जाणीव तुझ्याशीं एकरूप झाली; असें जें तुझें स्वरूप तोच आत्मा होय. तो मोजतां यावयाचा नाहीं. तो स्वतःच उत्पन्न झालेला आहे. ॥ २० ॥

**तेथें जाणीव नेणीव नाहीं ॥ शब्द निःशब्द कांहीं ॥**
**रूप अरूप हेंहीं ॥ नेणिजे सोय ॥ २१ ॥**

त्याठिकाणीं जाणीव किंवा नेणीव हीं दोन्ही नाहींत. तें शब्द किंवा निःशब्द, रूप किंवा अरूप आहे, हें जाणतां येत नाहीं. २१

**देखतें ना अदेखणें ॥ परकीय ना आपण ॥**
**स्मरण ना विस्मरण ॥ स्मृतिमात्र जें ॥ २१ ॥**

तें पहाणारें नाहीं, किंवा त्याला कोणी पहात नाहीं. तें आपणही नाहीं आणि दुसरेंही नाहीं. त्याचेठायीं आठवण नाहीं किंवा विसरणेंही नाहीं. तें केवळ स्मृतिमात्र आहे. ॥ २२ ॥

**वृत्ति ना निवृत्ति ॥ अपूर्ण ना पूर्णस्थिति ॥**
**अभाव ना भावप्रतीति ॥ प्रतीतिमात्र जें ॥ २३ ॥**

वृत्ति किंवा अवृत्ति, पूर्णता किंवा अपूर्णता, भाव किंवा अभाव, अशा प्रकारची कोणतीही स्थिति तेथें नाहीं. तें केवळ अनुभवरूप मात्र आहे. ॥ २३ ॥

**धरितां सोडितां नये ॥ नाहीं आहे ह्मणणें राहे ॥**
**अनुभवीं अनुभवितां नये ॥ ठायीं नेणिजे ॥२४ ॥**

त्याला धरतां येत नाहीं, किंवा सोडितां येत नाहीं. आहे ह्मणतां येत नाहीं किंवा नाहीं ह्मणतां येत नाहीं. तें अनुभवानें अनुभवितां येत नाहीं. कोणत्या ठिकाणीं आहे, हेंहीं समजत नाहीं. ॥ २४ ॥

**ऐसें हें अभ्यासणें ॥ अंतरींचें अंतरीं जाणणें ॥**
**निश्चळ स्वरूपीं स्थिरावणें ॥ कीजे मनाचें ॥ २५ ॥**

अशा प्रकारच्या या रूपाचा अभ्यास करून तें अंतःकरणानें जाणून घ्यावें. आणि निश्चळ अशा त्या आत्मरूपाचेठायीं मनाला स्थिर करावें. ॥ २५ ॥

**स्वस्वरूप जाणिजे ॥ मग आलिंगोनि राहिजे ॥**
**स्वयेंचि चंचळपण कीजे ॥ कल्पनाव्यापार ॥ २६ ॥**

प्रथम आत्मस्वरूपाचें ज्ञान करून घ्यावें, आणि नंतर तें मनामध्यें घट्ट धरावें. मनाचे सर्व प्रकारचे कल्पनेचें खेळ चंचल आहेत, ( म्हणून ते सोडून द्यावेत. ) ॥ २६ ॥

**ऐसें करितां मन विरमे ॥ विषयव्यापार शमे ॥**
**मग चित्त रमे ॥ कांहीं कांहीं स्वस्वरूपीं ॥ २७ ॥**

असें केलें असतां मन शांत होईल. विषयांचे व्यापार नष्ट होतील. आणि हळुहळू मन आत्मस्वरूपाचेठायीं स्थिर होईल. २७

**विसरे प्रकाशे स्वरूप ॥ हारपे सांपडे आपेआप ॥**
**ऐसा करितां आक्षेप ॥ मन स्थिरावे ॥ २८ ॥**

थोडा वेळ त्याचा विसर पडेल पण तें पुनः भासूं लागेल. तें हरवेल पण पुनः सांपडेल. अशा प्रकारें अभ्यासाचा यत्न केला असतां तें स्थिर होईल. ॥ २८ ॥

**निवांत भोगी स्वरूप ॥ डुल्लत आनंदें आपेआप ॥**
**मग तया सुखाचें माप ॥ कवण करी ॥ २९ ॥**
**इतिश्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते अज्ञानखंडनं नाम एकादशप्रकरणं संपूर्णम् ॥ ११ ॥**

मग शांतपणें त्या स्वरूपाच्या आनंदाचा उपभोग घेत तें मन डोलत राहील. मग त्या सुखाची गणना कोण करील बरें ? ॥२९॥

---

## प्रकरण बारावें.

### स्वानुभव-सुख-वर्णन.

**स्वेदकंपादि उठती ॥ अष्ट सात्विक भाव प्रगटती ॥**
**पावे साम्राज्यसंपात्ति ॥ रंक जैसा ॥ १ ॥**

ही स्थिति प्राप्त झाली ह्मणजे आठही सात्विक भाव प्रकट होऊन घाम येणें, कंप उत्पन्न होणें वगैरे लक्षणें होऊं लागतात. ज्याप्रमाणें एकाद्या भिकाऱ्यास सार्वभौम राज्य प्राप्त झालें असतां आनंद होतो, तसा त्या स्थितीमध्यें साधकाला आनंद होतो. ॥ १ ॥

**चित्त चैतन्यीं हारपे ॥ उरिजे ज्ञप्तिस्वरूपें ॥**
**अखंडित आप आपें ॥ ब्रह्मानंद ॥ २ ॥**

चित्त हें चैतन्यामध्यें लीन होऊन जातें, आणि केवळ ज्ञान मात्र अवशिष्ट राहातें. त्याच स्थितींत सहज व अखंडित अशा आनंदाचा अनुभव येतो. ॥ २ ॥

**तया सुखाचेनि समरसें ॥ पावे सुलीन दशे ॥**
**तें बोलावें कैसें ॥ अनुभवी जाणती ॥ ३ ॥**

त्या सुखामध्यें गढून गेलेला साधक आत्मस्वरूपीं लीन कसा होतो, हें कसें बरें शब्दांनीं सांगतां येईल? जे अनुभवी आहेत, तेच हें सुख जाणतात. ॥ ३ ॥

**जैसें अमृत चाखे आपुली चवी ॥ तैसें स्वसुख अनुभवी ॥**
**तेथें कोण आठवी ॥ संसारासी ॥ ४ ॥**

ज्याप्रमाणें अमृताची गोडी कांहीं वेगळीच आहे, त्याप्रमाणेंच

त्या आत्मसुखाचा अनुभव कांहीं निराळाच आहे. त्या सुखापुढें मग संसाराची आठवण कोणास बरें राहील ? ॥ ४ ॥

**वोळे स्वानंदाचा घन ॥ दाटे सुख परिपूर्ण ॥**
**तयामाजीं विवेक सुजाण ॥ हारपोनि जाय ॥ ५ ॥**

त्या स्थितींत आनंदाच्या मेघाची वृष्टि होते. जिकडे तिकडे सुखच परिपूर्ण भरलेलें असतें. विवेक विचार वगैरे हारपून जातात. ॥ ५ ॥

**अहंता स्वरूपीं गळे ॥ विषयतृष्णा मावळे ॥**
**इंद्रियांचे लळे ॥ क्रियेविण पूर्ण होती ॥ ६ ॥**

अभिमान गळून जातो, विषयांची इच्छा नाहींशी होते, आणि कोणतेंही कर्म केल्यावांचूनच इंद्रियांच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. ६

**महासुखाचे अरुवारीं ॥ आलिंगी स्वनुभूति सुंदरी ॥**
**ज्ञानमात्र इया परी ॥ स्वस्वरूप भोगी ॥ ७ ॥**

तो अतिशय सुखाच्या उत्तम मऊ गादीवर अनुभूतिनामक सुंदरीस आलिंगन देऊन त्या सुखाचा अनुभव घेत असतो. अशा रीतीनें केवळ ज्ञानस्वरूप होऊन तो स्वस्वरूपाचा अनुभव घेत असतो. ॥ ७ ॥

**निरसितां नेणीव ॥ स्वरूपीं समरसे जाणीव ॥**
**मग एकछत्री राणीव ॥ योगियासी ॥ ८ ॥**

अज्ञानाचा नाश केला कीं आत्मस्वरूपाशीं ज्ञानशक्ति एकवटून जाते. आणि योग्याला एकछत्री राज्य प्राप्त होतें. ॥ ८ ॥

सदां स्वानंदाचे सोहळे ॥ विषयविजाती विवळे ॥
स्वरूपसुखाचेनि मेळें ॥ इंद्रियातृप्ती ॥ ९ ॥

नेहमीं आत्मसुखाचा अनुभव येतो. सर्व प्रकारचे विषय नाहीसे होतात. आत्मसुखामुळेंच इंद्रियांना समाधान होतें. ॥ ९ ॥

परमसुखाचेनि भरें ॥ एकहि स्फूर्ती न स्फुरे ॥
कार्य जाती विसरे ॥ निमिष्यांत ॥ १० ॥

या सुखामध्यें अडथळा येईल ह्मणून मग कोणत्याही प्रकारच्या ज्ञानाचें तेथें स्फुरण होत नाहीं. व सर्व प्रकारचीं कार्यें तो एका क्षणांत विसरून जातो. ॥ १० ॥

करूनि यज्ञाचिया कोडी ॥ उभविती स्वर्गाची गुढी ॥
तें सुख कीजे कुर्वंडी ॥ या ब्रह्मसुखासी ॥ ११ ॥

कित्येक कर्ममार्गी पुरुष अनेक यज्ञ करून स्वर्गप्राप्तीचा झेंडा मिरवितात, पण तें स्वर्गसुख या ब्रह्मसुखावरून ओवाळून टाकावें. ॥ ११ ॥

आनंद आनंदासी घोंटी ॥ बोलतां परेसी पडे मिठी ॥
मुक्यानें सुखाच्या गोष्टी ॥ केवीं कीजे ॥ १२ ॥

त्या ठिकाणीं आनंदच आनंदाचा उपभोग घेतो. वाचेची गति खुंटून जाते. अशारीरतेनें मुकेपणा आल्यावर मग त्या सुखाच्या कोणत्या तोंडानें गोष्टी बोलाव्या ॥ १२ ॥

खुंटलें मनाचें जाणणें ॥ तें सुख अनुवादावें कवणें ॥
हें अनुभवी तोचि जाणे ॥ इतरां टकमक ॥ १३ ॥

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते स्वानुभवसुखवर्णनं
नाम द्वादशप्रकरणं संपूर्णम् ॥ १२ ॥

जेथें मनाचेंच ज्ञान नाहीसें झालें, त्या सुखाचा अनुभव कोणी घ्यावा? ज्याला अनुभव असेल तोच हें जाणेल. इतरांनीं त्यांच्या तोंडाकडे टकमकां पहातच राहावें. ॥ १२ ॥

---

## प्रकरण तेरावें.

### मुक्तिरहस्य—निरूपण.

**ऐशी पावोन योगखुण ॥ स्वानंद भोगितो परिपूर्ण ॥**
**तया योगिया न घडे क्षण ॥ संसाराचा ॥ १ ॥**

अशा प्रकारचें रहस्य समजल्यामुळें जो योगी पूर्णपणें स्वानंद-सुखाचा उपभोग घेत असतो, त्या योग्याला संसाराचा (जन्ममृत्यूचा) त्रास होत नाहीं. ॥ १ ॥

**झाले ब्रह्म आपण ॥ योगी सहज परिपूर्ण ॥**
**सदा स्वानंदनिमग्न ॥ ज्ञप्तिमात्र ॥ २ ॥**

तो योगी आपणच ब्रह्म होतो. तो केवल ज्ञानमय होत्साता सदोदित आत्मानंदामध्यें मग्न होऊन सहज व पूर्ण अशा स्थितीमध्यें राहतो. ॥ २ ॥

**संकल्प आणि विकल्प ॥ दोनी न दिसती अल्प ॥**
**सुख पावले अमुप ॥ म्हणोनियां ॥ ३ ॥**

संकल्प किंवा विकल्प हीं दोन्ही त्याच्या मनामध्यें थोडीं सुद्धां असत नाहींत, म्हणून त्याला अगणित (न मोजतां येण्यासारखें) सुख प्राप्त होतें. ॥ ३ ॥

**साधन असाधन खुंटलें ॥ अकरणें करणें मोडलें ॥**
**आपणचि ते झाले ॥ परब्रह्म ॥ ४ ॥**

कोणती एखादी गोष्ट साधावयाची आहे किंवा साधावयाची नाहीं, करावयाची आहे किंवा करावयाची नाहीं, अशा प्रकारची त्याला इच्छा नसते. ते योगी आपणच परब्रह्मस्वरूप झालेले असतात. ॥४॥

**नाहीं धारणा ध्यान ॥ नाहीं समाधि आसन ॥**
**चुबुकळीत आनंदघन ॥ आपणामाजीं ॥ ५ ॥**

त्यांना धारणा, ध्यान, समाधि, आसन वगैरे योगाभ्यास करावा लागत नाहीं. ते आत्मानंदामध्यें नेहमीं बुचकळ्या मारीत असतात.॥५

**भुवनत्रयीं क्रीडती ॥ स्वइच्छा वर्तती ॥**
**अखंड स्फुरे ज्ञप्ती ॥ म्हणोनियां ॥ ६ ॥**

त्यांची ज्ञानशक्ति सर्वदा स्फुरण पावत असल्यामुळें त्रिभुवनामध्यें आनंदानें क्रीडा करीत असतात व आपल्या इच्छेप्रमाणें वागत असतात. ॥ ६ ॥

**विधिनिषेधाची कडसणी ॥ न वसे जया अंतःकरणीं ॥**
**पापपुण्याची काहाणी ॥ तेहि नेणती ॥ ७ ॥**

अमुक करावें हा विधि किंवा अमुक करूं नये हा निषेध, त्यांच्या मनांत असत नाहीं. तसेंच पाप किंवा पुण्य यांचा निर्बंधही ते जाणत नाहींत. ॥ ७ ॥

**शुभाशुभ फळें ॥ न बाधती कवणे वेळें ॥**
**ते सर्वांपासून सुटले ॥ जीवन्मुक्त ॥ ८ ॥**

बरीं किंवा वाईट अशीं कर्मांचीं फळें त्यांस कोणत्याही काळीं

पीडा करीत नाहींत. ते सर्व व्यवहारापासून जिवन्मुक्त झालेले असतात. ॥ ८ ॥

बंधमोक्षाची वार्ता ॥ नाइकती सर्वथा ॥
सहजचि ध्याती शाश्वता ॥ अखंडितासी ॥ ९ ॥

बंध किंवा मोक्ष या संबंधाची गोष्ट ते ऐकत देखील नाहींत. तर चिरकाळ असणारें आणि अखंडित (ज्याचे तुकडे होत नाहींत असें) असें जें परब्रह्म त्याचें ते सदोदित ध्यान करीत असतात. ॥ ९ ॥

जे मनापासोनि सुटले ॥ तया संशय नुरले ॥
करणीय अकरणीय गेलें ॥ सर्व कर्म ॥ १० ॥

जे मनापासून सुटले, त्यांचे ठिकाणीं कोणत्याही प्रकारचा संशय असत नाहीं. अमकें कर्म केलें पाहिजे व अमकें करावयास नको. अशी त्यांच्या मनांत शंका असत नाहीं. ॥ १० ॥

ऐसे होऊनि निभ्रांत ॥ कळों न देती आपुला अंत ॥
लोकांमाजीं दावित ॥ भक्तिरहस्य ॥ ११ ॥

अशाप्रकारें जरी ते निःशंक झालेले असतात, तरी ते कोणासही आपला अंत लागूं देत नाहींत. लोकांला भक्तीचें रहस्य काय आहे, हें समजावून देतच असतात ॥ ११ ॥

भक्तिज्ञान वैराग्य पाहीं ॥ करूनि दाविती आपुले देहीं ॥
जगासि लाविती सोई ॥ तारक ते ॥ १२ ॥

भक्ति, ज्ञान आणि वैराग्य यांचें आचरण आपल्या स्वतःच्या देहानें करून दाखवून सर्व जगाला उत्तम मार्गास लावितात, आणि त्याचे तारक होतात. ॥ १२ ॥

**भोगिती स्वरूपरहस्य ॥ करिती सद्गुरूचें दास्य ॥**
**परी भेद नाहीं सामरस्य ॥ जाणती जीवेश्वराचें ॥ १३ ॥**

आत्मस्वरूपाच्या आनंदाचा उपभोग घेत असूनही ते सद्गुरूची सेवा करीत असतात. पण त्यांच्या मनांत कोणत्याही प्रकारचा भेद असत नाहीं. कारण जीव आणि ईश्वर यांचें ऐक्य आहे असें पूर्ण ज्ञान त्यांस झालेलें असतें ॥ १३ ॥

**प्रेमें स्फुंदती नित्य ॥ स्मरणविस्मरणेंवीण नेमस्त ॥**
**क्षणाक्षणां उच्चारित ॥ नाम गुरूचें ॥ १४ ॥**

ते नेहमीं प्रेमानें सद्गदित झालेले असतात. स्मरण किंवा विस्मरण यांचें भान त्यांना असत नाहीं. ते क्षणोक्षणीं आपल्या गुरूच्या नांवाचा वारंवार उच्चार करीत असतात. ॥ १४ ॥

**गुरु परमेश्वर ऐक्यता ॥ तद्रूप जाणोनि भजतां ॥**
**सन्मान देती संतां ॥ अति प्रीतीनें ॥ १५ ॥**

गुरु आणि परमेश्वर यांचें ऐक्य आहे, असें समजून ते गुरूला भजत असतात. आणि साधुसंतांचा मोठ्या प्रीतीनें ते सन्मान करीत असतात. ॥ १५ ॥

**आणि विश्वामाजीं ईश्वरू ॥ एकचि व्यापक सद्गुरू ॥**
**म्हणोनि सर्वां भूतां आदरू ॥ करिती ते ॥ १६ ॥**

या सर्व विश्वामध्यें सर्व व्यापून राहणारा, आणि सर्वांचें नियमन करणारा असा गुरूच आहे, असें म्हणून ते सर्व प्राण्यांचे ठिकाणीं आदर धरितात. ॥ १६ ॥

हृदय जयांचें कोमळ ॥ सदा शुचिष्मंत निर्मळ ॥
निरंतर आचारशीळ ॥ पवित्रपणें ॥ १७ ॥

त्यांचें मन कोवळें असतें. ते सदोदित पवित्र आणि निर्मळ असतात. त्यांचें आचरण देखील अत्यंत निर्मळ असतें ॥ १७ ॥

न पाहाती मानापमान ॥ निंदास्तुति समाधान ॥
धैर्यपणें मन ॥ नांदत जयांचें ॥ १८ ॥

ते मान किंवा अपमान पहात नाहींत. निंदेकडे किंवा स्तुतीकडे लक्ष्य देत नाहींत. त्यांच्या मनाला नेहमीं समाधान आणि धैर्य-हीं वाटत असतात. ॥ १८ ॥

सुख दुःख न गणी ॥ समाधान लाभहानी ॥
उदार ते अंतःकरणीं ॥ न गुंतती कोठें ॥ १९ ॥

ते सुख किंवा दुःख यांची पर्वा करीत नाहींत. लाभ झाला किंवा तोटा झाला, तरी ते समाधानच मानतात. त्यांचें अंतःकरण उदार असतें. ते कोठेंही गुंतून पडत नाहींत. ॥ १९ ॥

सदां विवेकीं चित्तवृत्ती ॥ पडों न देती विस्मृती ॥
सावधान अहोरातीं ॥ आत्मस्वरूपीं ॥ २०

त्यांची चित्तवृत्ति नेहमीं विवेकयुक्त असते; ते आत्मस्वरूपीं नेहमीं लक्ष्य ठेवूनच राहतात; त्या स्वरूपाची केव्हांही विस्मृति पडूं देत नाहींत. ॥ २० ॥

कां धरी पिशाचलीला ॥ तरी होय जगावेगळा ॥
लोकां न दाखवी डोळा ॥ शाहाणपणा ॥ २१ ॥

अथवा ते योगी जगाहून वेगळे राहून पिशाचाप्रमाणेंही वागत

असतात. आपलें ज्ञातेपण लोकांच्या दृष्टीस पडूं देत नाहीत. ॥ २१ ॥

**इत्यादि आचार दाविती ॥ फळापेक्षा न भाविती ॥**
**लोकांसि देख लाविसी ॥ वर्तती असे ॥ २२ ॥**

अशा प्रकारें ते वागतात खरे, पण त्या आचरणापासून त्यांना कोणत्याही प्रकारच्या फळाची इच्छा नसते. लोकांना शहाणें करावें अशा इच्छेनें ते वागत असतात. ॥ २२ ॥

**विश्वसाक्षी योगीराणा ॥ जाणे सर्वांतरींच्या खुणा ॥**
**परी तो वाटे जना ॥ वेडिया ऐसा ॥ २३ ॥**

योग्यांमध्यें श्रेष्ठ असा तो आत्मज्ञानी पुरुष सर्व जगाच्या मनांतील गोष्टी जाणत असतो; ॥ पण लोकांस मात्र तो वेडयासारखा भासतो. ॥ २३ ॥

**असे तरी लोकांमाजीं ॥ परी कर्म क्रिया सर्व त्यजी ॥**
**राहे सहजासहजीं ॥ निष्कर्मपणें ॥ २४ ॥**

तो योगी लोकांमध्येंच राहत असतो, पण त्यानें सर्व प्रकारचीं कर्में टाकून दिलेलीं असतात. तो कर्मरहित होत्सता मोठ्या आनंदानें राहत असतो. ॥ २४ ॥

**आपण एक सर्वेश्वरू ॥ कोणा सांगना व्यवहारू ॥**
**क्रिया कर्म न सांग करूं ॥ नार्थिलेंची ॥ २५ ॥**

आपणच सर्व सृष्टीचें नियमन करणारे आहों असें तो मानीत असतो. तो लोकांना कोणत्याही प्रकारचा व्यवहार किंवा क्रियाकर्में करण्याविषयीं उपदेश करीत नाहीं. कारण सर्व कर्में व्यर्थ आहेत. ॥२५

उग्र स्वळता दावीतसे ॥ तेणें लोक हासतसे ॥
हेंही तया नाहीं पिसें ॥ अद्वैतपणें ॥ २६ ॥

तो योगी केव्हां केव्हां उग्रता किंवा हलकेपणा दाखवितो व लोक त्याला हांसतात. पण ही गोष्ट त्याच्या गांवींदेखील असत नाहीं. कारण त्याच्या मनांत द्वैतभाव मुळींच नसतो. ॥ २६ ॥

ऐशिया स्थिती राहावें ॥ स्वरूप जाणोनि भोगावें ॥
जन उद्धारावें कीं त्यजावें ॥ न स्मरे तो ॥ २७ ॥

अमक्या एका तऱ्हेनें वागावें, विषयांचें स्वरूप जाणून त्याचा अनुभव घ्यावा, लोकांचा उद्धार करावा किंवा त्यांचा त्याग करावा, हें तो कांहींच मनांत आणीत नाहीं. ॥ २७ ॥

विश्व आपण भोगो न भोगो ॥ परी स्वरूप तया सांगो ॥
हें कांहीं न दे लागों ॥ आपणाकडे ॥ २८ ॥

विश्वांतील पदार्थांचा आपण उपभोग घेत आहों किंवा नाहीं, किंवा त्यांचें वास्तविक स्वरूप काय आहे, इत्यादि गोष्टींचा संबंध तो योगी आपणाकडे कधींच लागूं देत नाहीं. ॥ २८ ॥

विश्वाचा दाहो न लागे आंगा ॥ तो द्वंद्वातीत पैंगा ॥
एकदेशीया जगा ॥ न पाहे योगी ॥ २९ ॥

इतिश्री परमामृते मुकुंदराजविरचित्ते भक्तिरहस्यनिरूपणं नाम त्रयोदशप्रकरणं संपूर्णम् ॥ १३ ॥

या विश्वासंबंधाचा त्रास तो आपल्या अंगास मुळींच लागूं देत नाहीं. सर्व प्रकारच्या द्वंद्वांपासून ( विरोधांपासून ) तो अगदीं मुक्त

असतो. ब्रह्माच्या केवळ एका अंशाचा आश्रय करून राहणाऱ्या जगाला तो योगी मुळींच पाहात नाहीं. ॥ २९ ॥

---

## प्रकरण चौदावें.

**नूं संशय न धरी ॥ मुक्त वर्तती दोहीं परी ॥**
**परी तूं अभ्यास करी ॥ सांगीतला ऐसा ॥ १ ॥**

बाबा शिष्या, तूं संशय धरूं नको. मुक्त झालेले योगी दोन्ही प्रकारचें वर्तन करीत असतात. पण तुला पूर्वीं जसें सांगितलें आहे त्याप्रमाणें अभ्यास कर. ॥ १ ॥

**तैसा सहजचि असशी ॥ परी आलें पाहिजे प्रत्ययासी ॥**
**मग तूं ज्ञानीच होशी ॥ जैसा तैसा ॥ २ ॥**

तूं स्वतः ब्रह्मरूपच आहेस, पण हें तुझ्या अनुभवास मात्र आलें पाहिजे. एकदां अनुभव आला कीं तूं आपोआप ज्ञानी होशील. ॥ २ ॥

**पाहे पां शेंदाडें पिकलीं ॥ तीं काय देठींहून सोडविलीं ॥**
**तैसी दशा जरी झाली ॥ तरी राहिलें ध्यानीं ॥ ३ ॥**

उदाहरणार्थ असें पहा कीं शेंदाडें पिकलीं म्हणजे तीं देठापासून सोडवून कां काढावीं लागतात ? ( तीं आपोआपच गळून पडतात. ) तशाप्रकारची जर तुझी स्थिति झाली, तर तुझ्या हें ध्यानांत राहिलें, असें म्हणावयाचें. ॥ ३ ॥

**तंववरी सांगीतलिया रीती ॥ स्वरूप ध्याइजे अति प्रीती ॥**
**तरीच साधे परमप्राप्ती ॥ सत्य जाण ॥ ४ ॥**

तोंपर्यंत पूर्वी सांगितलेल्या रीतीनें त्या आत्मस्वरूपाचें अतिशय प्रेमानें ध्यान कर. तरच तुला मोक्षाची प्राप्ति होईल. हें सत्य समज. ॥ ४ ॥

**नित्य करावा ऐसा नेम ॥ पडों न द्यावा संसारभ्रम ॥**
**धरावा स्वरूपाचा काम ॥ साधन पंथ ॥ ५ ॥**

असा निश्चय नेहमीं करावा. संसारासंबंधीं भ्रम पडूं देऊं नये. स्वरूपाची आवड धरून त्याच्या साधनाच्या मार्गास लागावें. ॥५

**हें नित्य श्रवण करावें ॥ मनन निदध्यासें अनुभवावें ॥**
**आळस करून न दवडावें ॥ आयुष्य वृथा ॥ ६ ॥**

हें वेदान्तशास्त्र रोज ऐकावें, त्याचें मनन आणि निदिध्यासन करून अनुभव घ्यावा. आळसामध्यें राहून आयुष्य व्यर्थ घालवूं नये. ॥ ६ ॥

**येविषयीं जो आळसी ॥ तया परमप्राप्ति न होय कल्पांतेंसी ॥**
**तो सद्गुरूचा उपदेशी ॥ ह्मणोंचि नये ॥ ७ ॥**

याविषयीं जो आळस करील, त्याला कल्पांत होईपर्यंतही मोक्षाची प्राप्ति होणार नाहीं. त्याला खऱ्या गुरूचा चेला असें ह्मणूंच नये. ॥ ७ ॥

**आतां असो वहु बोलणें ॥ श्रीगुरूसि धरी जीवें प्राणें ॥**
**नाहीं सार तयाविणें ॥ अन्य कांहीं ॥ ८ ॥**

आतां पुष्कळ बोलणें राहूं दे. जिवाभावानें सद्गुरूस शरण

जावें. त्याच्याशिवाय या सर्व संसारांत उत्तम असें कांहींच नाहीं.८

**तयाचे वचनीं राही ॥ करूं नको येर कांहीं ॥**
**तरी अनायासें स्वरूप पाही ॥ पावशी तूं ॥ ९ ॥**

नेहमीं त्याच्या आज्ञेप्रमाणें आचरण ठेव. दुसरें कांहीं करूं नको. असा वागशिल तर तुला आपोआप आत्मस्वरूपाची प्राप्ति होईल. ॥ ९ ॥

**वृद्धि पावे गुरुकृपा ॥ ऐशिया स्थितीं राहे पां ॥**
**गुरु कष्टी होय बापा ॥ ऐसा न वर्ते ॥ १० ॥**

नेहमीं गुरूची कृपा वाढत जाईल अशा रीतीनें वागत जा. गुरूला त्रास होईल अशा रीतीनें केव्हांही वागूं नको. ॥ १० ॥

**गुरुमहिमा अपारु ॥ गुरु तो परत्परु ॥**
**तुज न कळे ह्मणोनि परिहारु ॥ देऊन सांगों ॥ ११ ॥**

गुरूच्या थोरवीचा अंत लागत नाहीं. गुरु हा सर्वांहून श्रेष्ठ आहे. हें तुला समजत नाहीं, ह्मणून हें मुद्दाम तुला सांगितलें आहे. ॥ ११ ॥

**आतां तन मन धन ॥ करी सद्गुरूसी समर्पण ॥**
**नाहीं तयाविण ॥ अन्य दैवत जगीं ॥ १२ ॥**

आपलें तन-मन-धन सर्व सद्गुरूच्या पायांपाशीं अर्पण कर. त्याच्याखेरीज या जगामध्यें दुसरें दैवतच नाहीं. ॥ १२ ॥

**गुरु तत्पद शिव ॥ शिष्य त्वंपद जीव ॥**
**ह्मणोनि तयाचे चरणीं भाव ॥ धरी ऐक्यतेचा ॥ १३ ॥**

तत् ' या पदाचा वाच्य पदार्थ जो शिव, तो गुरूच आहे.

आणि 'त्वं' पदाचा अर्थ जो जीव तो शिष्य होय. यासाठीं त्या गुरूच्या पायांशीं तूं ऐक्यभाव धर. ॥ १३ ॥

**गुरु तत्पद सागरू ॥ शिष्य त्वंपद तरंगाकारू ॥**
**दोन्ही हारपोनि ब्रह्म निर्विकारू ॥ आपण होइजे ॥१४॥**

'तत्' पदरूपी गुरू हा समुद्र. आणि 'त्वं' पदरूपी शिष्य हा लाटेप्रमाणें होय. यासाठीं हीं दोन्ही एक करून निर्विकार असें ब्रह्मस्वरूप होऊन आपण रहावें. ॥ १४ ॥

**गुरुभयें प्रेम वाहासी ॥ तरी अवश्य स्वरूप पावसी ॥**
**कीटकभयें आळीसी ॥ कैसें जालें ॥ १५ ॥**

गुरूची भीति मनामध्यें धरून जर प्रेमानें वागशील तर तुला आत्मस्वरूपाची अवश्य प्राप्ति होईल. माशीच्या भयानें कीड सुद्धां माशी होते, हें नीट ध्यानांत ठेव. ॥ १५ ॥

**आळीसी कीटकता ॥ गुरु देईल सायुज्यता ॥**
**मग सुखिया होशी तत्त्वता ॥ स्वरूपीं रमशी ॥ १६ ॥**

ज्याप्रमाणें माशी किड्याला आपल्यासारखी करिते, त्याप्रमाणें गुरूही तुला सायुज्य मुक्ति देईल. मग तूं सुखी होऊन आत्मस्वरूपाचा अनुभव घेऊन आनंदी होशील. ॥ १६ ॥

**तत्त्वता स्वरूपीं भेद नाहीं ॥ परी तें ध्यानैकगम्य पाही ।**
**मग अनुभवें सुखिया होई ॥ तरशी भवभय ॥ १७ ॥**

वास्तविक गुरु व तूं या दोघांमध्यें भेद नाहीं. पण ही अभेदबुद्धि केवल ज्ञानामुळेंच प्राप्त होणारी आहे. यासाठीं अनुभव घेऊन सुखी हो, म्हणजे संसाराच्या भयांतून मुक्त होशील. ॥ १७ ॥

हें शास्त्र गोप्य करावें ॥ कवणा स्फुट न सांगावें ॥
तुझें तुवां अनुभवावें ॥ गुरुगम्य हें ॥ १८ ॥

हें वेदान्तशास्त्र गुप्त राखावें. हें कोणासही उघड करून सांगूं नये. याचा तुझा तूंच अनुभव घे. कारण हें गुरुमुखानेंच जाणावयाचें आहे. ॥ १८ ॥

पशुजना श्रवणीं घालिशी।तरी कथा सिद्धि होय तयाशी ॥
सद्भाव देखोनी कृपा करिसी। तरी निर्वाहक पाहिजे॥ १९ ॥

जे कोणी पशूप्रमाणें वागणारे मनुष्य आहेत, त्यांच्या कानावर हें घालून काय उपयोग ? ज्यावेळीं तूं एकाद्याचा सद्भाव ओळखून त्यावर कृपा करूं इच्छिशील, त्यावेळीं शिष्याची योग्यता पहा. १९

जैशी गुरुमार्गाची परवडी ॥तैशी असावी गुरुपदाची गोडी ॥
तरी प्रकाश होतां अर्धघडी ॥ न लागे बापा ॥ २०॥

ज्याप्रमाणें गुरुमार्गाची आवड असते, त्याचप्रमाणें गुरुपदाचे ठिकाणींही गोडी धरावी. असें केल्यास आत्मज्ञान होण्यास अर्धी घटका देखील लागावयाची नाहीं. ॥ २० ॥

गुरुसांप्रदायाची वाट ॥ न धरितां करिशील प्रगट ॥
तरी गुज घेऊनि चाट ॥ होतील बहु ॥ २१ ॥

गुरुसंप्रदायाची जशी वहिवाट आहे, ती सोडून देऊन जर हें ज्ञान प्रकट करशील, तर त्यांतलें मर्म समजलें असें मानून लोक चावट मात्र होतील. ॥ २१ ॥

यालागीं हृदयीं गुप्त राख ॥ स्वयें परमामृत चाख ॥
सर्व योगियांचा तिलक ॥ होशील तूं ॥ २२ ॥

यासाठीं हें ज्ञान गुप्त ठेव. ह्या उत्कृष्ट अशा अमृताची तूं गोडी घे. ह्मणजे तूं सर्व योग्यांमध्यें श्रेष्ठ होशील. ॥ २२ ॥

**परमामृत ग्रंथ प्रमाण ॥ केलें परमार्थाचें कथन ॥**
**जया पाहिजे गुरुखूण ॥ तेणें हाचि पाहावा ॥ २३ ॥**

हा परमामृत नांवाचा ग्रंथ शास्त्रांस मान्य आहे. यामध्यें परमार्थाचें कथन केलेलें आहे. ज्याला गुरूनें सांगितलेलें रहस्य समजावें अशी इच्छा असेल, त्यानें हाच ग्रंथ पहावा. ॥ २३ ॥

**हेंचि गुरुगूज कथन ॥ ह्मणोनि करावें जतन ॥**
**सेवूनि सद्गुरूचे चरण ॥ सुखिया होइजे ॥ २४ ॥**

ह्या ग्रंथांतील उपदेश सर्व परमार्थाचें गुरुमुखानें समजलेलें बीज आहे, म्हणून याचें रक्षण करावें. आणि सद्गुरूचे पाय धरून रहा ह्मणजे सुखी होशील. ॥ २४ ॥

**ह्मणे मुकुंदराज योगिया ॥ ह्या बुद्धी जो अनुभविया ॥**
**तो पाहे परतोनियां ॥ आपलें स्वरूप ॥ २५ ॥**

**इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते साक्षात्कारो नाम चतुर्दशप्रकरणं संपूर्णम् ॥ १४ ॥ श्रीशंकरार्पणमस्तु ॥ श्रीलक्ष्मीनारायणार्पणमस्तु ॥**

योगिश्रेष्ठ मुकुंदराज सांगतात, अशा प्रकारची बुद्धि धरून जो अनुभव घेईल, तोच या संसारांतून मागें परतेल आणि आपल्या स्वरूपाचा अनुभव घेईल. ॥ २५ ॥

याप्रमाणें श्रीमुकुंदराजविरचित परमामृत ग्रंथाचें
महाराष्ट्र भाषांतर संपूर्ण झालें.